शाहीर-खाडिलकर-ग्रंथमाला ग्रंथ १ ला




।'स्तवार्थ तुझिया तुझ्यासम कवी कधीं जन्मती'।

शाहीर-खाडिलकर-ग्रन्थमाला-ग्रंथ १ ला.

# पोवाडे

महाराष्ट्र-शाहीर
श्री. पांडुरंग दत्तात्रय खाडिलकर,
एम्. ए., बी. टी.

मूल्य रु. २-०-०



कै. ती. दत्तात्रय सदाशिव खाडिलकर

परमपूज्य पिताजी
कै० ती० दत्तात्रय सदाशिव खाडिलकर,
व
पुत्रवत्सल माताजी
कै. ती. सौ. यशोदाबाई खाडिलकर,
यांचे चरणीं

**अर्पण**



कलिकल्मषहारीणि हारीणि जनचेतसाम् ।
यशांसि शिवराजस्य श्रोतव्यानि मनीषिभिः ॥ १ ॥

—शिवभारत

॥ श्री ॥

# प्रस्तावना

## १ भूतकाळांत—

**पोवाडा** हा शब्द सुमारें एक हजार वर्षांपासून मराठीभाषेंत अस्तित्वांत आला आहे. मराठी भाषेला नांव घेण्यासारखें रूप श्रीज्ञानेश्वरकालीं आलें होतें. त्यानींच आपल्या ज्ञानेश्वरींत पवाडा ('पवाडा तुवां केला गंधर्वासी ' ॥ अध्याय २ ॥ ) हा शब्द उपयोगांत आणला आहे. **पवाडा** हा शब्द **प्रवाद** या संस्कृतशब्दापासून झाला आहे. प्रवाद म्हणजे मोठ्यानें सांगणें, जाहीर करणें. पवाडा शब्दाचा अर्थ जरी अगदीं मुळांत इतकाच असला तरी त्याचा अर्थ मराठीभाषेंत रणक्षेत्रावर अगर इतर धकाधकीच्या प्रसंगीं मर्दुमकी गाजविणाऱ्या अथवा मनांत खळबळाट उडवून देणाऱ्या पुरुषाचें वीररसप्रधान काव्य असा रूढ झाला आहे. अर्थात् असलें काव्य तालासुरावर गावयाचें आहे.

अशातहेचीं काव्यें—पोवाडे—फारशीं उपलब्ध नाहींत. श्री शिवाजी महाराज यांच्या पूर्वींचा एक ही पोवाडा आज उपलब्ध नाहीं. खुद्द शिवाजीमहाराज यांच्या काळांतले असे दोन तीन च पोवाडे आज उपलब्ध आहेत. या विषयींची समग्र माहिती श्री. का. न. केळकर यांनीं आपल्या ' ऐतिहासिक पोवाडे ' या ग्रंथाच्या प्रस्तावनेंत दिलेली आहे ती जिज्ञासूंनीं वाचावी.

आज जे पोवाडे जिवन्त आहेत त्यावरून असें दिसतें कीं मराठीभाषेंत पोवाडा—रचनेला प्रारंभ ख्रिस्तशकाच्या सतराव्या शतकांत जोरानें झाला. तत्पूर्वीं पोवाडा—रचना होतच नव्हती असें म्हणणें चुकीचें ठरेल. कारण शिवाजीमहाराजांच्या वेळीं अज्ञानदास, तुळशीदास यांनीं अनुक्रमें अफझलखानवध व सिंहगड या विषयांवर जे दोन पोवाडे लिहिलेले आज

आपणांस वाचावयास सांपडतात ते सर्वतोपरीं—पोवाडेशास्त्राच्या दृष्टीनें—परिपूर्ण आहेत. अर्थात् असे परिपूर्ण पोवाडे पूर्वपरंपरेशिवाय एकदम उत्पन्न होणें शक्य नाहीं. तत्पूर्वी पोवाडारचनेचे बरेच प्रयत्न झाले असले पाहिजेत हें निर्विवाद आहे.

अशा रीतीनें पोवाडे-लावणी-वाङ्मय जरी दोनतीनशें वर्षाच्या अवधीतलेंच असलें तरी त्यानें लोकांच्या मनावर बसविलेली पकड मात्र अपूर्व आहे. 'पोवाडा' अगर 'लावणी' हा नुसता शब्द उच्चारतांच प्रत्येकाच्या हृदयांत कशा लाटा उसळूं लागतात हें प्रत्येकानें नीट पाहिल्यास आमच्या म्हणण्याची यथार्थ कल्पना येईल. इ. स. १८४० पर्यंत पोवाडा-लावणी-रचना जोमांत होती; पण त्या नंतर मात्र आज जवळ जवळ पाऊणशें वर्षाच्या काळांत म्हणावी तशी रचना झाली नाहीं. एकतर खळखळाटाचे प्रसंग संपुष्टांत आल्यामुळें पोवाडे लिहिण्यास विषयच उरले नाहींत. दुसरें असें कीं नव्या राज्ययंत्रानें जनतेचे डोळे दिपवून टाकले होते. त्या मुळें सामाजांतील वरच्या दर्जाचें लक्ष्य पाश्चात्यांचें अनुकरण करण्यांत गुंतलें होतें; आणि परंपरेनें चालत आलेले गोंधळी-शाहीर-वगैरेंना लेखनास विषयच नव्हता. तिसरें कारण असें कीं मराठेशाहींत असल्या कलावन्तांना जरूर असणारा राजाश्रय होता. त्यामुळें या कवींना पोटापाण्याची चिंताच नव्हती; आणि म्हणून काव्यरचना करण्यास त्यांना भरपूर अवसरही मिळत असे; पण स्वराज्य नष्ट झाल्यावर जसे शिपाईपेशी लोकांना समशेरीला कायमचा रामराम करून उपजीविकेसाठीं हातांत नांगर धरावा लागला, तीच गति या गोंधळी लोकांची झाली! राजाश्रय तुटल्यामुळें जो तो पोटाच्या विवंचनेंत चूर होऊन गेला!

नव्या राज्ययंत्रानें टाकलेल्या डोळे दिपवून टाकणाऱ्या मोहिनीची निशा थोडी ओसरल्यावर विचारवन्तांची दृष्टि पुन्हां भूतकाळाला भिडूं लागली व गतेतिहासाची गोड आठवण त्यांना आपलेसें करूं लागली.



याचाच परिपाक म्हणजे आधुनिक पोवाडा-लावणी-वाङ्मय-निर्मिति हें होय.

## २ पोवाडे रचण्याची स्फूर्ति कशी झाली?—

इ. स. १९२६ सालीं सांगली सोडून श्रीक्षेत्र वाई येथें पण्डित गुरुवर्य नारायणशास्त्री मराठे (सध्यांचे श्रीमत्केवलानंदस्वामी महाराज) यांच्या अध्यक्षतेखालीं चाललेल्या **प्राज्ञपाठशाळा** नांवाच्या संस्थेमध्यें अध्यापनाचें काम करण्यासाठीं व त्या बरोबरच एम्. ए. चा अभ्यास करण्यासाठीं मी गेलों. तत्पूर्वी पोवाडे कसे म्हणतात हें सुद्धां मला मुळींच ठाऊक नव्हतें, मग पोवाडे लिहिणें तर दूरच राहिलें! नाहीं म्हणायला १९२० सालीं लोकमान्यांचें देहावसान झाल्यानंतर लगेच लोकमान्यांचा एक पोवाडा 'धन्य शिवाजी०' या चालीवर लिहिला होता. (त्या वेळीं मी इंग्रजी ६ व्या वर्गात होतों.) तो ही या संग्रहांत छापलेलाच आहे.

प्राज्ञपाठशाळेंत पाऊल ठेवलें ते दिवशीं हनुमज्जयन्ति होती. तेच दिवशीं सायंकाळीं प्राज्ञपाठशाळेंतील कांहीं शिक्षक व मुलें रायगड येथें होणाऱ्या श्रीशिवाजीमहाराजांच्या छत्रीसमारंभासाठीं पायीं प्रवास करीत जाणार होतीं. गु० नारायणशास्त्री यांनीं मला ही त्यांच्या बरोबरच रायगडास जाण्यास सांगितलें व मी ही त्यांच्याबरोबर जाण्यास निघालों.

प्रवास करीत असतांना वाटेंत कांहीं मुलें पोवाड्यांतील एक दोन चाली गुणगुणत असत. अर्थात् त्या चाली अर्धवट त्यांना येत असत. पण त्या अर्धवट अशाच चालींनीं माझ्या मनाचा ताबा घेतला! पुढें त्यांतील मुलांना येत नसलेला चालींचा भाग मी थोड्या प्रयत्नांनीं पुरा केला व अशा रीतीनें दोन चाली मला अवगत झाल्या.

सात आठ दिवसांनीं आम्हीं रायगडमुक्कामीं जाऊन पोहोचलों. तेथें पोवाडा-श्रवणाचा अपूर्व योग आला. तत्पूर्वी पोवाडा मी कधींच

ऐकला नव्हता व पोवाडा ही काय चीज आहे याची कल्पना ही नव्हती असें म्हटलें तरी चालेल. पुण्याच्या **गोपाल-गायन-समाजाचे** संचालक श्री. **गोविंद गोपाळ देसाई** हे तेथें आले होते. त्यांनीं आपल्या गोड आवाजांत श्री. दळवी यांनीं रचलेला 'शिवाजी महाराज अवतारी कसे?' हा अप्रतिम पोवाडा गाऊन दाखविला. आधींच पोवाडा सर्वतोपरी सुंदर; त्यांत रायगडसारखें तन्मयता पसरविणारें ठिकाण; आणि त्यांच श्री. गोविंदराव यांच्यासारखे सुरेल आवाजीचे गवई! मग त्या प्रसंगाचें वर्णन तें काय करावें! सर्व श्रोतृसमाज पोवाडा ऐकत असतांना नुसता चित्ररूप होऊन राहिला!! एकंदर पोवाडयाचा कार्यक्रम असा सुमारें एक तास च झाला असेल; पण तो प्रसंग माझ्या दृष्टीपुढें अजून जिवंतपणें वावरत आहे! तो पोवाडा मी एकदांच ऐकला; पण त्यानें माझ्या हृदयाचा पूर्ण ठाव घेतला!

या प्रसंगापूर्वीं मी बरेच पोवाडे वाचले होते. एम्. ए. चा अभ्यास करीत असतांना पोवाडा या वाङ्मयविभागाचा ही अभ्यास मला करावा लागला. त्या वेळीं **ऑक्वर्थ** आणि **शालिग्राम** यांनीं संपादित केलेलें पोवाडयांचें पुस्तक समग्र रीतीनें मला वाचावें लागलें. पोवाडे उत्तम पण चाली लागत नाहींत, असें तें पुस्तक वाचत असतांना मला नेहेमीं वाटे; पण चाली लावायच्या कशा? ज्या स्फूर्तिप्रद पोवाडयांची छाप लोकांच्या मनावर इतकी होती त्या पोवाडयांच्या चाली लागत नाहींत हें पाहून मनाला विषाद वाटत असे व आज ही वाटत आहे. कारण या पोवाडयांच्या कांहीं चाली लागतात; पण कांहीं अजूनही लागत नाहींत!

## ३ स्फूर्ति झाल्यावरः—

रायगडाहून परत आल्यानंतर आपणालाही पोवाडे लिहितां येतात कां पाहावें असें वाटूं लागलें व लगेच त्या उद्योगाला मी प्रारंभही केला. सुमारें महिना दोन महिन्याच्या आंतच मी 'तानाजीराव मालुसरे'



यांचा पोवाडा लिहिला. पोवाडा-लेखनाचें काम सुरूं असतानांच त्यांतील चौक बसविण्यास तयार करण्यासाठीं जीं दोनचार मुलें निवडावीं लागलीं तीं सर्व प्राज्ञपाठशाळेंत अध्ययनार्थ राहिलीं होतीं. त्या पहिल्या मुलांपैकींच श्री. नारायणराव हे एक होत. यांचा आवाज पहिल्यापासूनच फार गोड, भरदार व सुरेल असा आहे. उत्साहही पण तसाच. त्या मुळें बघतां बघतां आमची तयारी झपाटयानें होऊं लागली. श्री. श्रीधरराव घोर्णीकर, श्री. वासुदेवराव खाडिलकर, श्री. गोपाळराव जोशी व श्री. विष्णुपंत जोशी (धौम)—हे ही आमचे आद्य सांथीदारच होत.

या सर्वांच्या उत्साहानें पोवाडयाची तयारी महिना दोन महिन्यांतच झाली व आमचा **पहिला कार्यक्रम** श्रीमत्केवलानंदस्वामी यांच्यापुढें प्राज्ञपाठशाळेंतच झाला. तो कार्यक्रम एकंदरींत बरा झाला. नंतर दुसरा कार्यक्रम वाईगांवांत झाला तो ही चांगला झाला. अशा तऱ्हेनें दोनचार कार्यक्रम झाल्यावर थोडासा आत्मविश्वास उत्पन्न झाला व त्यामुळें उत्साह ही वृद्धिंगत झाला.

पुढें १९२७ सालीं श्रीगणेशोत्सवार्थ शाळेतर्फे मला मुंबईस पाठविण्याचें ठरलें. पण या पूर्वीं शाहीर म्हणून मी कधींच बाहेर गेलों नव्हतों त्यामुळें मुंबईत माझें कसें होणार याबद्दल मनाला चिंताच लागून राहिली होती. अशावेळीं दोन स्नेह्यांनीं मला अतिशय मदत केली व आजतागायत ते मला अव्याहत निरलसपणें व निरपेक्षपणें साहाय्य करीत आले आहेत. त्यांचे उपकार मजवर अनंत आहेत व ते माझ्याहातून कधींही फिटणार नाहींत! या स्नेह्यांपैकीं एक श्री. श्रीपाद शंकर नवरे, बी. ए. हे होत. हे श्रद्धानंद अनाथमहिलाश्रम, माटुंगा, या संस्थेचे एक आस्थेवाईक कार्यकर्ते आहेत. दुसरे स्नेही श्री. परशराम पांडुरंग नरवणे, खडीवाले, (मंत्री बिल्डिंग, मुगभाटलेन, मुंबई ४) हे होत. मुंबईत श्रीगणेशोत्सवप्रसंगाचे आमचे कार्यक्रम नेहेमीं हेच ठरवीत असतात.

श्रीगणेशोत्सवप्रसंगीं १९२७ सालीं मुंबईस आल्यावर पहिला कार्यक्रम, हिंदुमहासभा, माटुंगा, या संस्थेच्या वतीनें झाला. हाच मुंबईतला आमचा **पहिला पोवाड्याचा** असा **कार्यक्रम**. तेव्हां पासून आजपर्यंत तरी श्रीगणेशोत्सवार्थ मी मुंबईस जात असतों.

### ४ कांहीं संस्मरणीय दौरे:—

**मध्यप्रान्त–वऱ्हाड–**१९२८ सालीं पोवाडा–गायनासाठीं आम्ही मध्यप्रान्त–वऱ्हाडकडे जाण्याचें ठरविलें. प्रथम मुंबईहून उमरावतीस गेलों. तेथें डॉ. शिवाजीराव पटवर्धन, डॉ. भोजराज वगैरेंच्या कृपेनें दोन चार कार्यक्रम झाले. तेथून थेट नागपूरास गेलों, तेथें दसऱ्याच्या दिवशीं सकाळीं ८ वाजतां सीताबर्डीवर भिडेकन्याशाळेंत आमचा पहिला कार्यक्रम झाला. त्यावेळीं धर्मवीर **डॉ. मुंजे** हे स्वतः कार्यक्रमास हजर होते. नागपुरास २–४ दिवसच राहण्याचा विचार होता; पण तेथेंच दहा पंधरा दिवस मुक्काम पडल्यामुळें व शाळेची सुटी संपल्यामुळें दुसरीकडे कोठें ही जातां आलें नाहीं. या वेळीं नागपुरास आम्हांस श्री. पांगे कॉन्ट्रॅक्टर, सीताबर्डी, नागपूर, यांनीं व श्री. नारायण दामोदर फडके, दुकानदार, यांनीं अतिशय मदत केली. या जोडीनें आम्हांस कसली ही उणीव पडूं दिली नाहीं.

त्यानंतर दोन वेळां मध्यप्रान्त–वऱ्हाडकडे वेगवेगळया गांवीं गेलों होतों.

**बेळगांव–**बेळगांव जिल्ह्यामध्यें (१९२८) एकदा दौरा काढला होता. तेव्हां प्रत्येक तालुक्याच्या ठिकाणीं आम्हीं जाऊन आलों. या दौऱ्यांतील कधींही न विसरणारें नांव म्हणजे दे. भ. धोंडो राजाराम ठाकूर, यांचे होय.

बेळगांवीं साहित्यसम्मेलन प्रसंगीं ही आम्हीं गेलों होतों तेव्हां दोन फार मोठे कार्यक्रम झाले. कार्यक्रमास नऊ दहा हजार जनसमूह एकत्र झाला असेल!



नंतर गोवेंप्रान्त, सोलापूर–विजापूर, इंदूर–उज्जयिनी वगैरे भागांत ही सवडीनुसार जाऊन आलों.

गेल्या सहा सात वर्षांत आम्हीं जेथें जेथें गेलों तेथें तेथें सर्व लोकांनीं या पोवाड्याचें हार्दिक स्वागतच केलें आहे या बद्दल मी त्यांचा फार आभारी आहे. नागपुरास दहाबारा दिवसांत वीस पंचवीस कार्यक्रम झाले असतील! दर कार्यक्रमास लोक तर हजारोंनीं जमत असत! अशा रीतीनें अखिल महाराष्ट्रानें व बृहन्महाराष्ट्रानें मला बहुमोल प्रोत्साहन देऊन माझ्याकडून ही सेवा करवून घेतली आहे या बद्दल मला खरोखरीच आनंद वाटत आहे. **महाराष्ट्र** हें नांव महाराष्ट्रानें सार्थ केलें हें माझ्या अनुभवाला आलें.

### ५ कांहीं आक्षेप व निरसन.

१ सध्यां मर्दुमकीला वाव मिळत नसल्यामुळें व रोमहर्षण प्रसंग क्वचितच दृष्टिपथांत येत असल्यामुळें ऐतिहासिक पोवाड्यांचें आधुनिक गायन हें परिणामकारक होणें शक्य नाहीं. दररोज नव्या नवलाईनीं कवींना वीररसाची स्फूर्ति देणारे प्रसंग नाहींसे झाले व त्यामुळें पोवाडे–रचना करण्याचा काळ ही नाहींसा झाला! आणि जरी आज गतेतिहासाच्या उज्ज्वल प्रसंगावर पोवाडे लिहिले गेले तरी ते पुस्तकांतच राहतील, लोकांच्या हृदयाचा ठाव घेणार नाहींत, असा एक आक्षेप आहे.

स्वतःच्या अनुभवावरून माझेंतरी असें ठाम मत झालें आहे कीं हा आक्षेप कांहीं सर्वस्वीं खरा नाहीं जोपर्यंन्त रसिकता जिवन्त आहे तोंपर्यंत चांगलें वाङ्मय हृदयाच्या तारा छेडणारच! चांगले पोवाडे ऐकण्यासाठीं सध्यां जी अनर्थ गर्दी उसळते त्यावरूनही हीच गोष्ट सिद्ध होते.

२ पोवाडा–गायनाचे वेळीं केवळ डफ व तुणतुणें हींच साधनें

असलीं पाहिजेत, पेटी, तबला वगैरे आधुनिक साधनें सांथीसाठीं मुळींच घेऊं नयेत; डफ–तुणतुणें यांनीं जसा वीररस भरतो तसा तो पेटी, तबला इत्यादि आधुनिक साधनांनीं कधींही भरणें शक्य नाहीं असा एक आक्षेप आहे.

माझें मत असें आहे कीं रस हा डफ–तुणतुण्यांत ही नाहीं किंवा पेटी–तबल्यांत ही नाहीं. रस हा मुख्यत्वेंकरून काव्यरचनेंत आहे, तसाच तो म्हणण्याच्या कौशल्यांत ही आहे. त्याला साधनें म्हणून डफ–तुणतुणें अगर पेटी–तबला वगैरे हत्यारें आहेत, मात्र ती आवश्यक आहेत. डफ–तुणतुणें लावा अथवा पेटी–तबला लावा, रसोत्पादन होऊन श्रोते समरस झाले कीं काम झालें ! शिवाय, इतर बाबतींत–जर आवश्यक असेल तर–जसें जुनें सोडून त्याच्या जागीं नवें येऊन बसलें आहे, तसेंच या ही बाबतींत इष्ट ते फेरफार आणि इष्ट ती साधनसामुग्री घेणेस कांहीं ही हरकत नाहीं. कीर्तनांत तंबोऱ्याची जागा पेटीनें घेतली; प्रवासांत बैलगाडयांची जागा आगगाडया व मोटारी यांनीं घेतली; तद्वतच डफ–तुणतुण्यांची जागा पेटी–तबल्यांनीं घेतली तरी त्यांत कांहीं वावगें नाहीं; केवळ डफ–तुणतणें अगर केवळ पेटी–तबला असा दुराग्रह कधींही धरूं नये. जर रसोत्पादन उत्तम होत असेल तर डफ, तुणतुणें, पेटी आणि तबला अशीं सर्व साधनें एकदम ही उपयोगांत आणलीं तरी कांहीं बिघडलें नाहीं असें आम्हांस वाटतें.

३ चालीसंबंधीं तिसरा आक्षेप येण्याचा संभव आहे. आम्ही आमच्या पोवाडयांतून ज्या चाली घातल्या आहेत त्या सर्वस्वीं जुन्या नाहींत; तर जुन्या चालींत जरूर त्या सुधारणा करून घातल्या आहेत. कारण जुन्या चाली अगदीं आहेत तशा–एका जिज्ञासु संशोधकाखेरीज कोणालाही आवडणार नाहींत. आधुनिक आवडीनिवडीप्रमाणें जुन्या चालींत ही इष्ट ते फेरफार करून त्या कर्णमधुर केल्या आहेत व नव्याही पुष्कळ रसानुकूलतेप्रमाणें घातल्या आहेत.



**६ पोवाडे व मराठीवाङ्मयः—**

गेल्या पांचपन्नास वर्षांत मराठीवाङ्मय इतर दृष्टीनें जसें झपाटयानें वाढलें आहे तसें तें पोवाडा–लावणी–लेखनांच्या दृष्टीनें बिलकूल वाढलेलें दिसत नाहीं ! श्रीमंत दुसरे बाजीराव पेशवे यांच्या कारकीर्दीचा शेवट झाल्यापासून पोवाडा–लावणी–वाङ्मय म्हणण्यासारखें लिहिलें गेलें नाहीं; अगर लिहिलें गेलें असल्यास तें लोकांच्यापुढें तितक्या उत्कटतेनें तरी आलें नाहीं ! या अवधींत, कादंबऱ्या, नाटकें, लघुकथा, वगैरे ग्रंथ जसे नवजोमानें बाहेर पडले आहेत व जसे महाराष्ट्र–शारदेच्या लावण्यवान शरीरावर त्यांनीं अलंकार चढविले आहेत, त्याप्रमाणें एकाही पोवाडा–ग्रंथानें तिच्या चरणावरसुद्धां एकही सुगंधित पुष्प वाहिलें नाहीं !

याला एक कारण असें सांगतां येईल कीं पोवाडा–लावणी–लेखन हें हलक्या दर्जाचें समजलें जात असे. त्याची रचना गोंधळी लोकांनीं करावी अगर तमासगीरांनीं करावी, समाजांतील प्रतिष्ठित लेखकाचें हें काम नव्हे अशा समजुतीमुळें अशा तऱ्हेचें लेखन झालें नाहीं.

अलीकडे दहा पंधरा वर्षांत कांहीं मंडळीच्या चिकाटीमुळें पोवाडा–लावणी–क्षेत्रांत नवचैतन्य खेळूं लागलें आहे ही अत्यंत आनंदाची गोष्ट होय. आज पोवाडा–लावणी–वाङ्मयाचा उत्कर्ष करण्यासाठीं व या वाङ्मयविभागाला प्रतिष्ठित स्वरूप देण्यासाठीं व महाराष्ट्र–शारदेच्या दरबारांत प्रमुखस्थान मिळवून देण्यासाठी कांहीं मंडळी आटोकाट प्रयत्न करीत आहेत. कांहीं लेखकांचीं नांवें देतों:—

**श्री. रामभाऊ दळवी.** राहणार खेड, जि. सातारा. यांनीं पोवाडा–लावणी–वाङ्मय बरेंच लिहिलें आहे. 'शिवाजी महाराज अवतारी कसे' हा अप्रतिम पोवाडा त्यांचाच आहे.

**लहरी हैदरसाहेब.** कोल्हापूरनगरीचें भूषण श्री. हैदरसाहेब हे आपल्या प्रासादिक लिखाणाबद्दल तिकडच्या प्रान्तांत फार मशहूर

आहेत. यांनीं ही बरेच पोवाडे व लावण्या लिहिल्या आहेत. त्यांच्या शिष्यमंडळीपैकीं श्री. नारायणराव यादव ( हे दांडपट्टा वगैरे खेळांत अतिशय निपुण आहेत ), श्री. पिराजीराव सरनाईक, श्री. कुंभार मास्तर वगैरे शिष्य ही आपल्यापरी पोवाडेवाङ्मय वृद्धिंगत करीत आहेत.

**श्री. गोविंदराव देसाई पुणें**—यांची ही शिष्यपरंपरा फार मोठी आहे. नव्या जोमानें, नव्या थाटांत, पोवाडा—गायनाचा आधुनिक संप्रदाय जोरदाररीतीनें यांनींच सुरू केला असें म्हणण्यास हरकत नाहीं.

**दांडपट्टबहाद्दर शाहीर नानिवडेकर**-यांनीं ही अमोलिक साज महाराष्ट्र—शारदेच्या कंठांत चढविले आहेत. हे पोवाडा—रचना करण्यांत व म्हणण्यांत जसे प्रवीण आहेत तसेच **विनोदमूर्ति** म्हणून ही विख्यात आहेत.

या शिवाय श्री मुचाटे (धुळें), श्री. प्रल्हादराय जामखेडकर (जळगांव), श्री. मुळे, श्री. बंडो महिपत कुलकर्णी, ( सोलापूर जि. बेळगांव ), श्री. दीक्षित; श्री. एकबोटे, श्री. साखवळकर ( सातारा ), श्री. देशपांडे ( वाई ); श्री. आप्पा तोडकर,निपाणी; श्री. गवळी ( सातारा ) वगैरे प्रथितयश शाहीरांनीं आपल्या ओजस्वी लेखनानें व डफावरच्या कडाक्यानें काव्यदेवतेला व जनहृदयांना आपलेसें करून टाकलें आहे. जळगांवचे सुप्रसिद्ध कवि श्री. तिवारी यांनीं ही ' संग्रामगीतें ' बरींच लिहिलीं आहेत. ही परंपरा जर अशीच दहावीस वर्षें अखंड राहील तर पोवाडे—लावणी—वाङ्मय जोमानें वाढेल व विद्वानांचें लक्ष्य आपल्याकडे खेंचून घेईल यांत तिळमात्र शंका नाहीं.

आज दरवर्षी मराठी—साहित्य—सम्मेलन भरत असतें, पण त्यांत **पोवाडा—लावणी—वाङ्मय** अथवा **कीर्तनवाङ्मय** यांचा नुसता विचार ही तेथें होत नाहीं हें नमूद करण्यास मोठा विषाद वाटतो !



पण याचा दोष सम्मेलनाकडे नसून विद्वानांचें लक्ष्य खेंचण्याइतकें आधुनिक पोवाडा—लावणी—वाङ्मय अगर कीर्तनवाङ्मय उत्पन्नच झालें नाहीं हें होय. मराठी ललित वाङ्मयाचे जसे नाटकें, कादंबऱ्या, स्फुट काव्यें अथवा खंडकाव्यें, लघुकथा वगैरे विभाग आहेत तसेच पोवाडा, लावणी व कीर्तन हे ही अतिशय महत्त्वाचें विभाग आहेत हें मराठी-वाङ्मयाच्या हितचिंतकांनीं कधींही दृष्टिआड करतां कामा नये.

### ७ पोवाडे व इतिहासः—

कित्येकांची अशी समजूत झालेली असते कीं पोवाडे म्हणजे निव्वळ इतिहास होय. पोवाड्यांतील सर्व माहिती इतिहासाच्या कठोर सत्यतेवर तावूनसुलावून निघाली पाहिजे. दुसऱ्या शब्दांत हेंच सांगावयाचें तर त्यांचें म्हणणें असें कीं पोवाडे हे इतिहासाचें एक साधन आहे.

आम्ही पोवाड्यांकडे केवळ इतिहासाचें एक साधन इतक्याच दृष्टीनें न पाहतां त्याकडे ललित वाङ्मय या दृष्टीनें पाहात आहों. पोवाडा—ग्रंथाचें स्थान इतिहासाच्या कपाटांत नसून तें ललित भावना-प्रधान वाङ्मयाच्या कपाटांत आहे अशी आमची समजूत आहे. इतिहास व पोवाडे यांचीं कार्यक्षेत्रेंच भिन्न आहेत. इतिहास चिकित्सक बुद्धीला प्रेरणा करतो तर पोवाडा भावना प्रक्षुब्ध करतो. जें कार्य इतर काव्यांचें तेंच कार्य पोवाड्यांचें; पोवाडा जितका इतिहासाला धरून असेल तितका उत्तमच; पण पोवाडा म्हणजे इतिहास नव्हे हें लक्ष्यांत ठेवणें अवश्य आहे.

### ८ ध्वनिलेखन व पोवाड्यांच्या चालीः—

आमच्या पोवाड्यांपैकीं, मुरारबाजी, संभाजी, खंडो बल्लाळ, सुधारणा कीं कुधारणा या पोवाड्यांचें संपूर्ण व झांशीची राणी, प्रतापगड वगैरे पोवाड्यांचें अंशतः ध्वनिलेखन हिज मास्टर्स व्हॉईस या

कंपनीनें केलें आहे. तसेंच या कंपनीनें आमच्या कांहीं लावण्यांचें ही ध्वनिलेखन केलें आहे. आमच्या पोवाडयांच्या सर्व चाली या रेकार्डस्च्या साहाय्यानें सहज कोणालाही बसवितां येतील. त्यामुळें पोवाडयांच्या चालीविषयीं भासणारी अडचण कायमची दूर झाली आहे.

९ **आभार**–अखिल महाराष्ट्रानें मला वेळोवेळीं प्रोत्साहन देऊन अतिशय उपकृत करून ठेविलें आहे. अशा स्थितींत मी कोणाकोणाचे व्यक्तिशः आभार मानूं ? तथापि कांहीं व्यक्तींचा नामनिर्देश केल्याशिवाय राहवत नाहीं.

**नगरें**:–प्रथम मी मुम्बापुरीचा नामनिर्देश मोठया प्रेमानें करतों. गेल्या सहासात वर्षात मुंबापुरीनें जें मला सर्व तऱ्हेनें प्रोत्साहन दिलें त्यामुळेंच या पोवाडा–लावणी–वाङ्मय–क्षेत्रांत मला थोडीबहुत सेवा करतां आली. वस्तुतः मुंबईनेंच या पोवाडयांना जन्म दिला आहे. मुंबईचे श्री गणेशोत्सव हेच या पोवाडयांना कारणीभूत आहेत. अर्थात् त्यांचें जतन करणें हें ही मुंबापुरी करीलच.

दुसरें शहर म्हणजे नागपूर. मुंबई व नागपूर या दोन महानगरापैकीं कमी कोण व अधिक कोण हें ठरविणेंच अशक्य आहे. अशीच बहुमोल मदत इतर नगरांनीं ही केली आहे.

**संस्था**—प्राज्ञपाठशाळा, वाई. या संस्थेचें नांव माझ्या अन्तःकरणांत चिरकाल राहील. या सस्थेनेंच मला पोवाडे–लेखनाची प्रथम प्रेरणा दिली आहे. इतर संस्थाः–चांद्रसेनीय कायस्थ प्रभुमंडळी, दादर मुंबई. हिंदुमहासभा, माटुंगा. ब्राह्मणसेवामंडळ, दादर. हनुमान आखाडा उमराबती. राष्ट्रियस्वयंसेवकसंघ, नागपूर, वगैरे.

**व्यक्ति**–श्रीमत्केवलानंदस्वामी महाराज (पूर्वाश्रमीचे पंडित गु० नारायणशास्त्री मराठे) यांचे माझ्यावर अनंत उपकार आहेत. श्री. श्रीपाद शंकर नवरे व श्री. परशराम पांडुरंग नरवणे यांचा निर्देश


ना. वि. गोसावी


श्री. शं. नवरे


प. पां. नरवणे



श्रीधर घोर्णीकर | शाहीर खाडिलकर | चि. मधुकर खाडिलकर | वासुदेव खाडिलकर | शिवरामपंत पटवर्धन
अनंत केळकर | राम भडकमकर



श्रीधर घीणींकर अनंत केळकर — शाहीर खाडिलकर — चि. मधुकर खाडिलकर — वासुदेव खाडिलकर — शिवरामपंत पटवर्धन राम भडकमकर



आलाच आहे. मुंबईत जर ही जोडी नसती तर मुंबापुरीचें दर्शन ही आम्हांस कदाचित् घडलें नसतें! इतर प्रमुख मंडळी:-प्रो० शिवरामबुवा गुरव, तबलावादनप्रवीण, शाहापूर (बेळगांव); श्री. धोंडो राजाराम ठाकूर, बेळगांव; श्री. गणपतराव बटाणे, कऱ्हाड; श्रीगणेशवॉच कंपनी (दादर)चे मालक; डॉ. पटवर्धन, उमरावती; डॉ. मुंजे, श्री. पागे कॉन्ट्रेक्टर व श्री. नारायणराव फडके, नागपूर; श्री. आप्पाजी जोशी, वर्धा; श्री. पावगी वकील व इतर वकील मंडळी, खांडवा; डॉ. शारंगपाणी, इंदूर; श्री. वाय्. के. कुलकर्णी, महू; श्री. हरिभाऊ मसूरकर उज्जयिनी, श्री. व्ही. एस्. घाटे व त्यांची स्नेहीमंडळी, रतलाम; प्रो. रा. ब. आठवले, अहमदाबाद. श्री. वामन मुकादम, गोध्रा; श्री. नीलकंठ विठ्ठल दळवी, मडगांव-गोवा वगैरे.

**सांथीदारः**-पोवाडे-गायनांत आमच्या बरोबर अगदीं पहिल्या पासून असलेले श्री. नारायण विश्वनाथ गोसावी (मर्ढेकर) व श्री. श्रीधर माधव घीणींकर, मलकापूर (वऱ्हाड) यांचा उल्लेख प्रथम करणें जरूर आहे. हे दो घेही अत्यंत उत्साही असून वेळोवेळीं मला उत्साह देण्यास कारणीभूत झाले आहेत. दोघांचा हो स्वभाव अत्यंत मन-मिळाऊ आहे. श्री. नारायणराव यांचा आवाज अतिशय गोड असून बुलंद आहे. श्री. श्रीधरराव हे अत्यंत विश्वासू हुशार व तडफदार आहेत. श्री. शिवरामपंत पटवर्धन व वासुदेवराव खाडिलकर यांची ही आवाजी अत्यंत गोड व सुरेल आहे. शिवाय, श्री. गोपाळराव जोशी, श्रो. विष्णुपंत जोशी, श्री. राम भडकमकर, श्री. अनंतराव केळकर वगैरे.

या पूर्वी वेळोवेळीं जे पोवाडे पृथक् पृथक् प्रसिद्ध केले होते त्या सर्वांचा संग्रह एका पुस्तकांत करण्याचा आज सुयोग प्राप्त झाला याचें सर्व श्रेय अखिल महाराष्ट्राला आहे. कर्ता व करविता तोच आहे. जगन्नियंत्याची कृपा या सर्व गोष्टींच्या ही आदिस्थानीं आहेच.

श्री. ' आदित्य मुद्रणालय, अहमदाबाद ' याचे मालक श्री. मणिलाल पु. मिस्त्री, बी. ए. यांनीं हा ग्रंथ फार थोडया अवधींत सुबक छापून दिला या बद्दल मी त्यांचा फार आभारी आहे या मुद्रणालयांत सर्व गुजराथी काम होतें; मराठी कुणाला धड वाचायला ही येत नाहीं; अशा परिस्थितींत हा ग्रंथ इतक्या उत्तम रीतीनें छापला आहे हें या मुद्रणालयाला भूषणावहच आहे.

जनताजनार्दन या ग्रंथाचे योग्य चीज करील अशी आशा आहे.

महाराष्ट्र सोसायटी,
**अहमदाबाद.**
१-८-१९३५

सर्वांचा नम्र,
**शाहीर.**

—

# अनुक्रमणिका.

# शाहीर-खाडिलकर-वाङ्मय !

## प्रसिद्ध झालेलें :-

### आख्यानें :-

| | | |
|---|---|---|
| १ | तानाजी | किं. ६ आ. |
| २ | बाजीप्रभु | किं. ३ आ. |
| ३ | हिंदवी-स्वराज्य | किं. ५ आ. |
| ४ | कीचकवध | किं. ५ आ. |

### इतर :-

| | |
|---|---|
| स्वरमंजरी:-पोवाड्यांचें नोटेशन | किं. ८ आ. |
| झेंडावंदन:-एक चटकदार ऐतिहासिक लघुकथा | किं. २ आ. |
| लावण्या:- | किं. १॥ आ. |

### लवकरच प्रसिद्ध होतील :-

१ पोवाडे-वाङ्मयाचा इतिहास.

२ काव्यमधु-स्फुट काव्यसंग्रह.

३ संस्कृत-सुमन-माला-भाग १ व २.

इंग्रजी ३, ४, ५, ६ या इयत्तेकरितां नवीन-अध्यापन-तत्त्वानुसार लिहिलेली व शाळांतून पाठ्य पुस्तकें म्हणून सुरूं करण्यास उत्युत्तम.

# पोवाडे



महाराष्ट्र—शाहीर

**पां. द. खाडिलकर**

श्री गांगेश्वर प्रसन्न

—(×)—

# नमन

**आधीं** नमन शारदाचरणा। युक्ति बुद्धि आणि शक्ति दे गातों मी कवना ॥ १ ॥ मग नमन करित गजवदना, विविध-मतिसदना अहितगणहरणा। कविह्रदयिं बोल उठवीता, गातों मी कवना ॥ २ ॥ कोल्हापूर तुळजापूर गांवच्या अंबाबाईना, राष्ट्रमातांना, राष्ट्रदेवींना ॥ महिषारि कितिक मर्दण्या यावं या सदना ॥३॥ आतां नमिन देशभक्ताना, धर्मवीरांना, हिंदभूपांना। ज्यांनीं वाजविली रणभेरी धर्मरक्षणा (देशरक्षणा) ॥ ४ ॥ पृथुराज रामदासांना, आणि शिवचरणा, तुकोबारायांना। ज्यांनीं देह आपला झिजविला आर्यभूचरणा ॥ ५ ॥ बाजीप्रभू संभाजी राणा, मावळा तो ताना, नेताजी यांना। मुरारबाजी, प्रतापराव, राजारामराजांना ॥ ६ ॥ घोरपडे संताजी, जाधव धनाजी, वीरांना, युद्धकुशलांना, निराजीपंतांना। ज्यांनीं कठिण काळीं राखिलं हिंदपुत्रांना ॥ ७ ॥ बाजीराव चिमाजीपंतांना। विश्वासरावांना, बोलाविन त्यांना! या हो, द्यावं आपलं चातुर्य

गावया कवना ॥ ८ ॥ माधवराव शूर रणवीर बोलाविन त्यांना। हैराण केला सुलतान टिपू–या कवना॥ ९ ॥ महादजी शिंदे वीरांना, जनकोजी यांना, राष्ट्रवीरांना। शत्रुची केली धुळदाण, यावं या कवना ॥ १० ॥ लक्ष्मीबाई, तात्या टोपींना, बापू गोखल्यांना, लाळ्ढ बक्षींना। ज्यांनीं दिला प्राण संगरीं गातों मी कवना ॥ ११ ॥ विष्णुशास्त्री, बाळ टिळकांना, लोकमान्याना देशभक्तांना। ज्यांनीं मार्ग नीट दाखविला आर्यनौकांना॥ १२ ॥ दयानन्द लेखरामजीना, रामचंद्रांना श्रद्धानंदांना। ज्यांनीं दिला प्राणसंगरीं धर्मरक्षणा ॥ १३ ॥ मग नमिन दासबाबूंना, चित्तरंजना, चित्तरंजना। लालाजी आणि गांधीजी यांच्या हो चरणा ॥ १४ ॥ डॉक्टर मुंजे, केळकरांना, नरसोपंतांना। गंगाधररावांना। या हो आशीर्वाद मज द्यावा, गातों मी कवना ॥ १५ ॥ खाडिलकर देशभक्तांना, राष्ट्रभक्तांना। ज्यांनीं महाराष्ट्रीं वाजविला शारदावीणा ॥ १६ ॥ आणि साऱ्या देशभक्तांना, धर्मवीरांना, संतमहंतांना। मी नमन आज हें करतों, ऐकावं कवना ॥ १७ ॥

---



॥ श्री राष्ट्रदेवता प्रसन्न ॥

---

# १

## वीररत्न तानाजीराव मालुसरे
यांचा
## पोवाडा.

---

स्वातंत्र्यसंगरीं अर्पुनि शिरकमलाला, स्वातंत्र्यदेविच्या पदीं लीन जो झाला, तो धन्य धन्य ! नरवीर कीर्तियुत होइ, ईश्वर त्यावरि संतोषला ॥ ध्रु० ॥

—: १ :—

एके दिवशीं जिजाई पहाटेला। बोलत शिवाजीला। “ कोंडाणा जेंवा दिघला। यवनाला घाला तेंवा पडला। राज्याला मोंगल काळ झाला। चित्ताचा धीर सकळ सुटला ॥ सारा मुलूख ताब्यांत ठेवण्याला। किल्ला पाहिजे झाला। स्वाधीन;

आपणाला । ना तरी सदा काळिमा लागला । राज्याला तसाच कीर्तीला । पाहिजे विचार हा केला. ॥ रामकृष्ण तुमचे पूर्वज । जनक धर्मराज । धरावी त्यांची लाज । रावणाला धाक ज्यांचा पडला । कंसाला धाक ज्यांचा पडला; । पृथ्वीचा भार कमी हो केला. ॥ ज्यांनीं धर्म सकळ बुडविला, । देश चिरडिला, । त्यांच्या नाशाला । घेतसे देव नवीन अवतार; । दुष्टांचा पूर्ण करित संहार; । लक्षांत घ्यावा तोचि व्यवहार. ॥ चाल ॥ हें राज्यपद बहु कठीण पृथ्वीवरी ॥ ती भोगलालसा सदा जगीं वावरी ॥ षड्विकार होती बहु प्रबळ अंतरीं ॥ मग शुद्धबुद्ध होईल कावरीबावरी ॥ मग दृष्टि राहिल सदैव पापावरी " ॥ ऐकुनी आइचे बोल । शिवराज चित्तीं व्याकुळ, । ह्मणे "माय ! काय आह्मि केलं ? । कधिं पाप नाहीं बघितलं, । धर्मास नाहीं सोडलं । गर्वास उभं कापलं । आळसास नाहीं पद दिलं । मन तुमच्या अर्ध्या वचनांत सदा राहिलं. " ॥ मग जिजामाउलिनं पुन्हां त्यास सांगितलं, ॥ " जर किल्ला घेण्या ऊशिर । शिवराया ! लागला फार । तर हिंदुधर्माचं शिर । तर महाराष्ट्राचं शिर । मोंगल उडवि सरसर । धर्माचा होइल चूर । पापाचा वाहिल पूर " । डोळ्यांत अश्रु सांठले कंठ दाटला ॥ गहिंवरल्या कंठामधून शब्द उमटला ॥ माघाच्या वद्य नवमीला । तो किल्ला पाहिजे सर झाला । करि पूर्ण आस ही बाळा " । शिवराज बोलले नमून मातृपदाला ॥ चाल ॥ जर पूर्व–पुण्याई





केली । असेल लाभली । होइल शिव वाली । माऊली ! आज निश्चय केला । माघाच्या वद्य नवमीला । जोडिन किल्ला मराठेशाहीला " ॥ १ ॥

—: २ :—

**उमराठं** गांव छानदार । सुरेख घरदार । लावली तलवार । कमरेला, धाक यमाला पडला । पाताळीं काळ जाऊन दडला । सौख्याला सदा मोहोर आला ॥ जसा जयंत शोभत इंद्राला । अभिमन्यु अर्जुनाला । स्कंद शंभूला । रायबा तसा तानाजीला । रायबा तसाच जनतेला । सौख्याला सदा बहर भरला ॥ शेलारमामा सांगत तानाजीला । " रायबा थोर झाला । आला हो लगिनाला । करावं औंदा लगिन ह्याचं । पाहुंया लगिन नातवाचं । चार इसावर हो वय आमुचं. " ॥ तानाजिनं होकार तंवा दिला । सोयरा बघितला । मुहूर्त मग ठरला । माघाच्या वद्य नवमीचा । थाट लइ झाला तय्यारीचा । वर्णील कुठवर ही वाचा ॥ चाल ॥ तंवा सम्द लोक जमुनशान बोलति तान्यास ॥ " लइ तान्या मोठा झालास शिवबाचा दास ॥ त्येचं थोरपण नावरूप सांगशि आह्मांस ॥ त्या शिवरायाच्या पायीं वाहिलं जीवास ॥ घरदार सोडून दिलं त्याच्या कार्यास ॥ त्यास आह्मी कधीं पाहावं ? । त्यास आपण कधीं देखावं ? ।

डोळ्याचं पारणं फेडावं ? । 'हा ताना शिवरायाच्या मर्जीतला ' ॥ असं कौतुकानं सदानीदा सांगशि आह्मांला ॥ या वेळेस त्यास आणवावं । त्येनं आमचं गांव पाहावं । त्येनं आपलं राहणं देखावं । हें असं ध्येनांत धरावं । जा शेलारमामा ! तुह्मी त्यास आणावं " ॥ चाल ॥ तानाजिनं इचार जरा केला । मामास सांगितला । रायबा संग घेतला । तिघेही झाले घोड्यावर स्वार । बाळ तरुण ह्मातारपणाचा अवतार । जाहला जगांत जय-जयकार ॥ २ ॥

—: ३ :—

**ऐका** तंवाच राजगडावर । झालेला प्रकार । युद्धास घन-घोर । आलं हो मूळ, प्रसंग थोर । ऐकावं शांत होउन सारं । चित्ताचा सोडुं नव्हे धीर ॥ 'युगत करून शिवाजी सुटुन गेला । दिल्लीहून गेला । मराठ्या प्रांताला । होईल राग त्याचा अनिवार । करिल गट्ट मोंगल सरकार । दक्षिणेंत होईल मराठा कारभार ' ॥ औरंगजेबानं विचार असा करुन । पन्नास हजार देऊन । शिपाई शिस्त करून । धाडिला उदयभान सरदार । कोंडाणा किल्ल्याचा सम्दा अधिकार । शाहानं दिला तयास बहुकाळ—॥ असा कागद घेऊन हेजिब आला । जयसिंगानं धाडियेला । त्याच समयाला । रायाच्या चैन मनाला पडेना ।





तान्ह्याच्या राया करित स्मरणा । नव्हते कां दुसरे सरदार नाना ? ॥ चाल ॥ हा विचार करिती शिवबा किल्ल्यावरी ॥ तों तानाजी पोंचले राजगडावरी ॥ ती अक्षत देण्या झाली त्यांची तय्यारी ॥ ती जिजामाउली त्यांची इचारपुस करी ॥ हें जाणून ताना चपापला अंतरीं ॥ हें असें कसं आज झालं । शिवरायानं नाहिं देखिलं । त्येच्या मनांत काय हो आलं । तें अजून नाहिं सम-जलं । लगिनास आलों आह्मीं त्याला बोलवायाला ॥ परि येत्या वेळेला सकून सुभ नाहिं झाला ॥ तर त्यास जाऊन भेटावं । त्येचं मन सम्द वोळखावं । शिवबानं सदा ह्मोर यावं । आधि कडकडून भेटावं । मग आमचा हात धरून किल्यावर न्यावं ॥ परि असं कसं आज व्हावं । याचं कारण त्याला पूसावं । मग मामा ! लगिनामंदि एकमन व्हावं ' ॥ चाल ॥ मग तडक तिघे निघाले । सरासर गेले । जेथें शिव बसले । युद्धाचा करित सकळ विचार । देशाचा होते करित संसार । आयास म्हणुन पडतोय फार ॥ ३ ॥

—: ४ :—

**पाहुन** तान्याला शिवाजि पुढं झाला । हातानं धरियेला । आणुन बसवीला । विचारी क्षेम तानाजीरावाला । मामाला आणिक रायबाला । येण्याचं तसं कारण त्याला ॥ चिंतेच्या

अधीन परि पुरा । रायाचा चेहरा । तानाजीस दिसला । बोलला शूर मराठा सरदार । धैर्याचा मूर्तिमंत अवतार । प्राणाचा नाहिं तयास दरकार ! ।। "तुमचं कुशळ आधीं एकावं । मनानं आनंदावं । नंतर परिसावं । आमुचं, । हाच उचित व्यवहार । राज्याचा दिला देवानं अधिकार । सांगावा आपला कुशल समाचार ।। जसं प्रसन्न तुह्मां पाहिलं । पूर्वी मन धालं । नाहीं तसं देखिलं । भेटिच्या आजच्या समयाला । चंद्राला राहू चिंतेचा लागला । चित्तानं असा कयास केला" ।। शिवराज छत्रपति बोले । "विशेष नाहीं झालं । विचार सारं चुकलं । आपुल, असे कुशळ आमचं । आतांच तानाजीराव येण्याचं । सांगावं काय कारण तुमचं" ।। चाल ।। मालुसरे लागले बोलण्याला, आनंद जरा झाला, तांदुळ पुढं केला, चित्ताचा हो फुलला, बाग; परि गेला, घटकेंत वाळुनी सारा ! ।। शेलारमामानं सांगितलं आह्मांला, रायबा थोर झाला, आला हो लगिनाला, सोयरा बघितला, मुहूर्त मग ठरला, माघाच्या वद्य नवमीला ।। सारे लोक बोलले आह्मांला, 'ऐशा समयाला, शिवबा पाहिजे आला, आमच्या गांवाला, भेट देण्याला, होईल तोष डोळ्याला' ।। सारीं कामं ठेऊन बाजूला, जिजाईमाईला घेऊन गांवाला यावं लगिनाला, तोष दासाला । होईन, धन्य भूपाला" । खळबळे प्रेम चित्तांत, आनंद मिळत दुःखांत ।। शिवराज बोलले तान्यास,।। आमचं मन धांवे येण्यास, ।। चाल ।। पर शरीर दुसऱ्या





कामावर । झालं तय्यार । घेउन समशेर । कोंडाणा किल्ला कराया सर । माउलिनं घातली शपथ घोर । पुरवावी हीच आशा थोर" ।। ४ ।।

—: ५ :—

'**माघाच्या** वद्य नवमीला । किल्ला पाहिजे झाला । आपला, जन्माला ! ना तरी गनिम खास बसला । काळिमा लागेल कीर्तिला । जन्मुन काय उपयोग केला' ।। अशि शपथ घातली माउलिनं । प्राणहि अर्पुन । करिन स्वाधीन । कोंडाणा, जावें तुम्ही परतून । रायबाचं लग्न टाकावं उरकून । थाटानं यावं नंतर परतून ।। या वेळेस स्वारिवर जावं । स्वतांच अनुभवावं । युद्ध करावं । आशा ही झाली आह्मां अनिवार । हातांत घेतलि भवानी तलवार । आह्मां श्रीअंबाबाई आधार" ।। हे शब्द हृदयिं झोंबले । मर्मि लागले । ताना मग बोले । संचरे आर्यतेज हृदयांत । संचरे क्षात्रतेज अंगांत । उपमा नाहीं तिनहि लोकांत ! ।। "आधीं लग्न लाविन कोंडाण्याचं । नंतर रायबाचं । हेंच ब्रिद आमुचं । वाहिला देह त्याच कार्यास । युद्ध मोक्षाचं दार आह्मांस ! आपुलं साह्य दीन दासास ।। चाल ।। जरि आमच्यासारखं पडतिल लोक रणावर ।। महाराज ! तरी मिळतिल रोज भाराभर ।। रंगेल लाल रक्तानं त्यांची समशेर ।।

आपण जर जालं बिनिवर । बरंवाईट झालं तर । मिळतील काय अवतार । दिसतात सूर्य कां फार । दिसतात तारे भरपूर । आमच्यासारखं लोक घरोघर । तुमच्यासारखं येक होणार । राहो लोभ तुमचा आह्मांवर । करो दया आज शंकर । सोडा हुकूम जाण्या रणावर । माघाच्या वद्य नवमीला किल्ला हो सर ।। झालाच असं समजावं तरिच हा वीर ।। ना तरी अंबेच्या पार्यी वाहिन शीर ! " ।। चाल ।। अशि प्रतिज्ञा करून निघाला । सुचेना अन्य त्याला । गात कवनाला । बंधुनो ! ऐका चरित्र त्याचं । शूराचं प्रतापि पुरुषाचं । पावन होईल मन आमुचं ! ।।५।।

—: ६ :—

**लगिनाचा** बेत रद्द केला । घेऊन सूर्याजिला । टेहेळणी करण्याला । चालला वेश करुन न्यारा । वळविलं रायाजी नाईकाला । एकावं त्येच्या पोवाडयाला ।। घेरेसरनाईक रायाजी । मोठा रणगाजी । ह्मणतो परी 'हां जी !' । यवनाला, मोह मनाला पडला । मोंगलाचा दीन चाकुर बनला । मर्दाचा सम्दा इचार चुकला ।। त्येच्या मुलीच्या लग्नामंदि गेला । तान्हा गोंधळाला । गात कीर्तीला । शिवबाच्या, झाला सारा लोक गार । चित्ताला त्यांच्या त्यानं केला वार । हातांत ओढली त्यानीं तलवार ।। रायाजि नाइक बोलला । तंवाच गोंधळयाला ।





जाणलं त्येनं त्याला । ज्याची हो खूण त्याला कळणार । चित्ताचा झाला त्याच्या निर्धार । यवनाचा आला त्यास तिटकार ।।चाल।। " अशि रावजी ! तानू गोंधळ्याला । वळखिलं सम्दं ! तुह्मांला । गोंधळ्याचा पोशाख केला । अन् माझं मन पाहुण्याला आला व्हय ? । केलं आज पुनित देहाला । दयेचा समिंदर झाला । काय हुकूम सांगावा मला । लइ दिसानं योग हा आला । आज जीव आमचा वाहिला शिवबादादाला ।। देवलोक सम्द खाली आलं वाटतं आह्मांला ।। राखाया गोरगरिबाला । राखाया गाय माउलीला । राखाया आपल्या धर्माला । धन्य धन्य तोंड गावना तुमच्या कीर्तीला ! " ।। तानाजी लागला बोलण्याला । " दावावा बुरुज आम्हांला । पाहुं या तट आम्हांला । रोखु या जागा आम्हांला । जिथूनं चढुनशान गांठावं उदयभानाला " ।। चाल ।। घेरेसर रायजि नाइकाला । घेऊन संगातीला । रोखुन बुरुजाला । परतले तानेराव सरदार । भवानी साह्य ज्यास करणार । वर्णन त्याचं कसं हो सरणार ? ।। ६ ।।

—: ७ :—

**तीन** इसा मावळ संगातीला । घेऊन जाण्याला । सांगुनशान भावाला । चालला ताना कोंडाण्याला । पूजिलं शंभुभवानीला । घेतलं तोस आपल्या मदतीला ! ।। निघतांना सांज

लइ झाली । दौड परि केली । गांठली त्यांनीं जाळी । रात्रं नौधाच्या घटकेला । काळोख सर्वांमंदि भरला । घुबडांनीं गोंधळ लइ केला ॥ झुंजार बुरुज गांठला । येशीच्या शेंपटीला । लावुन सोलाला ! बोलला तान्हा घोरपडीला । चित्ताला त्याच्या घोर पडला । पडलेला दूर तिनं हो केला ॥ ' यशवंती ! सदा यश दिलस् । म्हणुन ठेवलं । नांव तुझं भलं । देइ ग आज बी तेंच मजला । पुरविन तुझ्या कौतुकाला । घालिन खायला ग्वाड तुजला ! ' ॥ असं म्हणुन सोडलं वर तिला । गेली सरसरा । आला पर फेरा । दैवाचा, बाई खालत फिरली । पहिल्यांदा तिनं ही कच खाली । असली ती गोष्ट कधिं न झाली ! ॥ चाल ॥ मग तान्हा बोलला रागानं येशवंतीला ॥ " आज इचार काय ग तूं हा केलास् ? असा कधिं नाहीं बघितला । अपशकुन आज मला झाला । पर आमचा देह कधिं मागं नाहीं परतला ॥ आणि एकदां सोडतो वर तुला । तत चिकाट धरून धीराला । नाहिंतर उडविल तलवार तुझ्या ग मुंडक्याला " ॥ घोरपड धांवली सरसरा । वर बसली पाहुनी थारा । मग तान्हा झाला सामोरा । त्यानं घट्ट धरलं सोलाला । हिस्का मारुन् पाहिलं दोराला । सरसर चढाया लागला । जीवाची फिकीर नाहिं त्याला । ' चला याहो ' बोलला लोकाला । झरझरा मावळा चालला ! । वर भगवा झेंडा चालला ! । झटकनं तान्हा झुंजार-बुरजावर गेला ! ॥ अक्षि वायसा सुद्धां गलबला । मावळ्यांनीं





बघावा नाहीं केला । तत मांसारक्ताचा काला । मावळ्यांनीं बघावा लइ केला । असा धुमाकूळ माजला । तंवा कळलं त्येंच्या लोकाला । खडबडून जागा मग झाला । मोंगलभाई बोलला । ' सैतान किल्ल्यावर आला ' । या कोणी राखा आम्हाला ' ॥ चाल ॥ आतां कोण कसला येणार ! तुजला राखणार । ताना घेणार । नरडिचा घोट होउनि लाल । केल्या पापाचं फळ भोगाल । आला या मर्तभूमिवर काळ ॥ ७ ॥

—: ८ :—

**अशी** कत्तल करुनि सरसरा । सांठवुनि शिरा । करुन मळमाला । आईच्या तान्हां लावि हृदयास । आला हो आला पूर शौर्यास । देखिल त्यानं उदयभानास ॥ "हरहर महादेव" बोला । आला ऊत भला । खोऱ्यामंदिं भरला । भानाला तान्हा सिंहापर खास । थरथरे काळ पाहुनी ज्यास । धांवला तो पार-तंत्र्य चिरण्यास ॥ उदयभान वीर खळबळे । लाल झाले डोळे । तान्हा मग बोले । भानुला, देहभान नुरें त्यास । धर्माचा लागे त्याचा मनीं ध्यास । भानुच्या उदयिं गुंतली आस ॥ चाल ॥ " तूं उदयभान सरदार । रजपूत जातिचा वीर । तूं हिंदुधर्मा आधार । तूं हिंददेशा आधार । रामकृष्ण तुमचे पूर्वज होते नरवीर ॥ गायिवासरं पाळुनी कृष्ण झाला लइ थोर ॥ आज

शिवानं घेतला अवतार। त्यास यश खास येणार। तूं मातिमोल होणार। घरची बाईल ओढुन नेती। टकटका बघाया लावती। चराचरा गाय कांपिती। घटघटा रगात पिती। आमच देव समदं फोडिती। धर्मास दुष्ट तुडविती। तोंडांत मांस घालती। साधुसंता त्रास लइ देती। बायकांच्या अंगा झोंबती। त्यांची करणी सांगावी किती ?। अभिमान गेला शौर्याची झाली बघ माती ! ॥ चाल ॥ तूं शूर मर्द सरदार। धर्मा आधार। जातिशीं वैर। साधुनी जाशि घोर नर्कांत। येउं दे आर्यतेज अंगांत। होईल कीर्ति तिनही लोकांत" ॥८॥

—: ९ :—

**उपदेश** गेला परि वांया। सत्तेची माया। सूडाची छाया। पसरली उदयभानावर खास। मोंगलाचा धरला त्यानं विश्वास। जोरानं धावला वार करण्यास ! ॥ तानाजी सिंह खवळला। धावुन गेला पट्टा लइ फिरला। युद्धाला आला रंग अनिवार। बिजलिची करणी करित तलवार। दोघेही होते मोठे लढणार ॥ दैवाची करणी परि न्यारी। फिरला माघारी। देव कंसारी। भानानं केला तान्यावर वार। डाव्या हाताला रक्ताची धार। लागली; पडली भूमिवर ढाल॥ गुंडाळून हाताला मुंडासा। झाला कसाबसा। सज्ज, परि फांस। दैवानं घातला, कोण काढणार ?।





दैवाला दया कधिं न येणार। भाळीं जें लिवलं तसंच घडणार ! ॥ तो धैर्यमेरु उमळला। धरणीवर आला। झाला जीव गोळा। सोडुन देह गेला स्वर्गास। भानानं हाणली लाथ डोक्यास;। पापाची भरली त्याच्या घडी खास ॥ इतक्यांत टोळी घेऊन सूर्या वर आला ॥ त्येनं पाहिलं पळत्या लोकाला। त्येनं पाहिलं पळत्या मावळ्याला। "कुठं जातां ?" बोलला तो त्याला। सूर्याला मावळा बोलला। 'अहो ताना पडला धरणिला मोठा घात झाला'। डोळ्यांत अश्रु दाटला। पर मोठा धीराचा पडला। तलवार रोंखुन बोलला पळत्या लोकांला ॥ "अर भित्र्या लेकांनो ! जरा। ईचार मनामंदी करा !। अर लढुनशान तरि मरा। इथूनं पळुनशान जाउन अमर काय झाला ? ॥ जो भ्याड पळपुटा झाला। तो खास गेला नर्काला। ठेवावं खालतं भाल्याला। नेसावं चोळिलुगड्याला। कमरेच्या सोडुन शेल्याला। नेसावं बायकी शालुला। डोक्याला लावुन कुकवाला। हातांत भरून बांगडीला। मग पळुनशान जाऊन राखा जीवाला ॥ काय आल्या धरुन दोराला। जाणार सांगावं मला ?। तो दोर तुमच्या आधींच झुंजुन मेला ! ॥ लइ जपुनशान जीवाला। कायमचं काय राहिला। इथनं जाउन्शान गांवाला। सांगाल काय राजाला ?। 'हरहर महादेव' बोला। चला घुसूनशान उडवुया लाख मुंडक्याला" ॥ चाल ॥ धन्य ! धन्य ! सूर्याजीराव। उतराई व्हावं। कशानं सांगावं। भावाचं

दुःख लोटुनी पार । देण्याला जीव झाला तय्यार । घेऊन याल कधिं हो अवतार ! ॥ ९ ॥

—: १० :—

**पुन्हां** सारा उलटला भाला । मावळा एक झाला । केला मग हल्ला । मोंगलाची झाली तारपिट फार । पळती हो खाल्ला त्यांनीं लइ मार । घेण्याला लावली त्यांना माघार ॥ मामाची झुंज लागली । भानाशीं भली । घालुन खालीं । भानुला धाडलं घोर नर्कांत । फडफडे भगवा झेंडा किल्ल्यांत । प्रसिद्ध झाला तिनहि लोकांत ॥ वृत्तांत सारा घडलेला । कळला राजाला, । लागली डोळचांला । पाण्याची धार, गेला आधार ! । शिवबाला तान्हा प्राणापर प्यार । दुःखाचा झाला त्यास लइ भार ॥ हुंदक्यानं आलां उमाळा, । शिवबा बोलला । "हाय ! घात झाला । ठेवुन पृथ्वीवरती आह्मांस । सोडुन गेला ! तान्हा स्वर्गास ! । दैवाला नाहिं दयालव खास ॥ चाल ॥ स्वातंत्र्यदेविच्या गळ्यामधुन मणि गळला ॥ काय एकदांच सद्भाग्यचंद्र मावळला ॥ तो देशभक्तिचा सिंधु कोरडा पडला ! ॥ माणीक एक हरपला ! । स्वातंत्र्यहंस तो मेला । ताच्यात आला गड परी सिंह तो गेला ! ॥ **पांडुरंग** शाहीर गातो त्याच्या कवनाला ॥ १० ॥

भाद्रपद शु० १–१८४८.



# २

## वीरमणि बाजीप्रभु देशपांडे

यांचा

## पोवाडा.

---

धन्य धन्य बाजी रणवीर । धन्य अवतार । धन्य तो शूर ।
धर्माच्या कामीं जो जो मरणार । त्याचा जयनाद जो
जो होणार । शाहीर **पांडुरंग** गाणार ॥ ध्रु० ॥

—: १ :—

**अफझुल्लाला** ठार केल्यावर । झालं विजापूर । भीतिनें गार, शाहा मग झाला मोठा बेजार । फार मोठं झालं त्याला शेजार । जडला जणू घोर त्याला आजार ॥ सारे अमीर करिती विचार । आतां जाणार । गांव विजापूर । लौकर सैतानाच्या कबजांत । होणार सारा घोर आकांत । साधावा कैसा त्याचा हो घात ॥ अफझुल्लाचा मुलगा फाजलखान । झाला हैराण । सुचेना त्याला आन । सूडानं घेरलं त्याच्या हृदयास । येईना

झोंप, झाला कडु घांस । अंगाचं आटलं त्याच्या लइ मांस ॥ सदा झाला शिवराया काळ । लागली तळमळ । परि तो दुर्बळ । एकला काय शिवाला करणार । सिंहाला कोल्हं कसं हो धरणार ? । मुंगसाला साप काय करणार ? ॥ चाल ॥ एके दिवशीं अफझुल फाजलाच्या स्वप्नामधीं आला ॥ बापाला आपल्या पाहून फाजल दचकला ! ॥ अफझुल्ला तंवा बोलला आपल्या लेकाला ॥ ऊठ कारट्या ! काय निजलास ? । गोड लागतो काय रे तुला घास ? । नेभळट पोरट्या ! झालास । गनिमानं शीर कापून टांगलं किल्यास ॥ तंवा फौज घेऊन तयार लेका ! होतास ॥ तत्नं मूर्खा ! पळून जाऊन राखल जीवास ॥ मरणाला भित्र्या ! भ्यालास । चल त्याचं मुंडकं आण्न टांग वेशोस " ॥ असा झाला फाजलाला भास । विसरला देहभानास । ताडकन उठून तलवार लावली कमरेस ॥ खडखडा दार उघडून गांठलं वेशीस ॥ वेशीच्या वरच्या बाशास । टांगलेलं होतं लइ दीस । रामरायाचं मुंडकं; मग त्यास । तलवार मारून बोलला तंवा कवटीस ॥ " झालं सरलं आतां तुझ दीस । तू पड आतां धरणीस । टांगीन इथं शिव्याचं मुंडकं मी खास ॥" ॥ चाल ॥ असं झणुन फिरला माघारा । गेला झरझरा । आपल्या घराला । रात्र ती झाली कष्टमय फार । सूडाचा झाला त्याचा निर्धार । ऐकावा पुढचा सारा प्रकार ॥ १ ॥





—: २ :—

**दुसरे** दिवशीं गेला दरबाराला । बोलला अदिलशाला । " गप्प काय बसला ? । आला सैतान विजापुरला । समजावा नाश सकल झाला । त्याचा काय बंदोबस्त केला ? ॥ पाचोळा जसा वाऱ्याला । रान वणव्याला । दिवटी सूर्याला । अदिलशहा तसा शिवाजीला । झाला काय सांगा राव ! मजला । पाहिजे आपला विचार कळला ॥ दरबारीं थोर अमीर, । भले झुंजार । पाठवुनि चूर । शत्रुचा करा आज सरकार । नाहींतर आपला नाश होणार । शाहिचं चांगलं दिवस सरणार " ॥ अदिलशाह घाबरून गेला । बोलला फाजलाला । " शिद्दी जोहाराला । घेऊन करा तुह्मी त्याला ठार । नंतर करून मोठा दरबार । थाटानं देऊं तुह्मां तलवार " ॥ चाल ॥ फाजलखान शिद्दीजोहार झाले तय्यार ॥ मेजवान्या त्यांना थाटाच्या झाल्या घरोघर ॥ त्यांनीं फौज घेतलि भरपूर । दारुगोळा केला तय्यार । किती घोडा होता गणतिला नाहीं हो पार ॥ घोड्यांना घातले अलंकार । पायातनं बांधले घुंगुर । डोक्याला लावले पिसार । मग वरती चढली खोगीर । त्यांवर बसले रणशूर । बडेबडे होते अमीर । ते सारे झाले तय्यार । हातांत नंगी तलवार । अशी फौज चालली गनिमाला कराया ठार ॥ जंवा जातां जातां तळ देती । तंवा ऐका, काय काय करिती । मोठमोठे डेरे लावतो । गांजाचा

नाद हो अती । अक्षि पिऊन झिंगुन जाती । मग नाचरंग चालती । त्यांचा थाट सांगावा किती ! । त्यांना दाणा वैरण किती । लागे त्याला नाहीं गणती । गरिबांना धाक घालती, । त्यांच्या गंज्या काढुन नेती । नाहींतर पेटवून देती । लोकांच्या घरोघर जाती । गाइवासरं धरून कांपिती । बायकांना ओढुन नेती । त्यांचीं घरं सम्दी धुंडती । पैसा अडका लुटून नेती । मग हातीं दिवटी घेऊन आगी लावती ! ।। जवा लोक रडाया लागती । तंवा सारे 'खो खो' हांसती ! ।। त्यांच्या तोंडांत फेकती माती । इरसाल शिव्या मग देती । जर कोण अंगावर येती । तर त्यांना दोऱ्या बांधती । आधीं त्यांचीं नाक कांपिती । लोखंडी सळ्या मग घेती । लाल भडक त्यांना करिती । मग डोळयामध्नं खुपसती । मग हातपाय तोडती । असं हाल करून मारिती । नाहींतर सुन्ता करून भाई बनविती ।। चाल ।। मराठी राज्याची कळी । नवी उमलली । तिच्यावर आली । टोळांची धाड, काय होणार । कळेना काय काय घडणार । दैवाचे खेळ कसे हो कळणार ! ।। २ ।।

—:३:—

**ही** वार्ता कळली शीवाला । सावध झाला । गेला पन्हाळ्याला । करून बंदोबस्त सगळा । किल्यावर दारुगोळा





चढला । तय्यार सारा लोक झाला ।। नुकत्याच प्रतापगडाखालीं । झालेल्या भारी । लाल तलवारी । पुन्हां पन्हाळगडावरती दिसल्या । वीरांच्या हातामध्नं रमल्या । तहानेनं व्याकुळ लइ झाल्या ।। सूर्याच्या किरणांनीं सारे । चमकले भाले । तय्यार झाले । चिरण्याला कंठनाळ सगळे । डोक्यावर जिरे टोप चढले । हातांत धनुर्बाण आले ।। अन्नाचा पुरवठा केला । तय्यार झाला । तोंड देण्याला । यवनाला मराठ्यांचा गोपाळ । यवनाला मराठ्यांचा भूपाळ । यवनाला हिंदधर्माचा लाल । यवनाला हिंददेवीचा बाळ । काळाचा काळ्याकुट्ट कळिकाळ ।। 'शिवराय पन्हाळगडावर' । ऐकून सुभेदार । शिद्दी जोहार । फाजलखानासकट तिकडं वळला । झटकन किल्ल्याखालीं आला । किल्ल्याला त्यांचा वेढा बसला ।। चाल ।। नेताजी पालकर शूर । त्यानं केलं शिद्दीला जेर ।। परि फौज होती भरपूर । म्हणून होता शिद्दीला जोर ।। चौक्यांचा पहारा चौफेर । चहुंकडे ठेविले हेर ।। करि नाच नंगी तलवार । रक्ताला झाली आतुर ।। चाल ।। झाले आठ महिने तरी होता शिद्दी जोहार ।। वेढा काढुन जाईना; मग केला शिवानं विचार ।। नेताजी, बाजी रणगाजी जमविले वीर ।। मग त्यांना बोलला शिवबा जें ऐकावं सारं ।। "किती दिवस असं हें चालणार ? । दोनं वर्स वेढा बसणार । एक वर्स अन्न पुरणार । मग अन्नपाणि सरणार । तंवा उपासमार होणार ।। यवनांच्या पाया पडणार । कां आतांच

कांहीं करणार ? " । मग बोलले शूर सरदार । " कांहीं तोड आतांच काढून व्हावं हो पार " ॥ असा त्यांचा बेत जंवा झाला । तंवा राजा शिद्दीकडं गेला । ऐका जी काय बोलला । " तुमचं पडलं फार भय मला । द्यावं जीवदान हो मला । ध्यावं पदरीं दीन लेंकराला । शहाचा मी अपराध केला । ह्मणून आतां पश्चात्ताप झाला । देतों मी त्याच्या मुलखाला। हा किल्ला ठेवा पण मला। हा दास शरण तुह्माला " । असं बोलला सुभेदाराला । शिद्दीला आनंद झाला । मग बोलला शिवरायाला । " जीवदान आतां तुला दिला । पर किल्ला पाहिजे आह्मांला । तो नाहीं मिळणार तुला " । जरा दादा द्यावं चित्ताला । सांगीन आतां तुह्मांला । शिवराय फिरून शिद्दीला काय बोलला ॥ " सुभेदार थोर तुह्मी झाला। अन् किल्ला नाहीं ह्मणतां कां मला ! । द्यावं आतां एवढं पोराला। द्यावं एवढं वचन लेंकराला । आज काय तो विचार तुह्मी करा। पुन्हा उद्यां येइन भेटिला। तंवा काय तें सांगावं मला " । असं बोलून डाव करून किल्ल्यावर गेला ! ॥ चाल ॥ आनंद फार तंवा झाला । शिद्दी जोहाराला । धरून दाढीला । बोलला " अल्ला ! डाव केला । काफर खास आतां धरला " । पण त्याचा काव काय रे कळला ! ! ॥ ३ ॥





—: ४ :—

**समेटाचा** बहाणा असा केला। गाफिल झाला । पहारा, ढिला पडला । दारुला आला ऊत अनिवार । झिंगून गेले अमीर सरदार। खरोखर वेडा शिद्दी जोहार ! ॥ जो हार सिद्धिचा झाला । रामीं रत झाला । तो कां जोहाराला । करील रावजी ! सांगा जोहार। जाईल काय त्याला शिव हार । ज्याला सारी हार जाणार हार ! ॥ जोहार बालला आपणाला । " यंव रे उंदराला । पिंजऱ्यांत धरला; । घेऊन जातों विजापूरला । पठ्यानंच त्याला कैद केला। दुसऱ्यांना डाव नाहिं जमला " ! ! ॥ ॥ फाजलखान बोलला आपणांला । " सूड पुरा झाला ! । कापुन शिवाजीला । वेशीला ह्या मर्द मुंडकं टांगणार । बापाचं देणं सारं फेडणार । मोठा मग मानकरी मी होणार ! " ॥ चाल ॥ आशेचा असा डोलारा । फाजलानं मनांत उभा केला। विसरला देहभानाला । दारुनं झिंगुन गेला । इकडं विचार काय मग झाला । शिवाजीनं काय बेत केला । ऐकावं सांगतों तुम्हांला। हेरानं आणल खबरेला । लगबगीनं बोलला राजाला । " महाराज ! ऐका वचनाला। आज पहारा ढिला लइ झाला । जंवा गेलो होतों फिरण्याला । झोंप आली होती पहाऱ्याला । अर्धमुर्ध होतं जागेला । त्यांचं बोलणं आलं कानाला । त्यांचं ह्मणणं दिसलं हो मला । आज गनिम हातीं लागला । कां वेर्थ ध्यावं

तसदीला ? । अन् त्रास द्यावा आपल्या जीवाला ? । लइ दिवस राच जागुन वेडा जीव झाला ! ॥ आतां पहारा सारा झोंपला । चौकीवाला जोरसे पेंगला ! । अशी बातमी घेऊन आला । हा दास आपल्या चरणाला । पुढचं सांगण नाहीं ठावं मला । तें आपलं ठाव आपणांला " । असं बोलून बातमी देऊन हेर तो गेला ॥ शिवाजीनं काय बेत केला । निवडक घेतल लोकांला । अन् किल्ल्याखालीं चालला । दादा ! किल्ला सारा उतरला । पर कळलं नाहीं कोणाला ! । रात्रिला घोर लागला । चहूकडं काळोख झाला । जंवा कृष्णजन्म बघा झाला । तंवा भूल पडली पहाऱ्याला । टोपलींत घालुन लेंकराला । वसुदेव वाड्यांतून आला । तरी कळलं नाहीं कोणाला ! । यमुनेला उतार झाला । तंवा पार पलीकड गेला । अस लहानगं बाळ घेऊन गोकुळांत गेला ॥ थेट तश्शी भूल पहाऱ्याला । बघा पडली ! एक योग झाला । ह्मणून कृष्ण ह्मणावं शिवाला । शिव कृष्णरूप हो झाला । भेदभाव नाहींसा झाला । चौकीवाला घोरूं लागला । सारा पहारा गारद केला । शिवाजी पुढं मग गेला । जितका त्याला पहारा भेटला तितका गार केला ॥ रक्ताचा पाट चालला । पर कळलं नाहीं कोणाला । पिजऱ्यांतून पक्षी उडाला । करा जागं आतां शिद्दीला । बघ ह्मणावं बेरकी उंदराला । करा जागं आतां फाजलाला । बघ म्हणावं आतां काफराला । हातावर तुरी देऊन तुमच्या हो गेला ! ॥ चाल ॥ गर्वाचं घर सदा





खालीं । असं लिहिलं भाळीं । सत्याचा वाली । सदा प्रभुराय झाला गोपाळ । पार्थालाच घातली कीर्तीनं माळ । खळाचा नंदबाळ हा काळ ॥ ४ ॥

—: ५ :—

**दोन** घटका गेल्यावर झाला । मोठा गलबला । जो तो म्हणे " अल्ला ! । गारद केला सारा पहारा । रक्तानं रस्ता सारा भरला । देखो सैतान पार झाला " ॥ तंवा आला शिद्दी जोहार । रक्ताचा पूर । पाहून झाला गार ! । चित्तावर आली दुःखाची खार । राग पर त्याचा झाला अनिवार । म्यानांतून ओढली त्यानं तलवार ॥ फाजलखान झाला बेफाम । सुटला त्याला घाम । जिरला सारा जोम । म्हणे ' क्या हुवा अल्ला ! गेला ' ! अल्ला काय सांगणार तुजला ? । त्याचा तुला कावा नाहीं रे कळला ॥ मग जोडणी केली लवकर । चालले हो स्वार । बारा हजार । पाठलाग केला त्यांनीं जोरदार । फौजेवर होते दोन सरदार । फाजल आणि सिद्दी अजीज सुभेदार ॥ चाल ॥ पुढं धावे सूर्य, पाठीमागें केतु असुर ॥ पुढं धावे चंद्र, मागं लागला राहु जणूं चोर ॥ पुढं धर्म, मागं अधर्म धांवतो स्वैर ॥ पुढं नीति, मागं अनीतीचा लागला विचार ॥ स्वातंत्र्य पुढें, मागं लागे दास्य चिरकाळ ! ॥ रात्रिनं काळोख

केला । दिसेना कांहीं कोणाला । चांदण्यांनीं नाच बंद केला । आभाळांतुन चांद निघाला । शिवाच्या डोईवर आला । त्यांनीं कां हो नाच बंद केला ! असं ह्मणतां ? सांगतों तुम्हांला । शिव घोड्यावरती स्वार झाला । अन् चालला दौड विशाळ-गडाला । त्याच्या भाळीं चंद्र शोभला । पाहवेना हें दैत्य राहूला । चंद्राला आतां गिळण्याला । शिवामागं राहू लागला। पाहवेना त्यांना हा घाला । ह्मणुन त्यांनीं नाच बंद केला । ढगाच्या ओढलं पडद्याला । अन् सांगायला गेल्या सूर्याला । काय बोलल्या ऐका सूर्याला । "असा असा प्रकार झाला । आमचा पती पृथ्वीवर गेला । त्याच्यामागं राहू लागला। त्याला सोडवायाला हो चला" । इकडं काय प्रकार झाला । ऐका जी सांगतों तुह्मांला । भर रात्रीं घोडा फेकला । झाले चार तास हो त्याला । वारा मंद वाहू लागला । पहांटेचा सुमार झाला । विशाळ गड दिसूं लागला । तीन कोस किल्ला राहिला । आनंद झाला शिवाला । काय बोलला ऐका लोकांला । अंबेनं कृपा करून तारलं आह्मांला ॥ आतां राहिलं नाहीं भय मला। आवाज कसला पण झाला ? । 'टप् टप् टप्' हं! आला!। आला ! शत्रु पाठीवर आला । चला मारा टांचा घोड्याला । चला गांठलं पाहिजे किल्ल्याला" । प्रसंग जीवावर आला । पुन्हां घोडा दौड घांवला । घोड्यांना फेंस बघा आला । फाज-लखान पाठीवर आला । जीव सारा कासाविस झाला । पर





शिवा नाहिं बघा भ्याला ! । पुढच्या चौकीं सांगिन पुढचा प्रकार जो झाला ॥ चाल ॥ आली आणीबाणीची वेळ । युद्ध जंजाळ। रक्तबंबाळ । झाल्यावर कोण कोण मरणार । झाल्यावर काय काय घडणार । आपणाला सांगा कसं हो कळणार ? ॥५॥

—: ६ :—

**जंवा** तांबडं फुटलं पूर्वेला । गनिम शिवाजीला । येउन तंवा भिडला । परि राव नाहिं शिवा डरला । तयार झुंजण्याला झाला । थोरांना जीव केरकचरा ॥ त्याला नव्हतं जीवाचं भय। होता निर्भय । वाटलं परि भय । दुसऱ्यांना शिवा प्राणाहुन प्यार । राज्याचा तेवढा एक आधार । अंबेच्या कंठामधला प्रिय हार । देशाच्या ऐका जी कार्जी । नित्य जो राजी । तोच रणगाजी । बाजी प्रभु देशपांडे सरदार । चित्ताचा होता मोठा दिलदार ! । शौर्याचा मूर्तिमंत अवतार ॥ चाल ॥ पाहुन असला घोर प्रसंग बाजी पुढं झाला ॥ स्वातंत्र्यवीर रणगाजी बोलला शिवाला ॥ " महाराज ! विनवि तुह्मांला । ऐकावं माझ्या शब्दाला। शत्रु हा हांकेवर आला । ही खिंड भली हो मला । इथ राहुन धरतो शत्रुला। चार लोक धरती हजाराला। या संधि येवढो दासाला । करामत दावतों तुम्हाला। तंवर आपण किल्ल्याकडं चला। आपणासंगं घ्यावं फौजेला। पांचपन्नास ठेवावं मला। जीव

चरणीं आपल्या वाहिला । जंवर जीव नाहिं रणिं गेला। तंवर धोका नाहीं तुम्हाला । फेका दौड आतां घोड्याला । बोलण्यांत फार वेळ गेला । आपण आमचा देव दुजा नाहिं देव आम्हांला "॥ ऐकून अशा बोलाला । शिवाचा गळा दाटला ॥ चाल ॥ भर आला त्याच्या हृदयाला, पाहून प्रेमचंद्राला ॥ पाण्याचा लोट खळखळला, उसळून बाहेर आला ॥ चाल ॥ शिवाला आला कळवला । काय बोलला ऐका ! बाजीला ॥चाल॥ "लोक काय ह्मणतिल मला, देऊन तोंडाला, एका बाजोला, निष्ठुर गेला । कशि दया नव्हती हो त्याला ॥ जसा जीव प्यारा हा मला, तसाच तुम्हाला; सांगूं कसं बोला, जीव देण्याला । आग लागो माझ्या तोंडाला ॥ शत्रूंचा वणवा पेटला, जाळत आला, जाळूं दे मला, मरण देहाला खास, मग त्याला । जपणूक कशाला बोला ?" ॥ चाल ॥ ऐकोनि राजवचनाला, बाजीला शोक बहु झाला ॥ तो वीर फिरुन शिवाला, ऐकावं काय बोलला ॥ चाल ॥ "हा जीव प्यारा हो मला, ह्मणून देहाला टाकून धरणीला, जातों स्वर्गाला । द्या संधि एवढी दासाला ॥ ज्याला मृत्यू लाभला रणीं, धर्माकारणीं, त्याची हो जनीं, धन्य ही काया । द्या संधि येवढी दासा या ॥ चाल ॥ विजापूरचा होतों नोकर । तंवा केलं पाप मी फार । पण आला योग लवकर । झाली भेट विशाळगडावर । आपण केला सारा मोह दूर । चरणांचा घेतला आधार । बेइमान होतों मी फार । आज डाग धुवून काढणार । आपण जावं





आतां लौकर " । शिवबानं केलं उत्तर । "तुम्हासाठीं जातों लौकर । जंवा जाईन विशाळगडावर । पांच तोफा सोडीन सत्वर । मग समजा झालों मी पार । असं म्हणून चालले शिव-राय होउनी स्वार ॥ चाल ॥ मग बाजी झाला तय्यार । रोखून खिंडार । नंगी तलवार । हातामधिं, झाला रुद्र—अवतार । सांगिन जी पुढं पुढचा प्रकार । सहाव्या चौकाचा झाला आकार ॥६॥

—: ७ :—

**शिवबांची** घोडी कल्याणी । सदा जयदानी । घोड्यां-मधिं राणी । खडकाळ डोंगरामधुनी । तशोच मैदानी जशो काय हरणी । टाण् टाण् करुनि धांवतांना पाहिलो यवनांनीं । 'इस्कु पकडो ' म्हणुनि । चाल केली त्यांनीं ॥ चौफेर घोडे सुटले । खिंडींतून आले । बाण सळसळले । सणणणण करून अंगीं घुसले । घोडे धडाधडा खालती पडले । घोडेस्वार थंडगार झाले ! ॥ बाण येती कुठून समजेना । डसती घोड्यांना । धांवत्या सापांना । जशा काय झडपा घालती हो घार । झाली निम्मी फौज त्यांची थंडगार । रागानं झाले लाल सुभेदार ॥ पाठलाग तसाच करण्याला । जोरानं आला । फाजल खिंडीला । परि त्यानं पाहिलं बाजोप्रभुला । तीस जण घेऊन राहिला तोंडाला । खिंडोचा रस्ता बंद झाला ॥ जसा राम दिसला

रावणाला । कृष्ण कंसाला । भीम कीचकाला । बाजीप्रभु तसा
फाजलाला । दिसला पर जोर त्याला चढला । बाणांचा त्याला
सुगावा कळला ॥ बाजीच्या लहानग्या टोळीला । पाहुन फाज-
लाला । हर्ष फार झाला । कां हो ? त्याचं सैन्य होत अनिवार ।
इकडं पांच पन्नास बाजीचे स्वार । तिकडं फाजलाचे बारा
हजार ! ॥ चाल ॥ फाजलानं केला मग हल्ला । बाजी हि
तय्यार झाला ! । रणरंग खिंडीला आला । कवटाळी वीर मर-
णाला ॥ चाल ॥ आली झुंज हातघाईवर । झुलती तलवार ।
एकमेकां मार । देती; धुमाकुळ झाला अनिवार । शत्रुवर करती
जोराचे वार । जिकडं तिकड झाला एक प्रकार ॥ किती होते
मिसळले नाद । देऊ कशि याद ? । उठति पडसाद । खिंडींतून
दाद नाहिं कवणा । तय्यार सारे वीर मरणा । ठेवील कोण
त्यांची गणना ॥ चाल ॥ कोण राम राम बोलती । देवांना
हांका मारती । कोण धाय धाय रडताती । तळमळुन देहांतुन
कोण प्राण सोडती ॥ कोणांचीं नाकं ठेंचती । डोळ्यातनं
बुबळं लोंबती । छातिन्नं भाले खुपसती । जसे मासे जळीं चम-
कती । आकाशीं विजा तळपती । तलवारी तशा लखलखती ।
रक्ताचे पाट वाहती । डोक्यांच्या कपऱ्या ऊडती । कोणाचे हात
तूटती । बेशुद्ध कैक रक्ताच्या पाटामधिं पडती ॥ निकाराचे हल्ले
चढविती । 'हर हर महादेव' असें कैक बोलती ॥ 'दीन दीन'
यवन बोलती । किती अर्धमेले बरळती । हाणा मारा कापांचा





भरला नाद हो अती ॥ शिरकमळं अंबेच्या पायिं वीर वाहती ॥
दशदिशा दणाणुन जाती ! । तलवारी भाले चमकती । एकमेकां
घासुन ठिणग्या लाल निघताती ॥ वर मुंडकीं उंच उडताती ।
जणूं अंबाबाई चेंडवांचा खेळ खेळती ॥ ऐका जी त्याच वेळेला ।
विजयश्री आली बघण्याला । तिनं हातीं धरलं माळेला । 'माळ
घालूं आतां कवणाला' । अशि चिंता पडली हो तिला । जगदंबा
बोलली मृत्यूला । काय ऐका सांगतों तुम्हांला । "आली विजयदेवी
वरण्याला । अशी वर्दी द्यावी बाजीला। आणि करावा थाट चांगला"॥
"ठीक ! करतों" मृत्यु बोलला । आणि थाट कराया लागला ।
लाल रंग खिंडीला दिला । रक्ताचा सडा घातला । धडांचा कारंजा
केला । मासाचा गालिचा केला । हाडकांच्या नक्षी काढल्या ।
दातांच्या कवळ्या पसरल्या ! मुंडक्यांच्या केल्या त्यानं माळा ।
अंबेची वर्दी बाजीला । जंवा कळली चेव तंवा आला । जसा
वारा उडवि भुश्शाला । तसा बाजी उडवी शत्रुला । रक्ताच्या
धारा अंगाला । त्याच्या लागल्या, नाहीं पर भ्याला ! । जणुं पळस
प्रफुल्लित झाला ! । त्यानं केलं जेर यवनाला । पर ताजी फौज
मदतीला । फाजलाच्या आली जोर झाला । म्हणून पुन्हां आला
बाजीवर हल्ला ॥ चाल ॥ विजापुरचं आलं पायदळ । फिरून
परतलं । सारं घोडदळ । निकाराचा हल्ला केला त्यानीं फार ।
बाजी पर होता मोठा बाणेदार । हल्ला हटवायला झाला तय्यार ॥७॥

—: ८ :—

**आयुष्य** सरतं घडोघडीं । काळाची उडी । आल्यावर मडी । पडती; कुडी खास एकदां पडणार। पळभर उशीर नाहिं खपणार । जर मरण खास तर प्राण्या ! कसा मरणार ? । जो मर्द मानव झाला । सोडी जीवाला । रणांगणिं; त्याला कीर्ति वरणार ॥ पुन्हां चढला बाजिला जोर । दिलाय त्यानं मार । केला थंडगार । यवन; तंवा झाली होती दोनपार । भूमिला झाला मुडद्यांचा भार । अंगावर चालले होते तरी वार ॥ जरि झाला शत्रुचा मोड । वाटेना तो गोड । काय अवघड । बाजीला झालं सांगतों तुह्मांला ॥ त्यानं पाहिला मान फिरवून । किल्ला निरखून । नाहीं पर खूण दिसली हो त्याला ! ॥ तोफांचा जाळ दिसेना । ह्मणून यातना । होत बघा नाना । वाटलं त्याला नाश झाला कार्याचा ॥ ज्यासाठीं देह खर्चिला । तोच नाहीं झाला । पार, मनीं लागला । घोर--शिवाचा ! ॥ ऐका हा—नाद—झाला । कसलाहो बोला । गोळीबार झाला । हाय ! गोळा आला । लागला वीराला ॥ धाडकन पडला भूवर । बाजी रणवीर । जसा काय थोर वृक्ष उन्मळला ॥ चाल ॥ ‘ बाजी पडला ! हाय ! घात झाला ’ शब्द हे झाले रणांगणावर । त्यानं खचला मावळ्यांचा धीर । जिकडं फुटली वाट तिकडं चालले सारे चौफेर ॥ जंवा





पाहिलं बाजिनं हें सारं । तंवा बोलला त्यांना रणवीर । “ मेलों नाहिं मी, फिरा माघार । आणि चढवा हल्ला जोरदार । जर मराल स्वर्गाला जाल । जर जगाल सौख्य भोगाल । जर पळाल, तर नरकाला जाल ! ! ” ॥ चाल ॥ ऐकून अशा शब्दाला, पुन्हां सारा उलटला भाला ॥ निकराचा केला मग हल्ला, हैराण शत्रु हो झाला ॥ मरणाचा विळखा बाजीला, हाय ! बसला कासाविस झाला ! ॥ चाल ॥ त्याचं लक्ष होतं परि खिळलं विशाळगडावर ॥ बाजी पडला आतां मरणाच्या शय्येवर ॥ जणुं भीष्म पहुडला रणीं शरशय्येवर । जगदंबा आणि विजयश्री आल्या लौकर ॥ हातांत माळ घेऊन झाल्या तय्यार ॥ माळ घातली बाजीला, झालं दुःख परि फार ॥ त्याची दृष्टि होती खिळलेली विशाळ-गडावर ॥ तोफांचा नाद कुठं गेला ? । बाजीचा गळा दाटला । बाजीला घोर लागला । जीव धरून राहिला आशेला ॥ बाजीचा सरता काळ आला । कुठं गुंतली आस मग बोला ? । जंवर शिवबा पार नाहीं झाला । तंवर आशा राहिली जीवाला ॥ चाल ॥ धूमधडाधडा धड—धडा । धडाडा ! असा तोफांचा नाद कानीं पडला । “ झालों देवा ! धन्य ” बाजी बोलला । देहांतुन जीव पार झाला ! ॥ धन्य धन्य बाजी रणवीर । धन्य अवतार । धन्य तो शूर । धर्माच्या कामीं जो जो मरणार । त्याचा जयनाद जो जो होणार । शाहीर ‘ **पांडुरंग** ’ गाणार ॥ ८ ॥

पौष शु० ५ शके १८४८.

# ३

## धर्मवीर छत्रपति
# श्री संभाजी महाराज
## यांचा
# पोवाडा.

---

धन्य धन्य संभाजी वीर, छत्रपति धीर। जरि झाले तुकडे देहाचे भूमिवर पार। अजरामर कीर्ति जोडली तीनि लोकांवर। झाला धर्मवीर संगरीं गाजली तलवार ॥ ध्रु० ॥

—: १ :—

**शिवसूर्य** अस्ताला गेला। वीर तडकला। तारा हरपला। देशाला झाला शोक अनिवार। म्हणती जन "असला दैवी अवतार। कलियुगीं नाहिं कधीं होणार"॥ जसा सिंह मेल्यावर केला। कोल्ह्यानं कलकला। दिल्लिपति बोला। बोलला या "जाऊं दख्खन देशाला। करू ठार हिंदुलोकांला। चिरुं गाय उघड्या





रस्त्याला। लावूं मांस त्यांच्या नरड्याला। असा देश सारा जिंकून। आशा पुरवून। परतूं दिल्लीला॥ आतां कोण आडवणार मला। माझ्या फौजेला?"। बोलून या बोला। आला औरंगाबाद शहराला। कपटाचं जाळं पसरून। बकध्यान धरुन। औरंगजेब बसला॥ राज्यतृष्णा घोर लागली। शुद्धबुद्ध गेली। नीतीची होळी। करित जाळपोळ साऱ्या मुलखाला। त्राहि त्राहि केलं लोकांला। "नाहिं पाहिलं असल्या जुलमाला"। असं बोलती लोक दारोदारीं। "होईल कैवारी। देव कधिं काळीं। संकेत नाहिं कळला"॥ चाल॥ औरंगजेब बादशहा विचार मनीं करी॥ "शियापंथी आदिलशाही कुतुबशाही लोकरी॥ बुडवीन हिंदुपदपादशाही झडकरी"॥ असा बेत केला सत्वरीं। तीन टोळ्या फौजेच्या करी। एक गेली विजापुरावरी। एक गोवळकोंड्यावरी। एक आली पन्हाळगडावरी। हिंदूंचं राज्य जाळण्याला आली जासुरी!॥ कुतुबशाही जलदी चीत झाली। अदिलशाही भंगली सरली पुण्याई खरी॥ बंदोबस्त करून विजापुरीं। बादशहा गेला तुळापुरीं। तळ देऊन हल्ला केला मराठा मुलखावरी॥ चाल॥ केला अंत आदिलशाहीचा। गोवळकोंड्याचा। मराठा राज्याचा। जीव घेण्याला झाला तय्यार। औरंगजेब, परजी लाल तरवार। ऐका घडलेला सारा प्रकार॥ १॥

—: २ :—

**जरि** सूर्य अस्ताला गेला। किरण चमकला। संभाजी आला। राजा गादीला, । मराठा मुलखाला। हैराण केलं शत्रुला। दरारा लावला। कितिक फिरंगाला ॥ किती शंभूराजाचें बळ। होतं अवखळ!। सिंहाचा काळ। त्याचा मलखांब लोखंडी झाला। हातीं धरून वाघाचा जबडा। उपटून दाढा। मग फाडून टाकी टरटरा। करून दो छकला!॥ काय देहकांती वर्णावी। शोभा सांगावी। मदना लाजवी!। वाटे जसा हिरा लाल रंगाचा!। वांकवून पोलादी पहार। कडं करून मोठं छानदार। गळ्यांत घाली हार। खेळ मौजेचा!॥ शिरीं टोप मोत्याचा तुरा। तुऱ्या-मधिं हिरा। चमक सुंदरा। झगा भरजरी शोभे अंगाला। मुसेजरी तुमान पायाला। तलवार बाजुला। देइ शोभेला ॥ चाल ॥ पाहून गनिम कांपतो तिकडं चळचळा ॥ पर इकडं प्रेमानं वश केला मावळा ॥ प्रचंड दंड आडदांड वाटे शत्रुला ॥ पर थंड तोच भुजदंड लोकां जाहला ॥ ज्याला बघून तिकडं बत्राला आली अवकळा!॥ पर इकडं लोकांचा पिकला जोमाचा मळा ॥ शिरपेंच भाळीं शोभला। वाघ सिंह झाले भयभीत बघून भिंवईला ॥ ज्याला कल्ला छान शोभला। जणुं वीरवृत्ति राहिली होती त्या स्थळा ॥ खंबीर पीळ मिशीला। जिला नुसतं बघून





कितिकांनीं जीव सोडला!॥ लोखंडी वाटला गळा। ती छाती डोंगरी शिळा। लक्ष्मी राही त्या स्थळा। गनिमाच्या रक्तानं हात सदा रंगला!॥ ती ढाल शोभे पाठीला। असा छत्रपति शिवबांचा पुत्र शोभला॥ जंवा बातमी आली कानाला। कीं आला यवन देश जिंकण्याला। तंवा त्यानं मुलखाचा बंदोबस्त केला। पाठविला हंबीर वाईला। आपण गेला पन्हाळगडाला। फौजफांटा तय्यार केला। असा वीर तोंड देण्याला तय्यार झाला॥ चाल॥ चिंतावं एक, एक व्हावं। सौख्य इच्छावं। दुःख पर यावं। नियम हा असे ईश्वरी झाला। जें घडेल तेंच पाहण्याला। घट्ट जीवाला। करावं यां वेळां ॥ २ ॥

—: ३ :—

**आला** मोंगल दख्खन देशाला। घेऊन फौजेला। शंभूराजाला। आवेश आला जोम भरला। वीर तडतडा सारा उठला। दख्खन भाला–तलवारीनं फुलला। आळसाला नाहीं थारा उरला!॥ सर्जेखान वाईला आला। संग्राम झाला। पळत दूर गेला, । सेनापति होता हंबीर सरदार। दिला त्यानं सर्जेखानाला मार। हंबीर पर झाला रणावरिं ठार!॥ ॥ चाल ॥ असे विजय एकावर एक। मिळविले एकशेंवीस

॥ केलं जेर मोंगल फौजेस । संगमेश्वरीं गेला विसाव्यास ॥ विजयांची आली धुंद खास । केला फौजफांटा निरास ॥ चाल ॥ ही बातमी लागली औरंगजेब शहाला ॥ पाठवलं तकलीफ-खानाला । दरमजल करीत खान आला । त्यानं वेढलं संगमे-श्वराला । दहा हजार आणलं फौजेला । परचक्र आलं गांवाला ॥ चाल ॥ ही चाहूल लागली संभाजीला । तपास त्यानं केला । पर फितुर एक आला । बोलला "महाराज ! सोडा चिंतेला । कोण शत्रू नाहीं या स्थळा । मोंगला दिल्लीला । पार दूर गेला ! ! ॥" ॥ चाल ॥ इकडं तकलीफखानानं वेढलं साऱ्या गांवाला ॥ आणि घेरलं त्याच्या वाड्याला । आणि कैद केलं राजाला । सागराला अग्नि लागला ! । हाय ! संकटाचा डोंगर खालीं कोसळला ॥ चाल ॥ सांपडला सिंह पंजरीं । शत्रुकंदरीं । नेलं तुळापुरीं । झाला शाहाला मोठा आनंद । हाय दुःख आलं झालों मतिमंद । ह्मणून आतां केला चौक मी बंद ॥ ३ ॥

—: ४ :—

**ही** वार्ता गेली रायगडीं । फौज केली खडी । राजाराम उडी । घाली सोडवायला संभाजीला । देशाचा हिरा दूर नेला ! । मावळा सारा गडीं बोलावीला । ऐका ! राजाराम बोलला त्याला





॥ चाल ॥ "झाला कैद संभाजीराणा । आली वार्ता आज ही काना ! ॥ तुह्मी मर्द शूर सरदार । सोडवायला जाऊं या राणा ॥ तुह्मी एका हाडकामांसाचे । चला सोडवा बहिरीस-साणा ॥ चला ओढा काढा समशेरी । प्रसंग क्षूद्र नच माना ॥ जर चाड हिंददेशाची । तर उठा सोडवा राणा ॥ जर चाड गाय धर्माची । तर लावा रक्ताचा घाणा ॥ जर चाड आयाबहीणींची । तर आणा संभाजी राणा । मी दौड चाललों हा आतां । या न या–एक मज राणा" ॥ चाल ॥ जरा वेळ झाला शांत सारा तंवा मावळा ॥ पर हात गेला भाल्याला । मग मावळा सारा बोलला । "चला चला आली पर्वणी, महादेव बोला ! ॥ देशाच्या वर्मी हा वार । आला, नको आतां घरदार । चला करूं गनीमाला ठार" । अशी आली तार । घेतली तलवार । झाला तय्यार । लहानथोर सगळा ॥ लढाईची धुंद डोळ्यावर । नाद कानावर । वारं मनावर । देह भानावर नाहीं उरला । शूर लढाईची भांग प्याला । दांत ओंठ खाऊन करकरा । मुठी वळून तशाच झरझरा । लाल डोळे फिरवी गरगरा । जशि वीज मेघांतून निघे । तलवार तशी वेगें । म्यानांतून घेई । शूर त्या वेळा ॥ असा लहानथोर मावळा तय्यार झाला ॥ दुसरे दिवशीं जाण्याचा बेत जाहीर केला ॥ राजाराम रात्रीं झोंपला । पर झोंप येईना त्याला । मग स्वप्न पडलं वीराला

देखावा स्वप्नीं पहिला ॥ चाल ॥ किती प्याले सुरा । लाल झाला सुरा । लढवय्या खरा । हाड्कांचा चुरा । असुदाला (रक्ताला) बुरा । लिडबिडल्या शिरा । झाला शंभू पुरा ॥ असा स्वप्नीं देखावा झाला । संभाजी भूमिवर पडे । उडति शिंतोडे । यवन हो किडे । लागले अंगाला !॥ चाल ॥ दुसरे दिवशीं सेना चालली । दौड तुळापुरीं । चिंता परि उरीं । तिकडं काय झालं शंभूरायाला । दादानों ! सांगतों तुम्हांला । आतां चौकाला । आकार आला ॥ ४ ॥

—: ५ :—

**औरंगशाहा** बोलला । आपल्या लेकीला । "आज हातीं आला । सिंह मराठ्यांचा–करिन ठार त्याला । सारा मुलुख जोडीन मुलुखाला । विचार असा केला । कसा काय तुला । रुचतो सांग मजला" ॥ चाल ॥ रोशनबेग बेटी शाहाची । मग बोलली आपल्या बापाला । उकिडच्यौंत जशी हिरकणी । तशी झाली यवनराजाला ॥ "नका मारूं शूर वीराला । सोडा बाबा ! शंभूराजाला ! । मारून कां ठार हो त्याला । काय बाबा ! निर्भय झाला ? ॥ तुम्हीं चिराल त्याच्या देहाला । काय चिराल त्याच्या हृदयाला ॥ जुलमानं कुणी





कायमचा मुलुख जिंकिला ?" ॥ मग शाहा बोलला लेकीला । "काय ! पोरटे ! शिकवितीस तूं मला ? । काय भाळलीस वाटत ग त्याला ? । हातांत धरलं सापाला । अन् जोरानं डवचलं मी त्याला । आतां सोडूं कसा सांग त्याला । म्हणून केलं पाहिजे ठार त्याला । नाहींतर धरेल कुठतरी दंशाला अन् काढील माझा कावा !" । मग बेटी बोलली शाहाला । "बाबा ! सोडा असल्या भीतिला ॥ चाल ॥ तो हिंदु जातिचा झाला । असं कधीं नाहीं करणारा ॥ कपटाचा वास नच आला । कधिं काळीं हिंदुहृदयाला ! ॥ पृथुराज कितिक तो वेळां । देई जीवदान घोरीला ॥ चाल ॥ तरी सोडा आतां शंभुला । जुलमाचा ताबा चिरकाल काय राहिला ? ॥ जर कराल ठार आज त्याला । तर उठेल सारा मावळा । म्हणून ऐका माझ्या शब्दांला सोडा हो त्याला" ॥ चाल ॥ औरंगजेबीं उलटच्या काळजाला ॥ विचार नाहीं रुचला । बेफाम झाला । सूडसापानं घेरलं, अनिवार । केला काय ऐका पुढचा प्रकार । ऐका शाहीर सारं गाणार ॥५॥

—: ६ :—

**दुसरे** दिवशीं आणलं दरबाराला । संभाजीरायाला । देह बद्ध झाला । बेडीनं त्याला कैद केला ! । जीव नको नको त्याला

गायमाता ती प्यार। सांभाळ तोच एक करणार ॥ तुझ्यासारखीं कैक घुंगुरटी। बघतिल मसणवटी। ठेवून कर कटीं। राही सांभाळ देव करण्याला। मला नको तुझा तो धर्म। ओढवलं कर्म। काढिन तुझं चर्म। पुढच्या जन्माला ॥ कर तुकडे तुकडे देहाचे। पंचभूतांचे। जीव पर साचे। नित्य भगवान् तीनी लोकांत। पुन्हां येईन जन्म घेऊन। तुझी मान चराश चिरून। कोल्ह्याकुत्र्याहातीं खाववीन। आशा देहाला" ॥ चाल ॥ असं बोलणं ऐकून आला राग औरंगजेबाला ॥ मग बोलला आपल्या चाकरांला ॥ "चला करा ठार या चोराला। बदमाष काफर झाला। बाजारांत फरफटा याला। लालभडक करा सळयांला। त्यांनीं फोडा याच्या डोळ्याला। मग कापा याच्या जीभेला। अस हाल करून मग टांगा देह फांसाला ॥ सूळ पुरा आडरानाला। कोल्हीं कुत्रीं कुरतुडून फाडूंदेत हो याला" ॥ असा हुकूम सरकारी झाला। मग काय विचारतां त्या हो गर्दीला ?। चाकरांचा तांडा पुढं झाला। सळयांनीं फोडलं डोळ्यांला। करवतानं कापलं जीभेला। मग करवत डोईवर गेला। सरसरा चालूं लागला। दोन छकलं झालीं डोक्याचीं हाडकांचा चुरा ! ॥ अशी यातना झाली जीवाला। पर एक शब्द नाहीं बोलला। जणुं शिबी राजा शोभला। दधीचि मुनी जाहला। ज्यानं दिलीं हाडकं देहाचीं धन्य जाहला ! ॥ असा त्याचा जीव घेतला। मग एका





रानामंदि नेला। मग फांसावरतो टांगला। मग सुळावरती टांगला। रात्रिचा काळ तो झाला। तुळापुरीं नव्हती हो तुळा शोक तुळण्याला ! ! ॥ चहुकडं आकांत झाला। दिला देह दान वीरानं धर्म रक्षिला ! ! ॥ चाल ॥ विश्वाच्या भव्य अंगणीं। कीर्तिनंदिनी। खेळेल अशी करणी। केली तुवां धन्य जन्म झाला ! । धन्य शिव ! धन्य वंश केला ! । धन्य तीन लोकीं धन्य झाला ! ! ॥ ७ ॥

—: ८ :—

**तुळापुरीं** राजाराम आला। दुसऱ्या दिवसाला। परजून भाला। पर आदल्या रात्रीं संभाजी होता ठार झाला। आणि त्याचे डोळे काढून। सुळावर ठेवून। रानीं सूळ पुरून होता ठेवलेला ! ॥ आली झीट राजारामाला। धाडकन् पडला ! । मोठा हा घाला। आला अघटीत हिंदभूमीला। जरा वेळ गेल्यावर आला। शुद्धीवर, बोला। बोलला त्या वेळां ॥ चाल ॥ "चला ! जाऊं त्याच रानाला। एकवेळ पाहूं भावाला ॥ चला जाऊं त्याच रानाला। एकवेळ पाहूं राजाला ॥ चला ! जीव व्याकूळ झाला। चला पाहुं धर्मवीराला ॥ चाल ॥ असं ह्मणुन राजाराम चालला दौड त्या स्थळा ॥ किर्र् झाडी होती जागेला। जरि

एक कासरा दीस आला । तरी कवडासा नाहीं देखिला ! ॥ वाघसिंह फिरति गरगरा । डरकाळ्या फोडती डरडरा । कोल्हीं कुत्रीं पळती झरझरा । झाडं वरतीं रडतीं ढळाढळा । फळं पडतीं खालीं खळखळा ॥ किती फांद्या वाजती करकरा । पशुपक्षी झाडं बोलतीं " हिरा हरपला ॥ शिव-पुत्र आज मोहरा फांसा टांगला ! ॥ काय झोंप आली भावाला याच वेळेला ! ॥ राजाराम निष्ठुर झाला । वंशाला डाग लावला " । असं बोलती तोंच राजाराम जागी पोंचला ॥ त्यानं ऐकलं त्यांच्या शब्दांला । पाण्याचा लोट डोळ्याला । छातितल्या धडकीनं आला त्याला उमाळा ॥ मग राजाराम बोलला । "हाय ! हाय ! व्यर्थ रे जीवा ! जन्म घेतला ॥ दिला भाऊ काळनरड्याला " ॥ असं बोलला आपलं आपणाला । मग भूमीला धाडकन् आला । झाडांनीं वारा घातला । मग राजा आला शुद्धीला । संताजी बोलूं लागला । " महाराज ! घेऊं सूडाला । पर आतां काळ फार झाला । मंत्राग्नि द्यावा देहाला " । मग सूळ खालीं काढला । चंदनी रचलं चितेला । त्यावरती हाय ! विधियुक्त देह ठेवला ! ! ॥ चाल ॥ धडधडा चिता पेटली । लाल भडकली । ठिणगी पर भिडली । एक एक शूर मर्द मावळ्याला । जिनं पुढं केलं युद्धाला । जिंकलं यवनाला । आज बंद केला । चौक या वेळां ॥ ८ ॥





—: ९ :—

झालं दुःख साऱ्या देशाला । जीव तळमळला । आक्रांत झाला । 'हाय ! हाय !' नाद सारा भरला । शोकसागराचा बांध फुटला । दैवाचा घाला मोठा पडला ! ॥ बादशहाला झाला आनंद । बोलला मतिमंद । " झाला पुरा छंद । पार जिंकलं मराठा मुलुखाला । चीत केला बडा सैतान । आतां करून मुलुख हैराण । जाईन परतून । जल्दी दिल्लीला " ॥ खा मांडे मोंगला ! मनीं । तुझ्या कंदनीं । झाला बाळपणीं । तय्यार बाळ मावळ्यांचा । रामकृष्ण राजांचें कूळ । लाविल तुला खूळ । चारिल तुला धूळ । घेईल जीवाला ! ॥ चाल ॥ राजाराम झाला लाल जैसा अग्नि भडकला ॥ युद्धाला तय्यार झाला ॥ चाल ॥ खडी फौज केली तय्यार । रणावरीं चालले झुंजार ॥ संताजी घोरपडे वीर । धनाजी जाधव थोर ॥ प्रल्हाद निराजी शूर । रामचंद्र पिंगळे निंबाळकर ॥ बाजी सर्जेराव पालसकर । देशपांडे; शिर्के रणशूर ॥ शंकराजी नारायण थोर । असे कैक जमले रणवीर ॥ जोरानं फिरली तलवार । केलं मोंगलांना बेजार ! ॥ चाल ॥ त्यांनीं केलं एक चित्ताला । जोराचा हल्ला मग केला । पुढें मोंगल, मागं मराठ्यांचा हल्ला चालला ॥ बादशहा चालला नगराला । मराठ्यांनीं पाठलाग केला । शहाच्या वेढलं तंबुला । एक हजार कापलं यवनांला ।

सोन्याचा कळस शहाच्या तंबूचा नेला ! ! ॥ धनाजी मृत्यु जाहला ! । घोडे पिईनात पाण्याला । त्यांनासुद्धां पाण्यामधिं धनाजी दिसूं लागला ! ॥ त्यांनीं धरलं असतं शहाला । पर मावळा वीर बोलला । "देऊं जीवदान शाहाला । जाऊं द्या आपल्या मुलुखाला" । पर इकडं शाहाचा जोव आला घाईला ॥ एके दिशीं मुकला प्राणाला ! । पुढं मराठ्यांची तलवार गेली दिल्लीला ॥ मग तिनं फोडलं तक्ताला ! । आला संभाजीच्या सूडाला । पर संभाजीनंच सूड घेतला !! ॥ चाल ॥ जुलमानं राज्यविस्तार । कायमचा नाहीं कधीं झाला ॥ जुलमानं धर्म-विस्तार । कायमचा नाहीं कधीं झाला ॥ उपयोगा येई तलवार । ती एक देहनाशाला ॥ रक्ताचे तेच शिंतोडे । फुलवीत कैक हृदयाला ! । संभाजी एक तो गेला । पर कैक संभाजी झाला ! ॥ चाल ॥ संभाजी छत्रपति वीर । शिवाचा तीर । अर्पिलें शीर । धन्य नरवीर लोकीं झाला । '**पांडुरंग**' शाहीर गातो त्याच्या कवनाला ॥ ९ ॥

कार्तिक शु० १ शके १८५१.



# ४

वीररत्न प्रभावती

# झांशीची राणी सती लक्ष्मीबाई

हिचा

# पोवाडा.

---

सती लक्ष्मीबाई हिरकणी । भंगली रणीं । नांव त्रिभुवनीं । रणीं रक्तानं न्हाली तलवार । मेघांत वीज चमकली । भूमिवर आली । गेली पाताळीं । धन्य ती नार ! ॥ ध्रु० ॥

—: १ :—

**बुंदेलखंडांत** झांशी शहर । सुरेख छानदार । सुखाचं माहेर । लोक लीलेनं करिती संसार । नीति, धर्म, दया, सत्य उपकार । यांनीं गजबजलं सदा घरदार ॥ चाल ॥ चांद आला झांशीला, स्वर्गीं कल्लोळ झाला ॥ झांशींत धन्वंतरी, रोगराई स्वर्गाला ॥ साऱ्या रंभा आल्या, शुकशुकाट देवनगराला ॥

खालीं कामधेनु, दुष्काळ देवलोकाला ॥ आली लक्ष्मी खालती, वेड लागलं वरती विष्णूला ॥ जंवा लक्ष्मी आली झांशीला । तंवा सारीं भावंडं आलीं त्याच जागेला ॥ झांशी गांव ह्मणजे सरोवर दिसलं त्या वेळा ॥ मोठमोठे वाडे कमळांच्या देती शोभेला ॥ काळेभोर पाणीदार डोळे वाटोळे झाले भारी भृंगाला ॥ झाले शुभ्र हत्ती वरचढ राजहंसाला ॥ जाई मोगरी मालतीचीं फुलं फुललीं कांठाला ॥ जणूं तारामंडळ आलं दिवसा राहण्याला ॥ मोरोपंत तांब्यांच्या कुळीं अवतार झाला ॥ ब्रह्मावर्ती वाढली ती जशी चंद्राची कला ॥ झाली सात वर्षांची, वर्णूं कसं कान्तीला ? ॥ चाल ॥ ती उंच गोरटी, सडपातळ कटि, जशी चंद्रकोर । शोभली । रम्य मुखवटी, काया गोमटी, भाल डौलदार ॥ नाक चाफ्याची कळी, वाटोळा डोळा पाणीदार । मोरोपंत तांब्यांची छबेली झाली झोकदार ॥ घोड्यावरनं कधीं जाई मुलखावर, कधीं हत्तीवर । बैसली । कधिं नेम धरी बंदुकीनं, कधीं फिरवी तलवार ॥ चाल ॥ कधीं पट्टा घेउनी फिरवी ती गरगर ॥ कधीं फेंक भाल्याची करिते ती झरझर । मोरोपंत तांब्यांची मुलगी अशी सुंदर ॥ चाल ॥ झांशीचे राजे गंगाधर । पारोळेकर । होते रणशूर । त्यांची मग झाली मुलगी ही नार । 'राणी लक्ष्मीबाई' नांव चिरकाल । केलं तिनं कसं ऐका प्रकार ॥१॥





—: २ :—

**गंगाधरबाबा** करारी । दरारा जनांवरी । प्रीतीनं करी । राज्य, एक धर्मराज तुलण्यास । अन्याय म्याला, न्याय सकळास । त्यानीं सुखविलं गोरगरिबांस ॥ सारीं सुखं लोळतीं चरणांवरी । एक परी दुरी । चिंता अंतरीं । नव्हतं हो पुत्ररत्न विभवास । चंद्राविण तेज काय गगनास । वासराविण शोभा काय गोठ्यास ? ॥ चाल ॥ किति उपासतापास केले । पर नाहीं फळाला आले ॥ गादीला नाहीं वारस । ह्मणुन कासाविस । झाले उदास । चित्ताला झाला मोठा हो त्रास । हळुं हळुं देह लागला झुरण्यास । जगण्याची आशा नुरली जीवास ॥ घराण्यांतल्या एका मुलग्याला । दामोदराला । मांडीवर घेतला । साक्षीला ठेवल एलिस साहेबाला । राजांनीं ठेवलं साक्षीला । चंद्रसूर्याला । आज साक्षीला साहेब आला ! ॥ बाबांना नवज्वर झाला । एलिस साहेबाला । त्यांनीं मरतेसमयीं बोलाविलं आपल्या भेटीला । डोळ्यांत पाणि आणुन बोलले काय त्याला । ऐकावं सांगतों मी तुह्मांला ॥चाल॥ "साहेबमजकूर ! आतां ऐकावं माझ्या शब्दाला ॥ आतां जगणं नाहीं हो माझा मरणकाळ आला ॥ एक चिंता होती जीवाला दुःख चित्ताला ॥ राज्याला नव्हता वारस मुलगा गादीला ॥ माझ्या मागं राज्य

हें द्यावं दामोदराला " ॥ चाल ॥ मग रेसिडेंट बोलला । बाबा-साहेबाला । "सोडा चिंतेला । पुरवीन तुमच्या कामनेला । सांगीन मी असं गवनराला । तुमचा बघा फार लोभ मजला" ॥ चाल ॥ बाबासाहेबांनीं प्राण सोडला ॥ कसं दुःख आलं बाईला। पर विवेक होता हो तिला । बघून जगाच्या रहाटोला । तिनं गिळलं साऱ्या दुःखाला । पर इकडं साहेबानं खालसा केलं राज्याला ॥ एक वाडा ठेवला बाईला । थोडा पैसा तैना-तिला दिला । सरकारांत अर्ज तिनं किला । कीं 'कां खालसा केलं गादीला ?। तें सांगा सारं हो मला । अठराशें सतरा सा-लाला । आमच्याशीं करार तुम्ही केला । कीं 'देऊं राज्य आम्ही दत्तकाला'। संस्थान इनामी तुह्मांला । असं असून घेतलं रा-ज्याला । काय कारण समजेना मला, । तरी द्यावं राज्य मुल-ग्याला'। असा अर्ज केला पर दाद घेतो कोण बोला ! ॥ २ ॥

—: ३ :—

**डलहौसी** गव्हर्नरानं । धाडलं लिहून । राणीला, त्यानं । लिहिलं काय सांगतों आतां सकळांस । झाला अन्यायाचा कळस बघा खास । किळसवाण झालं जगणं जीवास ॥ "राणी साहेब ! अर्ज पोचला । आनंद झाला । तुमच्या अर्जाला ।





नाहीं पर वाव आमच्याकडं खास । आमची पर सहानुभूति तुम्हांस । आलं दुर्दैव तुमच्या वांट्यास ॥ अठराशें सतरा सालाला । करार जो झाला । आज रद्द केला । औरस मुलगा नाहीं आपणाला । ह्मणून खालसात केलं गादीला" । लिहिलं बाईला । शोक बहु झाला ॥ चाल ॥ नवऱ्याचा अंत जो झाला । राज्याचा शेवट आला ॥ चाल ॥ पलटणी आल्या झांशीला । बंदोबस्त केला । राजवाडा दिला । बाईला मुलग्यासंगं राहण्याला । अन् किल्यांत ठेवलं फौजेला । फाडलं झेंड्याला । गोऱ्या साहे-बाला । आनंद झाला ॥ चाल ॥ आणि किती अन्याय केले त्यांच्या कसं देऊं आतां गणतीला ॥ खाजगी जिंदगी ठरविली पोराची कांहीं नुरलं बाईला ॥ अज्ञानाचा पैसा मग साहेबानं आपल्या हातीं ठेवला ॥ जणुं लहान पोराची माया साहेबाला, दया कुठली आईला ॥ आपल्या मुलाची मुंज करायला, जा-मीन देऊन पैसा बाईनं घेतला ॥ आपल्या पैशाला जामीन लागला—फिरली दैवाची लीला ॥ चाल ॥ गोवध झांशी गांवाला होऊ लागला ॥ दोन गांवचा सारा दिला होता कुळस्वामी-नीला । डलहौसी साहेबानं तो ही बंद जंवा केला ॥ चाल ॥ तंवा राग आला बाईला । अनावार झाला । सूड घेण्याला । झाली मग लक्ष्मीबाई तय्यार । पेशव्यासंगं केला पत्रव्यवहार । ति-सऱ्या चौकाचा झाला आकार ॥ ३ ॥

—: ४ :—

**अठराशें** सत्तावन साल। मोठं जंजाळ। बंडाचा जाळ। भडकला, मेले टोळ किती त्यांत। घारी गिधाडींना झाली खैरात। किती गांव जळले, झाला आकांत ॥ ब्र्‍हामपुरला झाली सुरवात। बरेली, मिरत। कानपुर त्यांत। दिल्ली, लखनौ ही घेतलीं कबजांत। नबाब, बादशाह पेशवे त्यांत। झाले सामील ऐका वृत्तांत ॥ आली झळ झांशी गांवाला। आरंभ झाला। तय्यार झाला। रंग काळा गोरा रंग पुसण्यास। केलं ठार डन्लॉप साहेबास। कापून काढलं कैक लोकांस ॥चाल॥ तंवा गॉर्डन साहेब भ्याला आपल्या जीवाला ॥ गेला राणीच्या तो भेटीला। अन् बोलला काय लक्ष्मीबाईला। "राणीसाहेब! कठिण प्रसंग जीवावर आला ॥ आतां राखा आमच्या जीवाला। आपण मायबाप हो मला। सांभाळा आपल्या गादीला। हें घ्यावं दप्तर द्यावं जीवदानाला"। तंवा बोलली राणी बाब्याला। "मागं द्यावं म्हटलं राज्याला। तंवा विकलो बुद्धि ढाणकला। अन् आज काळ बंडाचा आला। म्हणुन आतां देता राज्याला?"। तिनं कारभार सुरूं केला। पलटणवाला भेटला राणीला। एक लाख रुपया वसूल केला। मग राणीच्या नांवाचा डंका गांवभर केला ॥ मग बंडवाला चालून दिल्लीला गेला ॥ चाल ॥ पुन्हां





भगवा झेंडा किल्याला। शोभूं लागला। आनंद झाला। राजी तिनं केलं साऱ्या जनतेला। आशेचा किरण हा आला। सूर्य अस्ताला। गेला पर गेला! कायम गेला! ॥ ४ ॥

—: ५ :—

**एके** दिवशीं भरला दरबार। झाला ललकार। राणी सरकार। आल्यावर उठले सारे सरदार। मुजरे देण्याला झाले तय्यार। म्यानांतुन काढली त्यांनीं तलवार ॥ राणीचा दरबारी थाट। ललकारी भाट। भाग्याची गांठ। पडल्यावर कमी काय पडणार?। जें जें चिंतावं तें तें होणार। देव देणार, देव घेणार! ॥ चाल ॥ लक्ष्मीबाई रूपाची खाण, तेजाला काय मग वाण ॥ संगे दासीगण, आला ऐटीनं, खुलला पैठणीनं। भरजरी। चांदण्या जशा काय छान ॥ बसली गादीवर राणी, शोभे दरबारी पोशाखानं। मर्दानी। ऐका! पोशाख ऐकवीन ॥ चाल ॥ पायीं पायजमा, अंगीं जांभळी बंडी झोकदार। टोपी डोईवर, वरती शोभली बत्तीची भरजर ॥ काच्या कधीं भरजरी दुपेटा लटके तलवार। कमरेला। दोन दमास्कसी छान पिस्तुलं बाई जंगशूर ॥ चाल ॥ एके दिवशीं अशा थाटाचा दरबार भरला ॥ एक हेर लगबगीनं आला। बोलला

काय ऐका राणीला । " बाईसाहेब ! ऐका खबरेला । गांवाच्या चारी बाजुला इंग्रज आला ॥ साठ हजार फौज तय्यार दिसली हो मला " ॥ काळवणलं तोंड बाईचं—धक्का हृदयाला ॥ थंडीचा कडका जसा हिरण्यागार शाळूला ! ॥ तसा धक्का बसला राणीला । सरदार बोलले राणीला । " देऊं आह्मी आमच्या प्राणाला । करू जंग, सोडु जीवाला । बाइसाहेब ! सोडा चिंतेला " ॥ असं बोलती मालकिणीला । इतक्यांत एक स्वार तिकडं दौडत आला ॥ एक लखोटा दिला राणीला । ह्यू रोज साहेबानं लिहिलं पत्र राणीला । " या तुम्ही आमच्या भेटीला । आणा संगं मोरो तांब्याला । आणि आणा लाढु बक्षीला । दोन दिवस मुदत तुम्हांला । नाहींतर झांशीचा किल्ला मिळेल मातीला ॥ आणि देऊं तोफेच्या तोंडीं तुम्हां सर्वांला " ॥ चाल ॥ लक्ष्मीबाई निधड्या छातीची । राणी झांशीची । मोठ्या धडाडीची । पत्र मग धाडलं काय साहेबाला ॥ आतां मी सांगतों तुम्हाला । पांचव्या चौकाला । आकार आला ॥ ५ ॥

—: ६ :—

" **बाईमाणूस** मी येऊं कशि बोला । आपल्या भेटीला । धाडते दिवाणजीला । सांगावा आपला बेत मग त्यास । समजेल





तुमचं ह्मणणं मज खास । नाहींतर तुमचा मार्ग तुह्मांस " ॥ असा निरोप धाडला शत्रुला । दारुगोळा केला । कोटावर नेला । झुंजेला झाली फौज तय्यार । देव दानवांची झुंज अनिवार । धन्य धन्य खरी लक्ष्मी नार ! ॥ पोशाख मर्दानी करून । तलवार करीं धरून । धांवे तटावरून । जशी काय महिषासुरमर्दिनी । दिनरात्र तटावर फिरे । शौर्य सळसळे । शत्रु घाबरे । धन्य ती रमणी ! ॥ रणरंगीं रंगली राणी । भान नच मनीं । साहेब तडफडुनी । धरणीवर पडती कितिक घायाळ । दाणादाण झाली शत्रुची फार । लक्ष्मीबाई चमके जशी तलवार ! ॥ घनगर्ज तोफेचा गळा । सोडी घळघळा । भयंकर गोळा । त्यानं किती केला शत्रूचा नाश । रणांगणीं सोडती कितिक जीवास । मुडद्यांची झाली भूमिवर रास ॥ चाल ॥ असा मारा जोराचा केला । साहेब घाबरून गेला ॥ कुठं मोरचे बांधावे नव्हतं ठाव शत्रूला ॥ ह्मणून असा त्याचा पहिल्यांदा नाश हो झाला ॥ पण कोण फितुर बघा झाला । त्यानं दिली माहिती साहेबाला । कीं अशा जागीं जर मोर्चा बांधला । तर अचूक नेम साधला । मग जाईल कोटावर गोळा । साहेबानं मोठ्या यत्नानं मोर्चा बांधला ॥ मग दिली बत्ती तोफेला । घो घो करीत तोफेचा गोळा । गांवांतल्या रस्त्यावर आला । किती लोक मुकला प्राणाला ।

असा जंवा प्रकार पाहिला । तंवा घनगर्ज तोफेचा गोळा शत्रु-
वर गेला ॥ साहेबाच्या गोलंदाजाला । गोळ्यानं ठार बघा
केला । दहाव्या दिवशीं तात्याटोपी आला बाईच्या मदतीला ॥
पंधरा हजार आणलं फौजेला । तात्या खंदा वीर लढग्याला ।
एकीकडनं तात्याचा हल्ला । पर दैव आड यशाला । किल्याचा
हवालदार झाला फितूर शत्रूला ॥ इकडं हल्ला तात्यानं केला ।
पर तिकडं किल्यावर झोंप लागली तोफेला ! ॥ अपयश आलं
दादानों ! तात्या टोपीला ! ॥ चाल ॥ अकरा दिवस युद्ध घन-
घोर । झालं अनिवार । आशेची कोर । गेली अस्ताला । घोर
काळ आला । चौकाला भार बहू झाला । म्हणून बंद केला ।
वाव देण्याला । पुढच्या चौकाला ॥ ६ ॥

—: ७ :—

**अकराव्या** दिवशीं रात्रीला । फितूर एक आला ।
बोलला राणीला । "बाईसाहेब ! ऐका देतों खबरेला । साहे-
बाचा सारा दम गेला । दारुगोळा सरला । टेकीला आला ॥
वेढा काढून जाइल उद्यांला । सोडा चिंतेला । थकवा फार
आला । जागरणानं, घ्यावं आतां झोपेला" । असं बोलून
पातकी गेला । धाड नरकाला । देवा रे त्याला ! ॥ चाल ॥





ऐकून अशा खबरेला । राणीला आनंद झाला ॥ जरा डोळा
लागला डोळ्याला । पहाटेचा सुमार झाला ॥ तोफखाना ढिला
मग झाला । फितुरीनं नाश हो केला ॥ चाल ॥ गवताचा
भाऱ्यावर भारा । साहेबानं लावला कोटाला । त्यावरनं चढुन
तटावरनं गोरा लोक आला ॥ दीड हजार भरला गणतीला ।
राणीसाहेब उठल्या पहाटेला । जंवा पाहती गांवच्या कोटाला ।
तंवा कोटाच्या वरच्या बाजूला । दीड हजार गोरा पाहिला ।
पर मोठी धीराची बाई धरलं धीराला ॥ एक हजार घेतलं
लोकांला । अन् निकाराचा हल्ला तिनं केला । दहा हजार
गोरा मग आला । बाई फिरली आली माघारा । निराशेनं घेरलं
बाईला । तिनं घेतलं जळत्या मशालीला । दारुच्या कोठारांत
शिरली राणी ते वेळा ॥ तंवा बोलली राणी आपणाला । "हाय !
देवा ! कशी रे करुणा येईना तुला ! ॥ साहेबानीं गांव
जाळला । कितिकाला उभा कापला । हा डाग माझ्या नांवाला ।
डोळ्यादेखत आकांत हा झाला । तळमळतो लोक या वेळा ।
कशासाठीं जगूं मी ?–जावं मरुन आज या वेळा" । असं
बोलली राणी आपणाला । अन् पेटवणार होती दारुला । इत-
क्यांत प्रकार काय झाला । रामचंद्रराव आले त्या स्थळा ।
अन् बोलले काय एका राणीला । "बाईसाहेब ! काय हें ! ।
सरकार ! विवेक जरा करा । लढाईंत मरण हें शोभे खऱ्या

वीराला ।। चला जाऊं रात्रीं काल्पीला । पेशव्यांच्या घेऊं मदतीला । अन् पुन्हां येऊं झुंज करण्याला ।" काल्पीला जायाचा बेत बाईनं केला ।। चाल ।। झालं दुःख फार बाईला । धरलं धीराला । सूड घेण्याला । काल्पीला रात्रीं बाई जाणार । वेढ्यांतुन कशी पार होणार । ऐका ! शाहीर सारं गाणार ।। ७ ।।

—: ८ :—

**राजरत्न** करड्या रंगाचा घोडा सजविला । अडीच हजार किंमतीचा झाला भारी गरुडाला । जणु उच्चैश्रवा आला बहिणीजवळ राहण्याला । लक्ष्मीनं धरलं लगामीला घोडा फुरफुरला ।। घोडा चपळ लक्ष्मी ही चपळ, काय मग बोला । चिच्छक्तिकार्यशक्तींचा संयोग झाला । आवरतो घोडा लक्ष्मीला लक्ष्मुमी त्याला। दोघांचं तेज मग झालं भारी दुनियेला ।।चाल।। राणी बसली घोड्यावर ऐन मध्यरात्रीला ।। आभाळ भरलं ढगांनीं, अंधार झाला।। तिनं घेतलं थोडक्या फौजेला । धोतरानं बांधलं पोराला आपल्या अंगाला ।। जसं अंजनीनं धराव हो हनुमंताला ।। तलवार होती राणीच्या उजव्या हाताला ।। जणुं वीज होउन तलवार झाली तय्यार शत्रु चिरण्याला ।। राणीनं घोडा तटावरनं खालीं फेंकला ।। ह्यू रोजच्या छावणींतून





घोडा दौड चालला ।। वाऱ्याच्या वेगानं चालली दौड काल्पीला ।। एकशें दोन मैलांची झाली धांव घोड्याला ।। पर इकडं झांशी गांवांत गोरा हो शिरला ।। गांवांत शिरल्यावर ऐका त्यांची हो कृती ।। पांच वर्सांवरच्या माणसाला ठार मारती ।। लोकांच्या घरांतून जाती । लाथेनं देव तुडविती । पुरुषांना गोळ्या घालती । जर कोण बायका नवऱ्याला वांचवा म्हणून येती । तर दोघांनाही गोळ्या घालती । आधीं पैसा आडका मागती । घर सारीं धुंडून नेती । जरि पैसा दिला तरि त्यांना गोळ्या घालती ।। किति बायका अब्रुला भिती । विहिरींत धडाधड उड्या घालघालती ।। संगिनी किती खुपसती । गळफांस कोण लावती । बंड्यात्नं जाऊन कैक जीव राखती ।। गवतांच्या गंजीतून कोण लपून राहती ।। तंवा गोरे गंजीजवळ जाती । आणि गंजी पेटवून देती । गंजीतले लोक मग खाक जळून हो मरती ।। लहान पोरं जागच्या जागेला थंडगार होती ! ।। ८ ।।

—: ९ :—

**घनघोर** युद्ध काल्पीला । झालं, मोड झाला । गेले ग्वालेराला । पेशवे, राणी आणि तात्या सरदार । इंग्रजहि आला पाठीवर फार । खणखणाट रणीं करी तलवार ।। पुन्हां आला

झांशीचा रंग । राणी रणिं दंग । घोड्याला तंग । बांधून गेली शत्रु चिरण्यास । मरणं किंवा मारणं राहिलं जीवास । थंडगार केलं कितिक साहेबांस ॥ इंग्रजांचा लोक पर फार । होता रणाग्र । घालून घेर । चहुकडनं घेरलं लक्ष्मीबाईला । जशी गाय ढाण्या वाघाला । शेळी लांडग्याला । दिसली साहेबाला । राणी त्यावेळा ॥ साहेबांची फळी फोडून । चालली वेगानं । राणी तडफेनं । जणु संग्रामदेवी ही नार । खंदे लढवय्ये केले बेजार । बावीस वर्षाची उमर नाहीं फार । तिनं लाजविले कितिक सरदार ! ॥ चाल ॥ दोन चार होते सरदार संगें मदतीला ॥ मागं वीस साहेबांनीं पाठलाग सुरू केला ॥ राणीनं घोडा भरधांव तंवा सोडला ॥ पर आला दैवाचा घाला । पाण्याचा पाट आडवा आला ॥ अन् राणीचा घोडा थबकला । राजरत्नी घोडा होता जखमी जाहला । म्हणून राणिनं हा होता दुसराच काढला । पर ऐत्या वेळेला बुजला । साहेबानं गाठलं बाईला । तिनं चिरलं पंधरा लोकाला । पर एकानं जोरानं वार डोइवर केला । राणीचा डोळा भंगला । अन् लोंबायला खालती लागला । राणीच्या छातींतुन सुरा त्यानं खुपसला ॥ तरी तिनं त्याला ठार केला । मग कोसळली बाई धरणीला । मग रामचंद्रावाला । काय बोलली ऐका ते वेळा ॥ “ आतां मरते, राखा पोराला । म्लेंच्छांचा स्पर्श देहाला । होईल





भीती ही मला । म्हणून जाळा माझ्या देहाला ” । असं म्हणून सती लक्ष्मीनं प्राण सोडला ! ॥ रामचंद्ररावांनीं केलं काय ते वेळा । एक गवताचा ढीग पाहिला । त्यावरती राणीचा देह त्यांनीं ठेवला ! ॥ अन् लगबगिनं अग्नि लावला । ठिणग्याचा लोळ चालला । सुकुमार देहाला भिडल्या अग्निच्या झळा ॥ चाल ॥ गवताची भडकली चिता । लक्ष्मी देवता । राज्य देवता । गेली ! परदास्य भरतखंडाला ! ! । ‘ पांडुरंग ’ शाहीर झाला । शोक फार झाला । साऱ्या लोकांला ॥ ९ ॥

आश्विन शु० ६ शके १८४९.



## ५

# प्रतापगडचा रणसंग्राम !

## पोवाडा.

धन्य ! धन्य ! शिवराय जाहला धर्मरक्षणा अवतार ।
कपटभाव वळखिला खानाचा, केला त्याचा मग संहार ॥ ध्रु० ॥

—: १ :—

**चंद्रराव** मोरे ठार करविला, जावळी जोडली मुलखाला ।
वाई कऱ्हाड सुभे अदिलशाहाचे हळुहळु आले कबजाला ॥
बातमी कळलि ही अदिलशाहाला मोठी धडकी भरली त्याला ।
ह्मणे " बडा सैतान मत्त हुवा ! क्या करना अल्ला ! अल्ला !! "॥
अदिलशाहानं लौकर तेव्हां मोठा दरबार भरवीला । बडे अमीर
उमराव जमविले कितिक हिंदु सरदारांला ॥ कर्नाटकांतुन





आणलं बोलावुन जल्दी शहाजीराजाला । " धाक घालुन बापाला
बंदोबस्त करिन" आशा ही अल्लीला ॥ चाल ॥ जरि होता शहाजी
शाहाचा मनसबदार ॥ तरी तोच होता खरा शहा, मोठा
शिरजोर ॥ त्याच्या हुकमावीण एक नव्हतं पान हालणार ! ॥
चाल ॥ बादशाहा शब्द दुभंगला । बाद शाहा झाला । शहाजी
शहा झाला ! । एवढी त्याची होती फौज तय्यार । अल्ली
अदिलशाहा झाला गारेगार ! । उसना पर आणला जोर त्यानं
फार ॥ चाल ॥ अदिलशाहा बोलला शाहाजीला । " तुह्मी
आमचे नोकर झाला । पोरानं पुंडावा केला । कल्याणचा खजिना
पळवला । वाई, कऱ्हाड, बेजार केला । हा आमचा अपराध
झाला ! । दोन गोष्टी सांगा पोराला । बरं वाईट होइल जीवाला " ।
मग बोलला शहाजी शाहाला । " किती सांगू, हुजूर ! कार-
ट्याला ? । काय ह्मणता ? लुटलं खजिन्याला ? । हा मोठा
अपराध झाला । पर पोरटा हूड फार झाला । ऐकेना माझ्या
शब्दाला । ह्मणून ठेवला दूर मी त्याला ! । पुणेंप्रांतीं जाहगीरिला ।
आमचंच बापलेकांचं आर्धी पटेना एकमेकांला । मग सांगू काय
मी त्याला ? । खावंद ! आपण आणावं त्याला वठणींला ! ।
लावावी वेसण नाकाला । दरदरा ओढुन आणावं आपल्या
सदरेला ॥ मग दोन शब्द सांगावे त्याला " । असं बोलला
अदिलशाहाला । मग शाहा बोलला सदरेला । " शाहाजीचा

उपाय सारा थकला । कोण कैद करिल हो त्याला ?" । "मैं जाता हूं; क्या बात है !" असा नाद आला कानाला । मग शाहा बोलूं लागला । "जिता धरून आणावं सदरेला" । पैजेचा विडा मांडला । सारा लोक बसला जागेला । पर एक कोणी जाऊन घेईना पैजेला ॥ मैं ! मैं ! करणं काम तोंडाला । वैं ! वैं ! करावं लागेल जीवाला ! । ह्मणून कोणी नाहीं उठला । पर जरा वेळ गेल्यावर आला । एक वजीर, धिप्पाड झाला । अफझुल्ला ह्मणती हो त्याला । त्यानं लावला हात पैजेला । अन् बोलला काय सदरेला । "मैं गिरफदार करता हूं" विडा उचलला ! ॥ या अल्ला ! अल्ला ! शब्दाचा गजर जाहला ॥ चाल ॥ शाहाजी राजानं लिहिलं शिवबाला "असा घडला हा प्रकार । गाफिल कधीं रे राहूं नको, करि फौजफांटा तूं तय्यार" ॥१॥

—: २ :—

**पान** उचललं हिरवं पैजेचं, पिकला परि अफझुलखान । 'आपल्या हातानं मरण ओढलंस' बोललं सदा मन जोरानं ॥ उंट घोडा पायदळ जमविलं बारा हजार खानानं । विजापुराहून खान चालला दौड मोठ्या सरंजामानं ॥ वेशीबाहेर अपशकुन जाहला हत्ती बिनीवरचा मेला । निशाण पडलं ! ऊर धडधडलं,





बेत अल्लाचा ना कळला ! ॥ धीर धरून पर पुढं चालला लागलं गांव पंढरपूर । तुकडे केले विठ्ठल मूर्तीचे, नाहीं कुणाचा दरकार ! ॥ चाल ॥ खान आला तुळजापुरला । छिन्नभिन्न केलं देवीला । जात्यानं भरडलं तिला । देवीचा कोप जाहला । जगदंबामाई शिवबाच्या गेली सप्नाला ॥ काय बोलली ऐका राजाला । "बत्तीस दातांचा बोकड कांपावा मला ॥ रक्तानं त्याच्या माखावं माझ्या अंगाला ॥ मुंडक्याचा नारळ बांध माझ्या देवळाला" । इकडं खान पुढं चालला । जातांजातां फोडलं त्यानं अशा कैक मूर्तीला ! ॥ बाटवलं कैक लोकाला । घरंदारं लुटली कैकांची त्रास लोकाला ! ॥ किती बळी पडले चैनिला । कितिकांची नरडीं उडविलीं, डोळा काढला ! ॥ कितिकांच्या बायका पळविल्या । दारुचा पाट चालला । गुडगुडी लावली तोंडाला । देहभान नव्हतं कोणाला । ब्राह्मणाच्या धरती शेंडीला । अन् बांधती उंच झाडाला । अंगानं खुपसती भाला । असं हाल करती जीवाला ! । अशा अशा करून खेळाला । खान आला वाई गांवाला । तळ दिला वाईला पुढचा बेत करण्याला ! ॥ चाल ॥ भरली घडी खानाची मृत्युच्या आला जवळ तो अफझुल्ला । पतंग विसरुन देहभानाला झडपी जोरानं वणव्याला ॥ २ ॥

—: ३ :—

**एके** दिवशीं दोन घटका रात्रिला किल्ल्याच्या गच्चीवरती। सभोंवार सरदार, शिवाजी राजे होते मध्यावरती। नीलनभाच्या हृदयावरती फुलली चंद्राची कोर! स्फटिकासम चांदण्या चमकती शीतळ वेळिं सभोंवार॥ सह्यगिरीच्या हृदयावरि 'शिवचंद्र' शोभला सुकुमार। नेता पालकर, ताना मालुसरे, तारे झळकती रणवीर॥ सह्यगिरीवर जणुं शिव बसले घेउनियां निज परिवार। प्रळयकाळ यवनांचा आला! झाला महिवर अवतार॥ रानफुलांचा गंध पसरला मंजुळ वाऱ्याची लहरी। प्रतापगडच्या किल्ल्यावरुनी यश राजाचें ललकारी!॥ गडबड धडपड आरडाओरड रड भूमीवरची सरली। सर्व शांत जग झालं; ऐकली पर वाघाची डरकाळी!॥ चाल॥ करवंदी झाडी कांटेरी कुंप करणार। धबधबे खळाळत नित्य गाणं गाणार। किती दऱ्या खोल डोळ्यास घेरी आणणार॥ चाल॥ उंच उंच अति उंच धांवली आभाळांतुन शिखरं किती। चित्रं काढलीं जणुं शिखरांची नभोमंडळाच्या वरती।॥ चाल॥ अशा वेळिं एक हेर किल्ल्यावरती चालला॥ झपझपा चढुन गड राजाजवळ पोंचला॥ मग बोलला शिवरायाला। "रामराम! ऐका खबरेला। विजापूरच्या ऐकलं बातमीला। कीं आपण वाईप्रांत





घेतला। कल्याणचा खजिना पळविला। म्हणून बादशहा लालेलाल झाला!। घेण्याला आपल्या सूडाला। त्येनं धाडलं अफझलखानाला। बारा हज्जार घेऊन फौजेला। खान आलाय तुळजापुराला। आतां येईल वाईप्रांताला। अशी बातमी आली कानाला"। असं बोलून हेर तो गेला!। तयारीचा बेत मग केला। गडाखालीं मावळा सरदार सारा उतरला॥ रातोरात पल्ला मारला। एक चालला बंदोबस्ताला। एक चालला फौज तय्यार खडी करण्याला॥ एक दारूगोळा बघण्याला। असा सारा मावळा सरदार लागला कामाला॥ चाल॥ शरदृतूच्या निळ्या नभामधीं कडकडाट हा बिजलीचा। झाला एकदम जीवघातकी खेळ खळेना दैवाचा!॥ ३॥

—: ४ :—

**वाईगांवाहुन** त्वरित धाडला कृष्णाजी भास्कर वकिल। प्रतापगडला अफझुल्लानं, सांगतों पत्र काय काय लिहिलं॥ "द्यावा मुलुख परतून शाहाचा, घ्यावि भेट या वजिराची॥ म्हणाल 'नाहीं' तर मग आतां आशा सोडावी जीवाची"!॥

चाल—कृष्णाजी भास्कर प्रतापगडिं पोंचला।
संदेश खानाचा शिवाजीस कळविला।

त्या रात्रीं कृष्णाजी प्रतापगडिं राहिला ।
मध्यरात्रीची वेळ जाहली रात्रहि बुडली झोंपेंत । शिवरायानं त्या वकिलाला नेलं अंबेच्या देवळांत ! ॥ देवी भवानीपुढं बोलला राजा कृष्णाजी पंतास ॥ " सांगा बेत खानाचा, घातली शपथ देवीची तुह्मांस ॥

चाल—या भूवरचे तुह्मास ह्मणति भूसुर ।
आह्मी नित्य ठेवावं मस्तक चरणावर ।
कां पाप जोडतां बनुन यवननोकर ? ।
केसानं कांपता गळा सोडा अविचार ।

मस्तक चरणावरी ठेवतों सांगा बेत त्या खानाचा ॥ देवी भवानी असे साक्षिला घात करूं नका स्वजनांचा " ॥ चाल ॥ कृष्णाजीपंत भास्कर । विरघळले झाले मनिं गार ॥ ॥ चाल ॥ डबडबला पाण्यानं डोळा । अंगीं कांटाळा । कंप देहाला । मोहाचा कडा पार कोसळला ! । विवेकाचा डोळा उघडला । अभिमान आला । बोलला शिवबाला ! ॥ चाल ॥ " जय नमोऽस्तु ते जगदंबे पदरीं घे मला ॥ शिवराया ! धन्य तूं, यश येईल रे तुला ॥ देहभान नव्हतं रे मला । रोग जडला होता दृष्टीला । अंजन भेटलं डोळ्याला । स्वातंत्र्य-बुद्धि-कोकिला । आनंद देती जीवाला । महाराज ! जीव वाहिला आपल्या चरणाला ॥ खानाचा कपटभाव झाला । जिता मेला धरणं तुह्माला ।





खानाचा मानस झाला ॥ ह्मणुन त्याला एवढा भेटिचा आला उमाळा " ॥ असं बोलला कृष्णाजीपंत शिवरायाला ॥ शिवराय बोलला मावळ्याला । " हा पेंच आला जीवाला । काय करावं सांगा या वेळा " । तानाजी बोलूं लागला । " महाराज ! बोलवा खानाला । किल्ल्याच्या खालच्या बाजूला । 'म्यालों' असं दाखवावं त्याला । मग करूं खानाचे तुकडे उडवु मुंडक्याला ! " ॥ शिवराय बोलले लोकांला । " हा सल्ला योग्य नाहीं झाला । असं करणं योग्य नाहीं मला ! । शत्रु मित्र कोणी जरी झाला । तरी न्यायमार्ग थोरांनीं पाहिजे घेतला ॥ पर आणूं त्याला भेटीला । मी जाईन भेट घेण्याला । जर रंग घाताचा आला । तर असा सज्ज युद्धाला । नाहींतर जाऊं दे खान आपल्या देशाला " ॥ असं बोलला राजा मावळ्याला । पंताजी गोपिनाथ वकिल त्यानं नेमला ॥ चाल ॥ काय निरोप धाडला खानाला सांगिन पुढच्या चौकांत ॥ वीर मर्दांचा गुण गौरव करि कवी आपल्या कवनांत ॥ ४ ॥

—: ५ :—

**पंताजी** गोपिनाथ चालला खानाच्या वकिलासहित । आला वाईला पत्र राजाचं दिलं खानाला सदरेंत ॥ रघुरायाचा

अंगद जैसा शिवरायाचा पंताजी। भला सराईत, मिठ्ठा बोलका, नाहीं ठाव कधीं इतराजी ! ॥ पत्र लिहिलं जें शिवरायानं तेव्हां अफझुलखानास । सांगतों आज मी तें तुह्मांला, जागं करावं कानास ॥ "पर्वत कुणिकडं ? कुठं मातीचा कण ! सिंधु तो कुठं नाला ! । कुठं सूर्य कुठं मशाल साधी ! कुठं वाव त्या बेडकाला ! ॥ कुठं इंद्राचा ऐरावत तो कुठं शाम्भटी तट्टाणी । कुठं सिंह कुठं उंदिर झाला ! मोठी शाहाची अमदानी ॥ चाल ॥ खानसाहेब घ्यावा मेरा सलाम द्यावं अभयाला । मोठी धडकी भरली जीवाला । वाई प्रांतिं पुंडावा केला । हा मोठा अपराध झाला । सारा मुलुख देतों शहाला । पण द्यावं जीवदानाला ! डोई लावतों आपल्या पायाला । नुसतं नांव ऐकल्यावर आला घाम अंगाला । मग–कोण करिल दोन हाताला ? । आज चुकलों, शरण तुह्मांला" । असा निरोप धाडला खानाला। खानाला संतोष झाला । दाढीवरनं हात फिरविला । गांजाचा झुरका मारला । आणि खान बोलूं लागला । "अहमदुल्लिला ! बंदेका क्या रोब है ! मेरा सिरफ नाम ही सुनकर उसका पसीना पसीना हो गया ! वाहवा अफझलखानबहादर !" । कृष्णाजीपंत बोलला । "जंवा बातमी ऐकिली कीं, आपण आला युद्ध करण्याला । आणि आणलं इतक्या फौजेला । तंवा टाकलं अंग धरणीला । त्यानं लावले डोळे आकाशाला । जसं भूतखेत





झडपावं तसा जाहला । मग आणलं त्याला ताळ्याला । त्याचा वाण सारा बदलला । तो येणार नाहीं भेटिला । तर आपण जावं भेटिला। मग आपला बेत साधला" । "अच्छा है" खान बोलला । तसा निरोप धाडला शिवबाला । खानानं तळ हालवला । पसरणीच्या घाटावरनं चालला प्रतापगडाला ॥ चाल॥ जा खाना, जा दुष्टा, जल्दी जा, ओढवलं सत्त्वर मरण । मृग-पंचानन सह्यकंदरीं करिल तुझी रे धुळदाण ॥ ५ ॥

—: ६ :—

**भेट** घेण्याला अफझुल्लाची मंडप श्रीशिवरायानं। प्रताप-गडच्या खालीं सजविला नाहीं तिलोकीं उपमान ॥ निळा चांदवा दिला छानदार चंद्र तारका त्यावरती । झालर तांबुस सभोंवार ती शोभा देई घडी घडीवरती ॥ हंड्या झुंबर किती लटकती लोलक झळके त्यावरती । आरसे टांगले किती मनोहर, काय राजाला हो कमती ॥ नीलमण्यांचे खांब बनविले, लोंबती मोतियांचे घोस । शिवरायानं क्षुद्र खानाचा किती पुरवावा तो सोस ! ॥ वेलबुट्या काढल्या भिंतीवर चित्रं काढली रंगाचीं । इंद्रधनुष्या रंग लाजवित, अपार शोभा मंडपाची ॥ चाल ॥ जमखाने शुभ्र हांतरले शोभे भरजर । गाद्या गिरद्या तिवासे

तक्के ठेवले त्यावर । गालिचे पसरले उंची कैक त्यावर ।। चाल ।। कुबेर अलकापुरी घेउनी जणूं वाटला तो आला !। रत्नाकर करिं रत्न घेउनी, विष्णु सोडि वैकुंठाला ।। कुणी कधीं ऐकला असा हा विष्णुशिवांचा हो मेळा । छत्तिस आंकडा सदैव त्यांचा गबर एक, दुसरा दुबळा ।। उडती फवारे कारंजांचे बाग फुलली हिरवी गार । यज्ञभूमी ती शिवरायानं केली जणू काय तय्यार ! ।। चाल ।। आधींच पर्वतावरचा देखावा गोड। त्यांत असा सजविला मंडप नव्हती तोड । किती कसब शिवाचं होतं मोठं बिनजोड ।। चाल ।। मंडप झाला, खानहि आला, झाला भेटिला तय्यार । पण तो आला फौज घेउनी हत्यारबंद दीड हज्जार ।। चाल ।। मग निरोप धाडला शिवबानं अफझुलखानाला ।। " फौजेचं काय काम कळलं नाहीं हो मला ।। जर आणतां येवढ्या फौजेला । तर कसला भेटूं तुह्माला !। आत्तांच जीव आला धाईला । जर एकटे याल भेटिला । तर कसं तरी भेटणं तुह्मांला !" । खानाला वाटलं ते वेळा । शिवाजी शिवाजो तो केवढा ? । सहज घेइन खाकुटींत त्याला । अन् चिरडीन त्याच्या नरड्याला ! । भेटिला एकटं जाण्याला । कृष्णाजोपंतानीं ही सल्ला जेव्हां त्याला दिला । तंवा खान चालला भेटिला । शिवाजीनं ठेवली बडदास्त मोठी ते वेळा ।। मग खान आला सदरेला । मानमरातब घेऊन गारेगार झाला ।। वर हांसरा चेहरा केला ।





पर आंत 'दगा' राहिला । 'कधिं भेटिन एकदां मी' असं झालं हो त्याला ।। चाल ।। आला ! आला ! रे सर्जा शिवाजी खाना ! आतां तूं सांभाळ । नागसापावर चपळ जाहला घेइल चावा तो काळ ! ।। ६ ।।

—: ७ :—

**आला** भेटिचा दिवस सकाळिंच केलि पुजा जगदंबेची। हात जोडुनी शिवरायानं करुणा भाकली अंबेची ।। " आई ! संकटीं कोण तुझ्याविण सोडविणारा दीनाला । देइ आशीर्वाद आज माय ! तूं घेई पदरिं या लेंकराला ! " ।। डोळे झांकले शिवरायानं, चमत्कार दिसला त्याला । जगदंबा पुढं उभी राहिली, वर्णूं कसं त्या स्वरुपाला ! ।। किरिट डोक्यावर, केंस पाठीवर, लांबलचक काळेभोर, । कुंकुम शोभे रुंद कपाळीं कंठिं मोतियाचा हार ।। शंख चक्र करि पद्म घेतलं त्रिशूळ भाला तलवार। सिंहावर होती बसलेली खालीं होता महिषासूर ।। जबडा लाल सिंहाचा, डोळेही लाल, पंजेही लाल अती । दिला पोटावर पाय सिंहानं त्या दैत्याच्या–अशि मूर्ती ।। एका हातामधिं महिषासुराचं डोकं धरलं जगदंबेनं । थेंब रक्ताचे टपटप गळती पाट चालला भूवरनं ।। हसरं तोंड देविचं जाहलं बोलली देवी

शिवरायाला । " आशीर्वाद हा दिला लेंकरा ! होशिल भारी कळिकाळा " ॥ चाल ॥ देविनं शिवाच्या शिरीं मुगुट घातला । असुराच्या रक्ताचा टिळा त्यास लावला । हा असा देखावा शिवाजीनं पाहिला ॥ चाल ॥ डोळे उघडले, गुप्त जाहली देवी, दिला साक्षात्कार । नंतर शिवराजानं जमविले सर्व मावळे सरदार ॥ मोरो, शाम, रघुनाथ पेशवे, नारो शंकर माणकोजी । इंगळ्या सुभानजी, शूर जिवाजी, पिलाजी, नेता, तानाजी ॥ चाल ॥ मग बोलला राजा गहिंवरुन साऱ्या मावळ्याला ॥ " काय सांगूं तुमच्या प्रेमाला ? । ही राहिली तुमची आठवण जन्मोजन्माला ॥ राखायला माझ्या जीवाला । तुह्मी सोडलं साऱ्या सुखाला । घरदारं सोडली वाऱ्याला । उतराई होऊं कसा बोला । काय सांगूं वेळ कशि येईल कोणत्या वेळा ? ॥ जगलों वांचलों येईन भेटिला । नाहींतर—" । शिवबाचा कंठ दाटला । पाण्यानं डोळा दाटला । ढळढळा सारा मावळा रडूं लागला ॥ प्रेमाचा दोर भला मोठा खंबीर झाला ॥ काय शक्ति भुंग्याची ! बोला, । पोठ करतो मोठ्या वेळवाचं असला तो झाला । पर दांत लावेना कमळाला । जंवा कमळामाजिं आडकला ! । प्रेमाचं कोडं समजेना ब्रह्मदेवाला ! ॥ " जगलों वाचलों येइन भेटिला । नाहींतर राज्य हें द्यावं उमाजीराजाला ॥ रामराम दादानों घ्यावा आतां या वेळां " ॥ मग सारा मावळा बोलला ।





हुंदक्यानं आला उमाळा । " जाऊं नको राजा ! भेटिला । तो खान कपटी बघ झाला । बरं वाईट होईल जीवाला ! " । मग तान्या बोलूं लागला । " मी जातों शिवा ह्मणुनशान त्याच्या भेटीला ॥ अन् उडवतों त्याच्या मुंडक्याला " । पर राजा त्याला बोलला । " फसवणं कधीं खपणार नाहीं देवाला ॥ मी जातों त्याच्या भेटिला । तुम्ही असा जागजागेला । कम-जास्त झालं तर यावं घुसुन त्या वेळा " ॥ चाल ॥ जागोजागेला मावळा ठेवला दऱ्याखोऱ्यांतुन तय्यार । शाहिर पुढच्या चौकिं सांगणार पुढं घडलेला प्रकार ॥ ७ ॥

—: ८ :—

**पोशाख** केला कसला राजानं सांगतों आतां मी तुह्मांला । वर्णन कधिं कां शिवरायाचं शिणविल माझ्या वदनाला ॥ टोप शिरीं पांढरा शोभला, तुरा मोत्याचा, त्यांत हिरा । शिवमौळी-तुन शुभ्र चालला ओघ गंगेचा काय खरा ! ॥ खांद्यांतून जणु गुप्त जाहली शिवरायाच्या सुरगंगा । उजव्या हातिं तलवार रूपानं प्रगट जाहली धवलांगा ! ॥ आंत पोलादी सील, पांढरा झगा शोभे अंगावरती । मुसेजरी सुरवार पायाला बंद लोंबती त्यावरती ॥ उजव्या हातामधिं बिचवा, वाघ-

नख होतं सर्जाच्या पंजाला । पट्टा जिवा ह्याल्यानं घेतला, तलवार लटके कमरेला ।। जिजाबाईच्या भेटिस गेला ठेवलं डोकं पायावरती । शिवनेत्रांतुन टपटप गळले थेंब पायावर, धन्य सती ! ।। हलुच उठवलं शिवरायाला, अवघ्राण मस्तकिं केलं । जिजामाईनं शिवबाळाला गालबोट तें लावियलं ! ।। जिजा बोले, " कां शिवबा ! डोळे आले पाण्यानं भरभरून । शूर पुत्र तूं, जा प्रेमाचा बंध तोडुनी हौसेनं ।। क्षत्रिय कुळि मी जन्म घेतला, तूंहि तसा क्षत्रियपुत्र । आशीर्वाद हा दिला बाळका ! काय करिल अफजुल् कुत्रं ? " ।। दृष्ट काढली शिवरायाची, दही साइचं तळहातीं । दिलं आईनं, शिवबाळानं चाटुन खाल्लं गोड अती ! ।। किल्ल्याच्यावरच्या उंच तटावर फडफड करि भगवा झेंडा । फडफड करुनी त्यास बोलला, ' फाड ! फाड ! रे तो मेंढा ' ! ।। चाल ।। आठवलं मनीं शिवबानं रामदासाला । चुचकारलं कृष्णेला वरती स्वार मग झाला । धडधडा सात तोफांचा नाद जाहला ।। चाल ।। दुपारची भर वेळ जाहली, सूर्य छत्र धरि किरणांचं । वाऱ्यापर वेगानं चालला राजा, दैव त्या खानाचं ! ।। ८ ।।





—: ९ :—

**कृष्णी** चपळ बहु शिवरायाची मोठी लाडकी ती झाली । चालली घोडी चौफेर सारखी, लाज वाऱ्याला ही आली ! ! ।। टाप घोडिची कणखर मोठी, जमीन भ्याली दणक्यानं । झाडंझुडपं किति टकमक बघती पळति मागं मागं भीतीनं ।। मंडप आला, राजा उतरला, नेली घोडी दूर हुजऱ्यानं । शिवबा बोले त्या हुजऱ्याला, " जपा घोडीला प्रेमानं ! " ।। दबकत दबकत सर्जा शिवाजी चालला भेटिच्या मंडपांत । आनंदाच्या उकळ्या उसळती वेड्या खानाच्या हृदयांत ! ।। शिवरायानं सलाम केला खूष जाहला मनिं खान । ह्मणे शिवाला, " असा शाहाला नाहिं कधीं मिळला मान " ! ।। खान उठुन राजाला बोलला, " शिवा ! एक आशा मजला । मुलासारखा तूं मला वाटतयं कडकडून भेटावं तुला " ।। " ठीक ! ठीक ! " शिवराय बोलला, हरकत नाहीं मुळिं आतां । वडिलापर तुह्मो मला जाहला, नसे मनाला मुळिं चिंता " ।। चाल ।। खानानं हातीं कवटाळलं शिवरायाला ।। खान केवढा धिप्पाड ! शिवबा पोर वाटला ! ।। खानानं कवळ मारली शिवबा दचकला ! ।। शिवबाचं मुंडकं त्यानं दाबलं डाव्या बगलेला ।। प्रसंग जीवावर आला । पर शिवबा चपळ फार झाला । ओळखलं त्याच्या बेताला । अन्

हिसडा मारला त्याला । वाघनखं भिडलीं पोटाला पंजा मारला ! ॥
खानाची आंतडी काढली, फाडलं पोटाला ! ॥ खान हत्ती फार
खवळला । पर करतो काय सिंहाला ? । खानानं केला वार
जिरेटोप छाटला ॥ पर इकडं सर्जानं पट्टा वेगीं चालवला ॥
जणुं नारसिंह प्रगटला । खांद्यात्नं चिरलं खानाला । " खान
' लवा लवा ' बोलला ! " खान 'पट्टा पट्टा' बोलला । आतां कंचा
पट्टा ? सर्जानं घातलं झडपेला ! ॥ बघा झाली त्याची दोन
छकलं आला भूमीला ! ॥ एक मुंगी मोठ्या हत्तीच्या घेइ
जीवाला ॥ मुंगसाचं पिल्लु करि ठार नागसापाला ॥ अभिमन्यु
बाळ करि जेर कितिक लोकाला ॥ श्रीकृष्ण मारी कंसाला ।
रामचंद्र मारी रावणाला । सर्जाची खूण लोकांला । लगबगीनं
जमला मावळा । बंडा सय्यद करतो वाराला । पर जिवा झाल्यानं
बंडा सय्या पुरा केला ॥ घनघोर केलं युद्धाला । रक्ताचा पाट
चालला । शिवराय वेगानं आला । खानाच्या छाटलं मुंडक्याला ।
अन् मुंडकं घेऊन शिवराय किल्ल्यावर गेला ! ॥ रक्तानं
माखलं देविला । मग मुंडकं टांगलं बुरजाला । यवनांचा मोड
पुरा झाला । पळ काढला यवनी फौजेनं, आनंद झाला ! ॥
दुंदुभी झडूं लागल्या कर्णा वाजला ! ॥ नऊ तोफा झडल्या
लोकाला आनंद झाला ! ॥ गुढ्या तोरणं घरादाराला । उभी केली
उत्साव केला । ' धन्य धन्य अवतारी राजा ' डंका गाजला ! ॥





चाल ॥ मागं रचला अज्ञान दासानं शिवरायाचा पोवाडा ।
भाग्य त्याचं राजानं दिला एक तोडा सोन्याचा आणि घोडा ॥
ये शिवराया ! पुन्हां कधीं तूं येशिल तोडा देण्याला ! । नित्य
उभा कर जोडुनि तुमच्या ' पांडुरंग ' हा कवनाला ॥ ९ ॥

अ. वैशाख शु० ११. शके १८५१.

## प्रतापगड !

जेथें श्रीशिवराय नित्य फिरले, जेथें जिजा माउली, ।
जेथें वीर रणीं धुरंधर, जिथें शोभा सदा राहिली; ॥
तेथें आज भयाण सर्व दिसलें ! भ्याली मनीं भीति ही ! ।
कोल्हीं आरडतीं सदैव घुबडें घूत्कारितीं सर्व हीं ! ॥ १ ॥

* * *

किति दिवस हे दुर्भाग्याचे प्रतापगडा ! तुला ।
विपद तव ही तोलायाला नसे जगतीं तुला ! ॥
जरि कठिण ही आली आतां गडा ! तुजला दशा ।
तरि उजळल्या त्वत्कीर्तीनें सख्या ! सगळ्या दिशा ! ॥२॥

* * *

तुझा तो भगवा झेंडा तुझें तें गतवैभव ॥
तुझा तो कलिजा राजा भेटेल, विजयी भव ! ॥३॥



# ६

## शिवप्रतिज्ञा

## पोवाडा.

शिव छत्रपतीची कीर्ती । गाऊं दिनराती । येईल मग स्फूर्ती । जाई भयभीति सारी विलयाला ! ॥ बाळपणीं झेंडा उभा केला । स्वराज्याचा पाया घातला । मावळा जमविला । धन्य जगिं झाला ! ! ॥ ध्रु० ॥

—: १ :—

एके दिशीं शहाजी शिवबाला । बोलला, " चल बाळा । जाऊं दरबाराला ॥ जाऊं चल बादशाच्या भेटीला । थाटमाट मोठा बघ बाळा ! । बघुन होईल थंड तुझा डोळा । म्हणून ठरविला । बेत या वेळा " ॥ " चला, बाबा ! " बाळ बोलला। पोशाख केला । गेला दरबाराला । पाहिला बादशहाचा मोठा दरबार । बसले होते कैक अमीर सरदार । शाहाचा होता मोठा

परिवार ! ॥ हत्तींच्या सोंडांनीं भले । कारंजे केले । तुषार उडविले । इंद्रधनुष्यानीं कमान जिथं केली ! । अशी जिथं शोभा रंगली । आस भंगली । तिथंच, बघा आली । शिऊला ओकारी ! ! ॥ सान्याच्या फुलांचा सडा । कुबेर जिथं खडा । वाद्य झडझडा । झडति जिथं रंग आला नाचाला । जिथं प्राणीमात्र रंगला । तिथं शिवबाला । कसा वीट आला । ठाव कोणाला ! ! ॥ तंव शहाजी बोले शहाला । "शिवबाळ आला । आपल्या भेटीला । कर रे बाळा ! कुर्निसात मानाचा । हा घ्यावा मुजरा पोराचा । बंदा हुकमाचा । मुलगा हा आमुचा " ॥ शिवबाळ बोलला बापाला । "नमावं देवाला । नमावं तुम्हांला । नमणार नाहीं कधीं पण त्याला । अपमान झाला । राग मज आला ! ॥ हा 'बंदा' नाहीं शाहाचा । बंदा रामाचा । पळ्या मानाचा । नमणार मान नाहीं कधीं याला ॥ राहवेना बाबा ! हो मला । जातो मी घरा । आतां या वेळा " ! ॥ चाल ॥ असं म्हणून दरबारत्नं बाळ थेट चालला ! ॥ जसा छावा सिंहाचा नाहीं ठाव भीतिला ! ॥ रस्त्यात्नं त्याच वेळेला । एक ब्राह्मण नेई गाईला । तिचं वासरु होतं पाठीला । येक खाटीक सुरा घेऊन मागं लागला ॥ 'जब करतो गाय' बोलला । पाणी गाईच्या हो डोळ्याला । झाली कावरीबावरी त्या वेळा । हंबरडा फोडूं लागली, लागली कांपायाला ! ! ॥





हजारों लोक बाजूला ॥ पर बघा कोण पुढं आला ? । शिवबाळ वेगानं आला । अन् खाटकाचा हात उडविला । सारा लोक थक्क जाहला ! । कुजबुजती एकमेकाला । "आतां काय होईल ठाव देवा ! कोणाला " ! ! शिवबाळ घरीं परतला । पर त्याचा निर्धार झाला । "हिंदवी-राज्य" करण्याचा हिय्या घेतला ! ! ॥ १ ॥

—: २ :—

**हिंदवी**-राज्य करण्याला । पुणें प्रान्ताला । शिवबाळ गेला । मावळीं बारा आणलीं सारीं कबजाला ॥ ध्रुवबाळ याच्या जोडीला । एकटा शोभला । निश्चय केला ! ॥ मावळ्यांचीं दुःखं ओळखून । द्रव्य देऊन । समाधान करून । जोडलीं मनं त्यांचीं आपल्या कार्याला ॥ जशी वानरं रामचंद्राला । यादव कृष्णाला । तसा मावळा झाला । शिवबाळाला ! ॥ चाल ॥ नरसप्रभु रोहिडा खोऱ्याचे । देशपांडे होते त्या वेळा ॥ दादाजी मुलगा हो त्याचा । दिलदार चित्ताचा झाला ॥ नरस प्रभु ऐंशी वर्साचा । पर सुरकुती नव्हती गाला ॥ मिशा कल्ले पांढरे जरी झाले । तरी लाली होती डोळ्याला ॥ दांत कितो घट्ट हो सांगूं ? ॥ जणू वज्रपंक्ति तोंडाला ! ॥ हरबरे घट्ट मुलखाचे । करि चूर

एका दणक्याला ! ॥ धार्मिक मोठ्या भक्तीचा । नित्य पूजी रोहिडेशाला ॥ चाल ॥ पर विजापुरचा अंकीत ॥ नरस प्रभू होत ॥ वसूल जमा देत ॥ रोहिड्या खोऱ्याचा यवनी राजाला ! ॥ ॥ चाल ॥ एके दिवशीं दृष्टादृष्ट झाली । नरस प्रभु आणि शिवबाची । दृष्टिला दृष्टि ती भिडली । गांठ पडली जीवा-शिवांची ॥ चाल ॥ मग बाळ चौदा वर्षाचं बोले नरसाला ॥ " होतो विजापूर गांवाला । खाटीक कांपी गाईला । मी उडवलं त्याच्या हाताला । भवानी आली समाला । रोहिडेश आला समाला । अन् मला बोलूं लागला । ' रे बाळा ! येऊं दे चढती दौलत तुला ! ॥ तूं राख गाय–धर्माला । सारा मावळा येइल धांवून तुझ्या मदतीला ॥ कर बाळ ! आपल्या राज्याला, । असा दृष्टांत हो जाहला ! ॥ आता राखा लाज पोराची यावं मदतीला" ॥ नरस प्रभु आणि दादाजी देती वचनाला ! ॥ चाल ॥ नरसाजी आणि दादाजी । मोठे रणगाजी । जोडले निज काजी । झाला आरंभ मोठ्या कार्याला । शिवसांब सहाय हो ज्याला । अडथळा त्याला । कसला नाहीं झाला ! ॥ २ ॥

—: ३ :—

रोहिड्याच्या डोंगरावर । जमले रणवीर । करण्या निर्धार ।





बेडी आर्यांची दूर करण्याला ॥ धन्य धन्य दिवस तो झाला । धन्य तो मेळा ! । अजरामर झाला ! ॥ गुरु कोंडदेव दादाजी । बाल शिवाजी । नरस, दादाजी, । मावळे जमविले कैक त्या वेळा । सांबाच्या देवळामधीं । आणिल काय विधी । वेळ तशीं कधीं । सुदिन तो झाला ! ॥ रोहिडेश सांब साक्षिला । ठेवून त्या वेळा । मध्यरात्रीला । बोलला शिवबाळ साऱ्या लोकांला ॥ " कां जमलों आपण या वेळा । आज या स्थळा । सांगतो तुम्हांला ! ॥ चाल ॥ घरदार लुटलं संपूर्ण । हैराण झालों जुलमानं ॥ हरघडी गाईची मान ॥ किती तुटतो नाहीं त्या मान ! ॥ जर राखलं नाहीं घरदारा । धिःकार आमच्या जगण्याला ! ! ॥ जर राखलं नाहीं गाईला । थू ! थू ! ! रे आमच्या जगण्याला ! ! ॥ ' हिंदवी–राज्य ' करण्याचा । आज आम्ही निश्चय केला ॥ चाल ॥ काय भितायं आपल्या मरणाला ! । आज नाहीं उद्यां तर घाव मरणाचा आला ! ॥ नर्कांतले किडे नर्कांत करती मौजेला ! ॥ काय तुम्ही तसले हो झाला ? । छे ! माणूस ह्मणती तुम्हांला । म्हणून सांबाच्या शिवा पिंडीला । अन् घ्यावं आतां शपथेला । " असं शिवाजी हो बोलला । रोहिड्याच्या डोंगरानं, पुन्हां पुन्हां तोच बोल त्यांना सांगितला ! ! ॥ सांबाच्या पिंडीच्या भोंवतीं जमला मावळा । अन पिंडीवरती ठेवलं हाताला । अन् घेतलं तिथं

चाल ॥ साठी बुद्धि नाठी ! हे बोल । खरे झाले ! गेला ग तोल । आतां दरी दुःखाची खोल ! ॥ शिवाजिनं पुंडावा केला । नरसप्रभू सामिल हि झाला । खलिता मी शाहाला लिहिला ! ॥ चाल ॥ बादशाहा खूष होईल । बढती देईल । सुभेदार करील । खास ग मजला । मग हिऱ्यामाणकानं फुलवीनं । सोन्यामोत्यानं ग नटवीन । उमलेल हृदयाचं पान । असा योग छान । आला या काळा " ॥ ऐकून पतीचे बोल । सतीला खोल । मंचकीं घोळ दुःखाचा झाला ! ॥ कीं चवताळली वाघीण । काय फण-फणली नागीण । पतीस पाहून । बोलली बोला ॥ " कधीं नाहीं उलट बोललं । वचन मोडलं । दुःख नाहीं दिलं कोणत्या वेळा । बाई ! केलं केवढं हें पाप । माझ्या संताप । चित्ताला झाला ! ! ॥ चाल ॥ राहवेना आतां हो मजला । ऐकावं चार शब्दाला । बायकोचा शब्द जरी झाला । तरि हळू चित्तावर झेला ॥ चाल ॥ लागला डाग वंशाला । डाग नांवाला । डाग अंगाला । बाई ! केलं केवढं हें पाप । माझ्या संताप । चित्ताला झाला ! ! ॥ चाल ॥ कां जळली नाहीं लेखणी पत्र लिहितांना । कां झडला नाहीं हो हात पत्र लिहितांना ! ॥ कां झडली नाहीं हो जीभ असं वदतांना ! ॥ म्हणतील 'फितूर' तुम्हाला । घात देशाला । घात कीर्तीला । खास हा आर्या ॥ बाई ! मला वाटते लाज । अशांची आज । झाले मी भार्या ! ! ॥ यवनांनीं धूमाकुळ केला । भीति





साध्वीला । भिती गाईला । फास कंठाला ! ॥ देवतांच्या मूर्ती भंगल्या । अशा त्यांच्या लीला चालल्या । जो झटे मुक्त करण्याला । अशा जीवाला । दीनदुबळ्याला । त्याच शिवबाला । वैरी तुम्ही झाला ॥चाल॥ आग लागो सोन्यामोत्याला । आणि असल्या उस-न्या भोगाला ॥ चाल ॥ पर रुचला नाहीं बोल त्याला । लालेलाल झाला । म्हणे बायकोला । " हट् गे वेडे ! सांगू नको कांहीं मजला ॥ नवऱ्याची लाज नाहीं तुला । आंवर जीभेला । लहान तोंडाला । मोठा घांस झाला ! ! " ॥ ५ ॥

—: ६ :—

**बादशाह** खलिता वाचून । झाला रागानं । लाल, मग त्यानं । पाठवलं पत्र नरस प्रभुजोला । " तुम्ही घोर अपराध केला । शिवाजीच्या नादिं लागला । रोहिड्याच्या डोंगरावर । झाला विचार । आमचा कारभार । हाणुन पाडण्याला ! ॥ शिवाजी टवाळ एक पोर । तुम्ही पर थोर । विचार हा घोर । सुचला तुम्हाला कसा समजेना । होतील यातना नाना । बंडखोरांना । पाजी हरामांना । तुमच्या सारख्यांना ॥ या शरण आठ दिवसांत । मावळ्यासहित । नाहींतर घात । खास हो करिन तुमच्या जीवाला । करवून जप्त जहागीर । बेचिराख करिन घरदार ।

उडवीन तुमचं मग शीर, । यावं भेटीला " ।। चाल ।। शाहाच्या वाचलं पत्राला । नरस प्रभू घाबरून गेला ! ।। हाय खाल्ली त्याच वेळेला । पूजितो रोहिडेशाला ।। अनुष्टान करित सांबाला। सात दिवस उपास केला ।। चाल ।। दादाजी प्रभु तंवा बोलला आपल्या बापाला ।। "बाबा ! धावा धीर चित्ताला । कुणासाठीं करतां चिंतेला ? । दोन दिवस जगणं तुम्हांला ! । मग कोणच्या करता चिंतेला ? । जहागीर राहावी पोराला । म्हणून करतां काय काळजीला ? । पर हा देह दिला धर्माला । जहागीर गेली तरि फिकीर नाहीं हो मला ! ।। रोहिडेश वाली आह्मांला । तो दूर करील दुरिताला । असं बाबा ! असल्या प्रसंगीं वाटतयं मला " ! ।। चाल ।। पर कशी बातमी कळली शाहाला । कळेना हो त्याला । वैरी कोण झाला । लागली चिंता हीच दादाला। रोहिडेश सहाय हो त्याला । आला मदतीला । देव वश झाला ! ।।६।।

—: ७ :—

**ती** बातमी कळली शिवबाला । बाळ जरि झाला । धीर त्यानं केला । पत्र मग धाडलं नरसप्रभुजीला । काय बारा वर्षाचं पोर । देई पर धीर । थोरामोठ्याला ! ।। "शाहाचा राग फार झाला । आपल्यावर आला । दुःखाचा घाला । कळली ही





वार्ता आज आह्मांला ।। रोहिडेश सांब मदतीला । सोडुं नका आपल्या धीराला । भार देवाला । भक्ताचा झाला ।। ज्यानं दिलं सहाय्य ध्रुवबाळा । अंबरीषाला । पंडुकुमरांला । राखील तोच देव आम्हांला ! हिंदवी राज्य करण्याला । पुढं जो झाला । त्याच्या मदतीला । देव हो आला ! ! ।। चाल ।। नरसाजी ! आणि एक बोल । ऐकावा सांगतों तुम्हांला ।। देहाची करुन हो ढाल । राखीनं आधीं तुम्हाला ।। देहाची करुनि या भिंत । आड करिन तुमच्या जीवाला ।। माझ्या रक्ताचा हो कारंजा । भिजवील आधीं तुम्हांला ।। माझ्या लालबुंद डोक्यानं । पूजीन तुमच्या पायांला ।। पंच प्राणांच्या हो ज्योतीनं । ओंवाळीन आधीं तुम्हांला ! ! ।। ही खूण धावो ह्रदयाला । लक्षांत ठेवा या बोला ।। चाल ।। जंवर माझा नाहीं जीव मेला । तंवर धक्का नाहीं कसला तो तुमच्या जीवाला ! ।। लौकरच आतां मी येईन तुमच्या भेटिला " ।। असं पत्र धाडलं नरसाला । इकडं काय प्रकार झाला । नरसप्रभू अनुष्ठान करित होते सांबाला ।। पूजा बांधली रोहिडेशाला । गंधाचा वास पसरला । धूप देवाला हो घातला । इतक्यांत पत्र घेऊन एकजण आला ।। त्यानं दिलं पत्र नरसाला । नरसप्रभू वाची पत्राला । शिवाजीचं पत्र पाहून नरस गहिंवरला ! ।। "ह्मणे, धन्य ! धन्य ! ।। शिवबाळ आलं जन्माला ! ! ।। अजून मिसरूड फुटलं नाहीं त्याला ! । पर

देतों धीर आम्हांला " ! । असं बोलला आपलं आपणाला । मग डोळे घट्ट झांकून । करित ध्यानाला ! ॥ एकाग्र चित्तानं झाला । मग काय चमत्कार पाहिला । ऐकावं सांगतों तुम्हाला । पिंडिलं त्याच वेळेला । 'धुम्म्' असा आवाज झाला ! ॥ दुभंगली पिंडी ते वेळा । अन् शिवाजीचं रूप घेऊन सांब प्रगटला ! ॥ असा चमत्कार पाहिला । मग डोळे उघडून पाहिलं बाहेर त्या वेळा॥ शिवबाळ त्याला दिसला ! । आला नंदीचा हो कंटाळा । म्हणून घोड्यावर बसून जणु काय सांब भेटिला आला ! ॥ बघा इकडं दुसऱ्या बाजूला । हा कोण त्याच वेळीं आला । दादाजी पुढच्या बाजूला । अन् बाळाजी मागच्या बाजूला । दादानं त्याला कैद केला ! । पुढ काय प्रकार झाला । सांगीन पुढच्या चौकाला ॥ ७ ॥

—: ८ :—

**दादाजी** बोले शिवबाला । "वैरी हा झाला । बादशाहाला । बेत कळविला यानं हो सारा । ह्मणुन कैद केलं मी याला । आणि आणलं आज या वेळा । आतां हातीं घ्यावी तलवार । उडवावं शीर । देहाचा चूर । करून बळि द्यावा । घारीगिधाडाला ! ! ॥ इवितिवी नाश होणार । आमचा खरोखर करा परि ठार । दुष्ट हा आधीं घात करणारा । देहान्त





प्रायश्चित्त याला । अशा पातक्याला । योग्य या काळा ॥ बहिणीच्या माझ्या पति जरी । असे हा तरी । पाप जो करी । दया माया कधीं दाउं नये याला ॥ आज साप आम्हां चावला । उद्यां डसेल कितिक दुसऱ्याला । 'आईबाप भाऊ सोयरे । कांटे जर झाले । उचलावे सारे'। धर्म हें वदला " ॥चाल॥ दादाचा सल्ला आवडेना बाळ शिवबाला ॥ मग बाळाजीला बोलला । "बाळाजीराव ! ऐकावं दोन शब्दाला ॥ चाल ॥ बाळाजी ! ऐका शब्दाला । कठिण काळ आला । धर्म गांजियला । फांस कंठाला ॥ निशिदिनीं लागला घोर भरतखंडाला ! ॥ गाय हंबरती हरघडी । रडती बापडी । सुरी पर खडी । मानेवर आली ! । झाली मान धडावेगळी ! । जीभ लांब बघा लोंबली ! । बघा चालल्या गुळण्या रक्ताच्या जीवा अंतरली ! ! ॥ जर नसे रुचत हा बोल । घ्या ही तलवार । उडवा हें शीर । आधीं या वेळा । मग सुभेदार होऊन भोगा सोहाळा " ! ॥ चाल ॥ उपरति झाली चित्ताला । बाळाजीपंत गहिंवरला ॥ मिठी मारली घट्ट शिवबाला । पाण्याचा पूर डोळ्याला ! ॥ मग काय बोलला शिवबाला । "अर्पिला जीव चरणाला ॥ जरी दिलं इंद्रपद मजला । तरि नाहीं शिवणार त्याला ! ॥ आपल्या चरणाचा मी पायपोस । काय काम सांगावं मजला " ॥ असा सारा प्रकार झाला ॥ चाल ॥ पुढं तोरणा किल्ला घेऊन । बाळाजीरावानं । बांधलं

तोरण । हिंदवी-स्वराज्याचं त्या वेळा ॥ 'पांडुरंग' शाहीर झाला ॥ कीर्ति गाण्याला । आज या वेळा ॥ ८ ॥

श्रावण शु० १५. शके १८५३.





# ७

# वीराग्रणी मुरारबाजी देशपांडे

अर्थात्

# पुरंदरचा वेढा !

## पोवाडा.

ज्याच्या कबंधानं भूतळीं । तीनशें जण बळी । घेतले पुरंदरीं । मुरारबाजी धन्य धन्य सरदार । झाला तीन लोकां वीर तो प्यार । शाहीर पांडुरंग गाणार ॥ ध्रु० ॥

—: १ :—

**शाहिस्तेखानाची** केली पार धुळदाण । जरी आला होता एक लक्ष फौज घेऊन । बोटें तोडुन शाहिस्ता केला फार हैराण । हैराण फार होऊन । पुणें सोडून । गेला जल्दीनं ॥ जसा

पाला पाचोळा उडवि पवन लीलेनं । किंवा ढग मोठमोठाले एका लहरीनं । मेंढ्यांचा कळप उधळावा जसा सिंहानं । तशि थोडी युक्ति योजून । दिला हांकलून । शाहिस्ताखान ॥ केल्या स्वाऱ्या अवरंगजेबाच्या मुलखामधून । चार दिवस सुरत शहराची लूट मारून । अगणित द्रव्य जवाहीर मोतीं घेऊन । भयभीत केला यवन । यवनांची झाली गाळण । ध्यानीं मनीं दिसतो सैतान । झोंप ही न छान ! ॥ कोण रात्रीं झोंपेंतून उठती बरळ बरळून । पाहती स्वप्न आणि त्यांत शिवा सैतान ! । भिंतीला जाऊन थडकती वेगवेगान । आरडती किंचाळुन कोण । सैरावैरा धांवती कोण । वस्त्र सोडून ! ॥ 'शिवाजी डोंगरी उंदीर फार लहान । तो करतो काय चिरडून त्याला टाकीन–' । असा होता बादशहाचा वेडा हो भ्रम । शिवाजीनं केली धामधूम । धामधूम झाली पाहून । शाहाचं मन । झालं हो खिन्न ॥ उंदीर नव्हे हा, असे रे जहरी बाण । आला ! आला ! जाइल छातितून पार घुसून । पादशाही करिल हैराण, काळ दारुण ! । दारुण करुनिया रण । रणिं करिल यवनकंदन । करिल धुळदाण ॥ चाल ॥ अवरंगजेबाला शत्रु प्रबळ हा झाला ॥ शाहित्याची फजिती ऐकून शाहा लाल झाला ॥ शिवाजीचा कांटा काढण्याचा बेत त्यानं केला ॥ मग बोलला जयसिंगाला । "शिवा मोठा पुंड हो झाला । त्यानं मुलख हैराण केला । हा कांटा मोंगलशाहीला ।





जर असा वाढूनच दिला । तर होईल भारी आम्हांला । मामाचा मोड त्यानं केला । प्रतापगडीं खान ठार केला । लुटालूट केली सुरतेला । त्यानं केलं जेर शिद्दीला ॥ दरारा त्याचा मुलखाला । हें विघ्न आमच्या राज्याला । तुम्ही जावं पारिपत्याला । दिल्लीरखान तुमच्या मदतीला । कांटा हा काढा या वेळा " ॥ असं बोलला जयसिंगाला । मग शाहा बोलला एकांतीं दिल्लीरखानाला ॥ 'तुम्ही जावं जयसिंगराजाच्या संगें मदतीला ' ॥ पण कानमंत्र हा दिला । "नीट ठेवा तुमच्या लक्ष्याला । जयसिंग हिंदु हा होइल फितुर शिव्याला ! ॥ हिंदु हिंदु एक होतील होइल घोंटाळा ॥ बारीक सारीक साऱ्या बातमीला । नीट काढा आतां या वेळा । नीट ठेवा त्याच्यावर डोळा । आणि स्वारी फत्ते करून यावं दिल्लीला " ॥ १ ॥

—: २ :—

**मग** फौज ऐंशीं हज्जार । पायदळ, स्वार । घेऊन पेंढार । मिर्झाराजा आणि दिल्लीर आला । वेगानंच दख्खन देशाला । हिंदवी राज्य चिरडण्याला ॥ मिर्झाराजा आणि दिल्लीरखान । राहु केतु जाण । आले जोडीनं । ग्रासाया सूर्य–शिवाजीला । हिंदू हिंदूला काळ झाला । निखारा अस्तनींत पडला ! ॥ हत्ती घोडे

बैल आणि उंट । होते अफाट । तोफा घनदाट । थाट माट तेव्हां फार केला । आकाशीं दाट धुरळा भरला । सूर्याला पार लोपवीला ।। चाल ।। विजापूरच्या आदिलशहाला । अवरंगजेबानं धाडलं पत्र ते वेळा ।। कीं " करा मदत आतां या वेळा । शिवाजीनं पुंडावा केला । अफझुलखान तुमचा ठार केला । देतो हा पीडा मुलखाला । हा शत्रु तुम्हां आम्हांला । दोघं मिळून चिरडूंया त्याला । मी फौज मोठी धाडली हो दख्खन देशाला ।। तुम्ही पाठवा फौज या वेळा । दोघं उचल खाऊं या वेळा । आणि करूं ठार हो त्याला । सापाचं पिल्लु हा झाला । वेळींच डोकं ठेचुंया आज या वेळा " ।। आदिलशहा पत्र वाचून खूष फार झाला ।। फाजलखान फौज देऊन धाडला मदतीला ।। आणि गेलीं पत्रं कितिकांला । जावळीच्या मोऱ्याचे मुलगे–बाजी, अंबाजी–गेले मदतीला ।। शिवप्पा नाईक बेदनुरचा । जहागिरदार बसवपट्टणचा आला मदतीला ।। माणकोजी धनगरही आला । कोळीराजे गेले मदतीला । शिवाजीचा नाश करण्याला । कुऱ्हाडीचा दांडा गोत्याला काळ हो झाला ।। कुंपणानं खाल्लं शेताला ! । भावानं मारलं भावाला ! । असो ! असे राजे यवनांच्या गेले मदतीला ।। जयसिंग दक्षिणेंत आला । सासवड गांवीं तळ त्यानं दिला । आणि पुढच्या स्वारीचा विचार त्यानं सुरूं केला ! ।। २ ।।





—: ३ :—

**झुंज** झुंजणं शिवरायासी नव्हतं परि हलकं काम । खेळ सिंहाशीं किंवा सापाशीं जसा, तसा तो दारूण ।। मिठी मारावी जशी जोरानं धगधगलेल्या अग्नीला । किंवा लावावा मोठ्या जोरानं हात मृत्युच्या दाढेला ।। ठाऊन होते जयसिंगाला असें म्हणुनि तो घाबरला ! । घालुनि पोकळ धाक, करुनिया तह मग जावं दिल्लीला ।। विचार करुनी पोक्त असा हा लिहिलं पत्र शिवरायाला । " शिवराया ! तुज सल्ला सांगतों ऐक हिताच्या बोलाला; ।। देवधर्माचं रक्षण करण्या खटाटोप तुमचा झाला । पाहुनि मजला तोष वाटतो अनुकुल आम्ही कार्याला ।। बलाढ्य शत्रू परि मोंगल हा भारी तुम्हाला हो झाला । स्वराज्यतरु हा फुलण्यापूर्वीं येइल बोजावर घाला ।। साम करावा ! समेट घडवून आणिन मी या वेळेला । सोडुन शंका शुद्ध मनानं यावं आमुच्या भेटीला ।। एकलिंगजी दैवत आमुचं, घेउनि त्यांच्या शपथेला । आश्वासन मी देतों, किमपि न धोका तुमच्या जीवाला " ।। पत्र वाचुनी शिवरायानं जबाब लिहिला मग त्याला । पत्र वाचुनी आनंदाचा सागर हृदयीं खळखळला ।। चाल ।। जे वीर पुरुष जाहले । आर्य आपुले । सर्व बिघडले । दास ते बनले । मनि मानलालसा धरुनी अंकित झाले ! ।।

चाल ॥ हें असें मला बघवेना, या पुढें । पाहुनी चित्त हें माझें तडतडे ! ॥ निशिदिनीं हृदय हें माझें धडधडे ॥ चाल ॥ क्षणभर मजला चैन देइना क्षात्रधर्म हा मला । देह हा या कामीं वाहिला ! ॥ चाल ॥ परराजे आज तुम्ही दया दाखवा मला ॥ हा तुमच्या शब्दाबाहेर नाहीं राहिला । जसे वडील माझे तस्सेच तुम्ही हो मला ! ॥ दोन शब्द सांगणं तुम्हांला । हा अधीकार ना मला ! । हें धरा पोर पोटाला । आणि क्षमा करा हो मला । परचक्र मोठं हें आलं हिंदू राज्याला ॥ हा वृक्ष आम्हीं लावला । आतां तुम्ही वाढवा त्याला । मोंगलाचा मुलुख मी देतों परत मोंगलाला ॥ घा तुमचा सल्ला या वेळां । मी येतों तुमच्या भेटीला " । असं पत्रं धाडलं शिवानं हो जयसिंगाला ॥ ३ ॥

—: ४ :—

ही बातमी ऐकून मोंगल दिल्लीरखान । लाल झाला रागानं म्हणे 'हा जयसिंग कोण ? । तह करणार शिवाजीसंगें मोठ्या ऐटीनं । हिंदु हिंदु एक होऊन । मला आतां दूर वगळून । शाहाशीं झाला बेहमान । आज संपूर्ण ' ॥ मग मिर्झाराजाला बोलला दिल्लीरखान । " तह नका करूं शाहाच्या हुकमावीण ।





कायमचा कांटा काढायची संधि सोडून । कां असें मनीं बिचकतां । आज हो आतां । धीर सोडून " ॥ जयसिंग बोलला ॥ " ऐका हो दिल्लिरखान ! । उंदीर नसे हा शिवा, सिंह भीषण । कितिकांना खडे चारून केलं हैराण । कितीकांची मान फाडून । कितीकांचीं बोटें तोडून ! धूळ चारून गेला वेगानं ! " ॥ मग बोलला राजाला मिया दिल्लीरखान । दाढीवरनं मोठ्या तोऱ्यानं हात फिरवून । "शिवाजीला झाला सामील तुम्ही आंतून । केला घात फंदफितुरीनं । हिंदुला घेरलं हिंदूनं । असं मला सांगतय मन । बोला आपण ! ॥ चाल ॥ वाटेल तें तुम्ही हो करा । बेत तुमचा आवडेना मला । मी जातों पुरंदराला । सर करतों पुरंदर किल्ला । तुम्ही जावं सिंहगडाला । शिव्याचा धाक नको मला । मी धरीन त्याच्या कानाला । अन् फरफटत नेइन दिल्लीला । तो कुत्रा करतो काय मला ? । तुम्ही खास फितुर हो झाला । म्हणुन बोलता असल्या बोलला " । असं म्हणुन चालला दिल्लीर पुरंदराला ॥ डोइची पगडी काढून ठेविली भूमीला ॥ अन् बोलला खान आपणाला । 'सर करिन पुरंदर किल्ला । तरच घालीन पगडी डोक्याला ' । असा त्यानं निश्चय केला ! । अन् मग मोठी फौज घेऊन तिकडं चालला ॥ ४ ॥

—: ५ :—

**गडामध्यें** पुरंदरगड । मोठा अवघड । भयंकर चढ । घडधडे ऊर बघुन त्याला । दिल्लीरखान खिन्न झाला । निराशा झडपी हृदयाला ! ॥ पर मोठी हिंम्या धरून । फौज घेऊन । चालला जल्दीनं । पुरंदर किल्ल्याखालीं आला । देश जाळून फस्त केला । किल्ल्याला वेढा त्यानं दिधला ॥ चाल ॥ इकडं शत्रु पन्नास हजार । वर मावळे दोन हजार ! ॥ इकडं वेढा घाली दिल्लीर । वर होता बाजी मुरार ॥ पसरला सेनासागर । मधें पुरंदर कमळ ॥ पुरंदर कमळ सुंदर। वर शोभे देव मुरार! ॥ चाल ॥ मुरारबाजी शूर सरदार । योद्धा घनघोर । शिवबाचा प्यार । झाला तय्यार झुंजण्याला । फिकीर जीवाची नव्हती त्याला । किल्ल्याचा बंदोबस्त केला ॥ धान्याची तरतूज केली। किल्ल्यावर भली। शस्त्रं जमविलीं। तोफ चढविली हो बुरुजाला। कडेकोट बंदोबस्त केला । झाला तय्यार झुंजण्याला ॥ चाल ॥ मुरारबाजीनं बेत केला । गनीमाचा लोक फार आला । भेड-सवावं दिल्लीरखानाला । म्हणून पठाणाचा वेष केला । मावळा पांचपन्नास मदतीला । रात्रीं किल्ल्याच्या खालीं गेला । शत्रुच्या छावणामंदि शिरला । रखवालदार ठार केला । दारुगोळा सारा लुटुन नेला । अन् चट्कन किल्ल्यावरतो गेला ! । गनीम मग





उठला पहांटेला । बघतो दारूच्या कोठाराला । अन् मारतोय हात कपाळाला । आज काय दारुगोळा नेला । उद्यां काय चोरटा हल्ला केला । परवां ठार केलं शिपायाला । बभ्रा हा रोजच्या रोज झाला ! । एकदां रात्रीच्या समयाला । मुरार-बाजीनं, पंचवीस जणं, मावळे घेऊन, वेश बदलून हल्ला केला। पठाण सारा होता झिंगलेला । मुरारसिंहानं हल्ला केला । तल-वारीनं चिरलं कितीकाला.। यवन खडबडून जागा झाला । हात मग मारतोय तोंडाला । तोबा ! तोबा! सैतान हा आला । पळतो वाचवायाला जीवाला। कितिक दरीमंदि खालीं पडला!। ऐकावं र दादा ॥ चाल ॥ मग झाला रागानं लाल दिल्लीरखान। म्हणे 'ठार करिन सैतान तलवारीनं । उद्यां शर्थ करून हा खास गड जिंकीन' । वर्णन पुढच्या चौकांत पुढं सांगीन ॥५॥

—: ६ :—

**निकराचा** हल्ला मग केला । सुरुंग लावला । गडाच्या बुरुजाला । तोफांचा मारा वरनं झाला । सुरुंग लावणारा ठार केला । मुडद्यांचा मोठा ढिगारा पडला !॥ धडधडा धुम्‌धुम् धडधडा । आवाज कडकडा । गोळे धडधडा । धडकतो येऊन बुरजाला । बुरुज कोसळला धरणीला । आणीबाणीचा काळ

आला ! ॥ चाल ॥ शत्रु होता पन्नास हजार । वर मावळे दोन हजार ॥ तरी त्यांनीं केलं बेजार । दिल्लीर झाला दिलगीर !॥ परि फौज होती अनिवार। मुरारबाजी काय करणार ? ॥ तरी त्यानं केला बहु जोर । कितिकांना केलं हो ठार ! ॥ चाल ॥ ढांसळला बुरुज किल्ल्याचा । मुरारबाजीचा । बुरुज हृदयाचा । त्वेषानं लालेलाल झाला ! । मावळे घेऊन हल्ला केला । गातों मी त्याच्या पोवाड्याला ॥ शत्रूंचा हल्ला उधळला । मुरार परतला । खान वेडा झाला । बघून मुराराच्या प्रतापाला । मग त्यानं दुसरा बेत केला । पुरंदर किल्ला जिंकण्याला ! ॥ चाल ॥ पुरंदरच्या एका बाजूला । एक किल्ला होता दुसरा । वज्रगड म्हणती हो त्याला । त्या किल्ल्यावरनं डागाव्या तोफा या वेळा ॥ मग पुरंदर किल्ल्याला । थडकेल जोरानं गोळा । असा बेत खानानं केला । अन् तिकड मोर्चा फिरविला । बाबाजी बोवाजी वरती होता ते वेळा ॥ यशवंतराव त्याचा हो भाऊ धावला मदतीला ॥ दोघांनीं नेट फार केला । धारातीर्थी देह टाकला । खानानं किल्ला सर केला । तोफखाना वरती चढविला । काळ मोठा कठिण हा आला । आतां पुरंदर खास गेला । असं वाटलं मुरारबाजीला । निकराचा विचार त्यानं केला । मग बोलला आपल्या बायकोला । सांगेल शाहीर आतां पुढच्या चौकाला ॥ ६ ॥





—: ७ :—

**मुरारबाजी** बोले बायकोला । "आला हा घाला । आज किल्ल्याला । शिकस्तीचा यत्न मी केला ! ॥ किल्याचा बुरुज तडकला । ढांसळून गेला । शत्रु हा आला । निकराचा काळ ग आला ॥ थोडासा उशीर जर झाला । होईल घोंटाळा। आज या वेळा । सर करिल शत्रु हा किल्ला लाज आम्हांला ॥ जर किल्ला हातचा हा गेला । डाग कीर्तीला । जन्मभर जडला। कसं काळं तोंड दाखवूं मी शिवरायाला ? ॥ जावं असं याच घटकेला । शत्रु चिरण्याला । वाटतंय मजला । धारातीर्थी देह टाकून जावं या वेळा ! ॥ चाल ॥ पर पाश एक जीवाला । प्रेमाच्या तुझ्या ग झाला ! ॥ कसं तोडूं प्रेमपाशाला । ही एक चिंता ग मजला ॥ चाल ॥ तव नेत्र सोडिती बाण । जाती भेदून । हृदय या वेळा । तव लाल अधर मोहती सखे ! हृदयाला ! ॥ करपाश तुझे बलवान । गुंतलें हरिण । तडफडे मीन । कर्तव्यकर्म परि असं आलं दारुण ॥ चाल ॥ काळ इतक्या वर्षांचा गेला । सुख नसे तुझ्या वाट्याला ॥ सदानिदा जातों स्वारीला । सोडुनी सखे ! मी ग तुजला ॥ काय पाप पूर्वजन्मीला । केलंस ग ठाव कोणाला ? ॥ म्हणुन पती असा हा आला । सखये ! ग तुझ्या दैवाला " ॥ चाल ॥ बोलला

असे हे बोल । प्रेम–कल्लोळ । हृदयिं खळखळले ! । भेटाया तिला नेत्रांतून मग ते आले ! ।। प्रेमानं मिठी मारून । झाला एक क्षण । स्तब्ध ते वेळा । पण अश्रु टपटपा तिच्या गाला-वर गळला ! ।। चाल ।। प्रियपत्नी बोले मग त्याला । जरि जीव व्याकुळ झाला ।। “ नका होऊं खिन्न या वेळा । प्रेमाच्या तोडा पाशाला ।। चाल ।। तुह्मी शूरवीर रणधीर । पंचानन रणझुंजार ! ।। किती जन्म नवस मी केले । म्हणुनी मी भार्या झाले ।। अजि नाथ ! भाग्य मम फुललें । म्हणुनी मी भार्या झाले ।। अबलेला तुम्ही वरलें । हें शरीर पावन केलें ।। चाल ।। कर्तव्यकर्म आचरता । धर्मार्थ तनू ही पडता । होईल सौख्य मज नाथा ।। झणि तोडा मम पाशाला ।। हें राज्य नसें शिव-बाचें । हें राज्य देव–धर्माचें ! ।। माजलें बंड यवनांचें । होतात हाल अबलांचे ! ।। पर्व हेंच स्वातंत्र्याचें । धन्य, जो रणावर नाचे ।। चाल ।। मी वीरपत्नी, तुम्ही वीर । गाजवा रणीं समशेर । होउं द्या युद्ध घनघोर । जा पाश तोडुनी सारा ! ।। पण क्षण एक गडे ! थांबावं । मी पंचारती आणीन ।। अक्षता भाळिं लावीन । प्रेमानं दृष्ट काढीन ।। डोळाभर मग पाहीन । मग निरोप मी देईन ” ।। चाल ।। बोलली अशी ती अबला । डोळ्यांतुन अश्रु गळला । गद्गदा कंठ गंहिवरला । ओंवाळुनि मग नाथाला । जाहली धन्य ते वेळा ! ।। ७ ।।





—: ८ :—

**जगदंबा** मातेचं सत्वर करुनी स्मरण । प्रियपत्नीकडं शेवटली दृष्टि टाकून । शेंपाचशें मावळे रणवीर संगें घेऊन । ढाल फिरंग करिं घेऊन । चालला वेगानं । शिवाचा बाण ।। जसा सिंह चवताळुन दरीमधुन तो यावा । एकाच झडपेनं मस्त हत्ती फाडावा । तसा दिसला डोळ्याला मुरारिचा देखावा । तो प्रसंग कविला कां न च स्फूर्तिद व्हावा ? ।। का वीर्यवृत्तिचा मूर्तिमंत हा पुतळा ! । अभिमन्यु बाळ हा किंवा दुसरा नटला ! । कां प्रलयसिंधु हा शिखरावरुनी सुटला ! । यवनांचा कराया अंत । जोरानं जात । तेज उधळीत । आज या वेळा ! ।। तंवा बसला होता हत्तीवर दिल्लीरखान । त्यानं पाहिला वरनं येतांना मुरार खवळून । थरथरलं ऊर खानाचं त्याला पाहून ! । म्हणे, “ सिंह आला रे आला । फाडाया मला । जबडा उघडून ” ।। चाल ।। खण-खणले भाले तलवार । झुंजती वीर । म्हणती ‘ हर हर । महादेव ’ वीर गुंग झाला । लढाईचा कैफ त्यांना चढला । प्रेतांचा ढीगच्या ढीग पडला । हाडकारक्तांचा काला झाला ! ।। केली शर्थ मुरारबाजीनं । कितिक कापून । आला जोरानं । खानानं पाहिलं समोर त्याला । होता रक्तानं मुरार न्हाला । जगूं काय सूर्य उगवणारा ! ।। चाल ।। खान बोलला मुरारबाजीला ।

“ पाहुन रे तुझ्या शौर्याला । हा खान खूष फार झाला । घे
कौल आज या वेळा । अन् ये शरण आज खानाला । शिफारस
करीन शाहाला । अन् चढवीन मोठ्या हुद्याला । नाहींतर
मरशील व्यर्थ या वेळा ” ।। ऐकून शब्द खानाचे मुरार लाल
झाला ।। मग बोलला वीर खानाला । “काय येऊं शरण तुर्काला ? ।
काय विकूं देह मानाला । हा देह दिला धर्माला । हा मुरार
बळी पडणार नाहीं मोहाला ।। एक वेळ गळेल भूमिला अढळ
ध्रुवतारा ।। पण मुरारबाजी हा सदा अढळ रे झाला ! ।। देहाचा
चूर जरि झाला । तरि फिकीर नाहीं रे मला ” । असं बोलला
वीर खानाला । खान हत्तीवरनं उतरला । अन् दोघांचा संग्राम
झाला । गर्जती वीर ते वेळा । कानठळी बसली कानाला ! ।
दैवाचा घाला पण आला ! । मुराराच्या हातावर वार जोराचा
झाला ! ।। ढाल पडली खालीं भूमिला । मग शेला बांधला
हाताला । आणि वीर गर्जूं लागला । खानावर वार त्यानं केला ।
पण तो वार निसटून गेला । इतक्यांत खानानं सोडलं एका
तीराला ! ।। तीर लागला मुरारबाजीला । तीरानं तोडलं डोक्याला ।
शिरकमळ पडलं धरणीला ! ।। तरी धडानं कहर तो केला ।
धूळ चारली तीनशें यवनाला । मग कोसळलं धड धरणीला ।
जीवानं सोडलं देहाला । ‘स्वातंत्र्यदेविच्या गळ्यांमधुन मणि
गळला ! ’ ।। धर्मार्थ देह खर्चून धन्य तो झाला ! ! ।। ८ ।।





—: ९ :—

**देहाचे** तुकडे जमविले । किल्ल्यावर नेले । मावळा मग
बोले । मुरारबाजीच्या बायकोला । “ बाईसाहेब ! मोठा घात
झाला । जिवाचा मोहरा ठार झाला ! ।। प्राण आमुचा सोडुन
गेला । झाला घोंटाळा । ऐन वेळेला । खान घेईल आतां
किल्ल्याला ।। काय आम्ही करावं बोला । अशा निकराच्या
समयाला ? ” ।। नाथाचं प्रेत पाहून । साध्वीचं मन । भरलं
दुःखानं । एक क्षण आली घेरी तिजला । डोळ्यांतुन अश्रु
फार गळला । अंगाला कंप सारा सुटला ! ।। चाल ।। पण दुःख
सारं आंवरून । त्वेषानं लाल होऊन ।। बोलली साध्वी जोरानं ।
पळतांना मावळा पाहून ।। “ कुठं जातां धीर सोडून । मी
आलें खड्ग घेऊन ।। या दुष्ट शत्रु हांकलून । जा ! मरा !
झुंज झुंजून ” ।। चाल ।। असं बोलली साध्वी मावळ्यांला ।
नवऱ्याच्या प्रेतावर शेला । टाकून गेली युद्धाला । मावळ्यांना
चेव तंवा आला । अन् करती घोर युद्धाला । खानानं पाहिलं
वर तिला । अन् तोंडांत घातलं बोटाला । मग बोलला आपला
आपणाला । “ सैतानखाना हा झाला । आतां औरत आली लढ-
ण्याला ! । सोडावं आतां नादाला । काढावं आतां वेढ्याला । सर करणं
असल्या किल्ल्याला । फार बिकट काम हें मला ” । असं म्हणून

वेढा काढून खान चालला ।। मग साध्वी आली माघारा । पालखींत घातलं प्रेताला । अन् पालखी घेऊन चालली रायगडाला ।। शिवराज आले सामोरा । गडावर नेलं पालखीला । शिवराज व्याकुळ झाला ! । खालीं काढलं त्यानं प्रेताला । अन् ढळढळा रडूं लागला ! । जिजाबाई बोलली साध्वीला । " बाई ! उपमा नाहीं ग तुला । देशाला प्राणपति दिलास् । अन् राखलस् ग तूं ही किल्ल्याला ।। चाल ।। त्वत्समान शंभर अबला । जर मिळतिल या देशाला ।। जाईल दुःख विलयाला । चमकेल सुखाचा तारा ।। चाल ।। तव पती जाहला धन्य ! । या समान कोणी न अन्य । चिरकाल जोडलं पुण्य । हा वंद्य तीनि लोकांला '।।९।।

चैत्र शु० १, १८५३.



# ८

## स्वामिभक्त खंडो बल्लाळ

यांचा

## पोवाडा.

कितो झाले वीर रणधीर । किती असतील । किती होतील । परी बिनजोड खंडो बल्लाळ ! । ज्यानं पेटवला स्फूर्तिचा जाळ । अर्पुनी बहिण, बाळ, घरदार ।। ध्रु० ।।

—: १ :—

**फितुरीचा** जाळ भडकला । रायगड किल्ला । त्यांत बळि पडला । राज्याचा कळस गळून गेला । भगवा झेंडा ही खालीं गळला । आशेचा चक्काचूर झाला ! ।। फितुरीच्या धरणीकंपानं । त्रस्त होऊन । धीर सोडून । बुरुज धडाधडा खालीं पडला । धाक फितुरीचा जबर त्याला । दऱ्याखोऱ्यांत लपुन गेला ! ।। फितुरीची जहरी नागीण । डंखे जोरानं । म्हणून अभिमान । पार सोडून निघुन गेला । नीच हृदयांना ऊत

आला । खेळ धुबडांचा सुरूं झाला ! ॥ सूर्याजी पिसाळ गड-करी । फितुरी करी । चरचरा चिरी । देशाची मान, झाला बेभान । मानाचा मोह घालि थैमान । मानी लोकांची मुरगळे मान ! ॥ किल्ल्याचीं दारं उघडलीं । कडी निसटली । मुंडकीं थोडीं खालीं । पटापट पडली दारं आडवुन । कचाकच पाया-खालीं तुडवून । किल्ल्यावर चढले यवन भडकून ! ॥ सिंहाचा छावा, सिंहीण । होती वर दोन । कैद करि खान । आशेचा दोर तुटुन गेला । कोल्हा करि कैद सिंहिणीला । मशकानं सिंह धरुन नेला ! ॥ चाल ॥ शिवबांचें सिंहासन । मग छिन्नभिन्न करून ! ॥ अगणीत लूट मारून । घेऊन सिंह सिंहीण ॥ खालीं भगवा झेंडा पाडून । त्याला पायाखालीं तुडवून ! ॥ उतरला झुल्फिकरखान । अगणीत फौज घेऊन ! ॥ चाल ॥ राजाराम हवा होता त्याला । खानानं विचार असा केला । कीं "सापाचं पिल्लु सर्पीण आली हाताला ॥ आतां एक साप राहिला । जर धरिन एकदा मी त्याला । तर कायमचा तंटा संपला " । असं म्हणून मोठ्या वेगानं खान चालला ॥ रायगडचा किल्ला जंवा गेला । मराठ्यांनीं बेत तंवा केला । कीं "जावं आतां दूर जिंजीला । अन् ततं स्थापावं राज्य या वेळा" । असं म्हणून वेश पालटून सारा चालला ॥ राजाराम बैरागी झाला ! ॥ चाल ॥ संताजी, धनाजी, वीर निराजी, शूर खंडो बल्लाळ, ।





असे वीर चालले बरोबर ॥ झाकावे अग्नि राखेनं । किंवा भात्यानं विषारी तीर । तसे सारे भासले वीर । ॥ चाल ॥ दर मजल करित हे सारे गेले जिंजीला ॥ खान मागोमाग चालला ॥ कडेकोट बंदोबस्त केला । जागजागीं पहारा ठेवला । धडाधडा जिंजीला गेला । अन् किल्ल्याला वेढा घातला । आंत राजाराम कोंडला । पुढचं सारं सांगिन आतां पुढच्या चौकाला ॥ १ ॥

—: २ :—

**सात** वर्स वेढा लढविला । कितिक बळि दिला । व्यर्थ पण गेला । खानाची फौज होती अनिवार । किल्ल्यांतिल लोक झाला बेजार । दाणा दारुगोळा संपला पार ! ॥ तंवा पुढचा विचार करण्याला । वीर झाला गोळा । राजाराम बोलला । " गड्यानों ! आला कठिण हा काळ । भडकला मनीं चिंतेचा जाळ । करूं काय बोला, खंडो बल्लाळ ! ॥ चाल ॥ रायगडच्या किल्ल्याला वेढा बसला जेव्हां । मी होतों किल्ल्यावर तेव्हां ! ॥ तें निशाण भगवें उंच फडाडे जेव्हां । मी होतों किल्ल्यावर तेव्हां ! ॥ रणशूर मराठा वीर । करी धीर शीर । कडाडे जेव्हां । मी होतों किल्ल्यावर तेव्हां ! ॥ निकराचे हल्ले चढवून । केलं खानानं । हैराण जेव्हां । मी होतों किल्ल्यावर तेव्हां ! ॥चाल॥

येसुबाई आणि बाळाला । शत्रूच्या तोंडीं लोटून । जीवाची आशा धरून । मी आलों खालीं पळून ! ॥ तीं दोघं शत्रुच्या दारीं । कंठितीं काळ दुःखानं ! ॥ चाल ॥ माझ्यासाठीं तुम्ही हो सदा झुरता अंतरीं ॥ माझ्यासाठीं तुम्ही हो पडला दुःख-सागरीं !॥ चाल ॥ धिःकार राजारामा ! तुला । मर जा, दुर्बळा ! । व्यर्थ जन्मला । सूर्याच्या पोटीं शनी झालास ! । अजून नामर्दा ! कां रे जगलास ! । झाला रे शिवराईचा ह्रास !" ॥ चाल ॥ खंडोजी बोलला राजाला । "महाराज ! आपणच जर असा धीर सोडला । तर दुसऱ्यांनीं करावं काय बोला । धनाजीनीं गनिम जेर केला ! । संताजी झोंबे शत्रुला । सारा मुलुख परत मिळविला ! । हें सारं ठाव आपणाला । ग्रहणाचा मोक्षकाळ आला । असं आतां वाटतं आम्हांला । मराठ्यांची फौज आली आहे याच बाजूला ॥ धनाजीची गांठ घेण्याला । बहिरोजी आधींच आहे गेला । मी ही जाईन तिकडं उद्यांला । यश येवो माझ्या हाताला " । मग राजाराम बोलला, । "धन्य ! धन्य ! खंडोजी ! यश येइल तुम्हांला ॥ तुमच्यासारखे वीर मदतीला । म्हणून जरा आशा वाटती जीवाला । चला लागा आपल्या कामाला " । असं राजाराम बोलला । पुढचं सारं सांगिन आतां पुढच्या चौकाला ! ॥२॥





—: ३ :—

**दुसरे** दिवशीं उठुन पहांटेला । करून वेश न्यारा । किल्ल्याखालीं चालला । दैवाचा होता उलटा वारा । खानानं ठेवला होता डोळा । खंडोजी बंदिवान झाला ! ॥ दरादरा नेलं ओढीत । फटके मारीत । एका भुयारांत । डांबून ठेवलं खंडो-जीला । ऐन वेळेला घात झाला । संकट आणी संकटाला ! ! ॥ तोफेचे जंजीर कंठीं । मारिती मिठी । अशी जणु भेटी । कधीं लाभली नाहीं जन्मांत । म्हणून मावेना हर्ष गगनांत । खळ—खळ—खळा गाणं गातात ! ॥ हातबेडी पायबेडी दोन्ही । सख्या बहिणी बहिणी । जहरी नागिणी । बसल्या हातीं पायीं विळखे घालून । नागानं ( जंजिरानं ) धरला कंठ आंवळून । जणु नाग-लोका नेलं ओढून ! ॥ चाल ॥ भुयाराच्या आंतल्या बाजुला । सात खांब होते भिंतीला । एक बेडी दरेक खांबाला । लोंबत होती खळखळा । कपाळाची कवटी लटकली एका बेडीला ॥ पायाचीं हाडकं लोंबलीं दुसऱ्या बेडीला ॥ मासाची दुर्गंधी आली तिसऱ्या बेडीला ॥ दातांच्या कवळ्या लोंबल्या चवथ्या बेडीला ॥ हाडकांचा सांगाडा होता पांचव्या बेडीला ॥ जरा वेळानं खान मग आला । आणि बोलला शूर वीराला ॥ "कोण तूं ? काय तुझं नांव ? " । खंडोजी वीर बोलला । " माझं नांव

ठाव नाहीं मला" । चाबकाचा फटकारा दिला । "अरे! कोण तूं ? काय नांव तुझं ?" । "माझं नांव ठाव नाहि मला" । चाबकाचा फटकारा दिला । कोलदांडा घातला पायाला । "कोण तूं ? काय तुझं नांव ?" । "माझं नांव ठाव नाहिं मला" । पुन्हां चाबकाचा फटकारा दिला । त्यासरशी रक्ताची धार उडली चिळचिळा ॥ रक्ताचा लोट चालला ! । मग खान त्याला बोलला । "बच्चाजी ! दहा दिवस मुदत रे तुला । तेवढ्या वेळांत जर नाहीं सांगितलंस् नांवाला । तर–तर बघ त्या जळत्या भट्टीला । त्या वरती भाजिन तुला" । असं म्हणून खान चालला । मग खंडोजी बोलला आपणाला । "जरि मेलों–तरि फिकिर नाहीं मला । पण कार्यघात जाहला । आतां कोण भेटेल बरं मला ! ! बहिरोजी माझा जर आला । तर त्याला सांगिन पुढच्या मार्गाला !" । असं म्हणून खंडो बल्लाळ पडला भूमिला ! ॥३॥

—: ४ :—

**धनाजीची** गांठ घेऊन बहिरोजी आला । पर कळलं त्याला खंडोजी कैद हो झाला । जिथं ठेवलं होतं बापाला तिकडं मग गेला । पर गेला जड पायानं खिन्न बहु झाला ! ॥ तत होता पहारेकरी यवन । पांच मोहोरानं । त्याला वश करून ।





बहिरोजी भुयारांत शिरला । खंडो बल्लाळ त्याला दिसला । होता रक्तानं माखलेला ! ॥ बहिरोजीबाळ पाहून । आलं गहिंवरुन । मोठ्या प्रेमानं । भेटि कडकडून बहिरोजीला । प्रेमाचं भरतं आलं त्याला । जणु आवसेच्या रात्रीं आला । बहिरोजी चंद्रच उदयाला ! ! ॥ चाल ॥ बहिरोजी बोलला पिताजीला । "'मुलखाचा बंदोबस्त केला । किल्ल्यावर किल्ला सर केला । मराठा जिंजीजवळ आला । पंधरा हज्जार मावळा आला । जावं आतां पुन्हां साताऱ्याला । पण धक्काधक्कीचा मामला झाला । चटकन करा मसलतीला । नाहींतर बार फुकट गेला' । असा धनाजीचा निरोप झाला । ऐकावं र दादा ॥ चाल ॥ अशावेळीं वाटतयं मला । कीं तुम्हीं जावं निघुन या वेळा । मी राहतों तुमच्या जागेला । जंजीर धावा तो मला । पायबेडी माझ्या पायाला । आतां घाला उशिर हो झाला । मानेवर ठेवा तो गोळा । कांटेरी पत्र्यावर मला । आतां उभा राहुवा, सरा । पोशाख तुम्ही हा करा । अन् भुयारानं बाहेर चला । नका आतां उशिर करू बाबा ! लवकर चला !" ॥ चाल ॥ बाळाचं बोलणं ऐकून । खंडोजी गेला करपून ॥ वाघाच्या तोंडीं लोटून । बाळाला जाईल कोण ! ॥ चाल ॥ खंडोजी बोलला बाळाला "माझ्या लेकरा ! ॥ मृत्युच्या तोंडीं देउन जाउ काय तुला ! ॥ लावीन काळोखी बाळा ! पितृधर्माला ! ॥ काय देव स्वर्गांतुन

बाळा ! म्हणतिल मला ! ।। चाल ।। हा काळाकुट्ट जंजीर । सोसवेल तुज कां बाळा ।। हि पायबेडी कांटेरी । सोसवेल तुज कां बाळा ! ।। हा मानेवरचा गोळा । तुज करील वेडा बाळा ।। चाल ।। हा पत्रा बघ कांटेरी । हा बसेल पायाखालीं । पायाची होइल होळी । यमपुरी खास ही बाळा ! ।। सुकुमार तुझ्या देहाला । हाल मुळीं ठाउक नाहीं ।। तारुण्य तुझें रे पुरतें । तें अजून फुललें नाहीं । आईस तुझ्या तूं प्यारा । तुजवीण चैन तिज नाहीं ।। चाल ।। जा झडकरि येथुनि बाळा ! । तूं लहानसा वेल्हाळा ! । हें भुयार भिववी काळा । काळोख किती हा पाही " ।। चाल ।। बापाचं बोलणं ऐकून । बहिरोजी बोलला धीरानं ।। चाल ।। " देहाची परवा काय मला ! । बेडिचा त्रास जरि झाला । तरि देइल देव धीराला । सोन्याची संधी ही मला । आणीबाणीच्या या वेळेला । जा, तुम्ही भेटा राजाला । आणि पुढचा विचार हो करा । सोशीन सारीं संकटं, बाबा हो चला " ।। खंडोजीनं पोशाख केला । अन् झटकन निसटून गेला ! । देहानं बाहेर जरि गेला । तरि मनानं बहिरोजी बाळाजवळ राहिला ! ।। असो ! आतां ऐका गोष्टीला । झपाझपा किल्ल्यावर गेला । ते दिवशीं रात्रीं काय घडलं । तें सारं सांगिन आतां पुढच्या चौकाला ।। ४ ।।





—: ५ :—

**दिवसाची** पाळी संपली । रात्र मग आली । पृथ्वीवर घाली । काळाचं काळकुट्ट पांघरूण । झोपेनं गेली सृष्टि गुंगून । गेली हो मध्यरात्र उलटून ! ।। सामसूम झाली पाहून । रात्रीं उठून । संधी साधून । खंडोजी बुरुजाजवळ गेला । खालीं उतरायचा बेत केला । खालीं शिर्क्यांचा होता पहारा ।। रणवीर मर्द राणोजी । आणि गणूजी । शिर्के रणगाजी । खानाच्या होते मदतीला । तटाखालीं त्यांचा पहारा बसला । सूडाचा जाळ जाळि तनुला ! ।। माणसाची चाहुल ऐकून । गणुजी शिर्क्यानं । वरती पाहून । एक धनुष्याला बाण लावला । सूं सूं करीत वरती गेला । थाडकन् लागला खंडोजीला । पायांतुन बाण घुसुन गेला ! ।। चाल ।। पायाला जखम जी झाली । त्यासरशीं तिरमिरी आली ! ।। हातांतुन सुटली दोरी । आदळला भूवर खालीं ।। चाल ।। राणोजी शिर्के जवळ गेला । आणि जंवा पहातो न्याहाळून त्याला । तंवा खंडोजी त्याला दिसला । राणोजी तंवा बोलला । " कोण ! चिटणीस ! अरे ! अरे ! तुम्हांला बाण मारला ! । पण इतक्या रात्रीं इकडं कुठं आला ? । चिटणीस ! क्षमा करा मला " । खंडोजी बोलूं लागला । " तुमच्याकडंच यायचं होतं मला । खालीं येणार होतों धरुन

दोरीला । इतक्यांत तुम्हींच बाण मारलांत । आणि आणलंत
खालीं हो मला । असो ! तुम्ही शूर मर्द हो झाला । पण
करतां मदत यवनाला । सूडाच्या बुद्धीनं भान तुम्ही विसरला !
।। शिरक्यांचं झालं शिरकाण जसं त्या वेळा ।। तसं मारलं
राजानं व्यर्थ कैक दुसऱ्याला ।। हत्तीच्या पायीं हो दिलं माझ्या
बापाला ! ।। वाघाच्या तोंडीं देण्याचा बेत आम्हांला ! ।। अशा
किती सांगूं गोष्टीला ? । पण तो सूड जर मनांत ठेवला । तर
देशाचा घात जाहला " । राणोजी बोलूं लागला । " चिटणीस !
तुम्ही मारतां लांब लांब गप्पाला । पण स्वार्थ कुठं सोडला ? ।
तुमचीं वतन देतां काय मला ? । मग ऐकूं तुमच्या बोलण्याला ।
बाकी बोललों हें माफ करा " । खंडोजी तंवा बोलला । " वत-
नांची फिकीर काय मला ? । ही घ्या—दाभोळची कुचरीची
वतनं दिलीं तुम्हांला ! ।। आणि काय देऊं तुम्हांला ? " ।
राणोजी शिर्के चमकला ! । अन् खंडोजीला बोलला । " चिट-
णीस, तुमचं बोलणं पटलं आम्हांला । काय काम करावं मी
बोला ? " । खंडोजी तंवा बोलला । " उद्यां रात्रीं जाउद्या
आम्हांला । तुम्ही जरा कानाडोळा करा । अन् मग यावं
आमच्या मदतीला " । " ठीक करूं तुमच्या मनासारखं "
शिर्के बोलला ! ।। ५ ।।





—: ६ :—

दुसरे दिवशीं रात्रिला सर्वांनीं केली तयारी जाण्याची ।
गडाखालीं शिर्क्यांनीं तयारी ठेवली उतरुन घेण्याची ।।

।। चाल ।। मध्यरात्रीचा काळ झाला । लोक सारा बुरुजा-
जवळ गेला । पाळण्यांत राजाराम बसला । हलुहलु पाळणा
खालतीं गेला । जणु विमानाचा भास झाला । शिर्क्यांनीं बंदो-
बस्त केला । रातोरात त्यांनीं पळा मारला । घोडा तय्यार होता
ठेवला । राजाराम घोड्यावरती बसला । वीर सारा घोडेस्वार
झाला । बीजेपर दौड निघुन गेला । विजेचा कडकडाट झाला ।
पाउस मुसळधार आला । लोकसारा भिजुन चिंब झाला । नंद्या
ओढ्यांना पूर आला । चिखलानं रस्ता भरुन गेला । ऐकावं
र दादा ।। इतक्यांत मोठा बदल झाला । ढग सारा पार निघुन
गेला । आकाशीं निळ.रंग आला । खेळ चांदण्यांचा सुरूं झाला ।
ऐकावं र दादा ! ।। चाल ।। ऋष्यमूकगिरिवरुनी कीं ही वानर-
सेना अवतरली । राजाराम महाराज बरोबर, राज्यलक्ष्मी हो
अनुसरली ! ।। गिरिशिखरावर एक होउनी काय सिंह हे अव-
तरले । सिंहासन शिवबांचें घेउनि वाऱ्यासम निघुनी गेले ! ।।
स्वर्गांतुन नररूप घेउनी दैवी गुण हे कीं आले । आकाशांतुन
आले भूवर कीं हे तेजस्वी तारे ! ।। चाल ।। अशा वेळीं

सांगतों तुम्हांला । दोन तीन घटका रात्रिला । धनाजिच्या छावणीमंदि राजाराम पोहोचला ॥ आनंदी आनंद झाला ! । खंडोजी तंवा बोलला, । " महाराज ! तुम्ही जावं आतां सातान्याला । मी जातों परत जिंजीला " । मग राजाराम बोलला, । " कां ! असं कां । कारण समजु द्या मला । सोडून इथं तुम्हांला काय जावं आम्ही सातान्याला ? । ही गोष्ट शक्य नाहीं मला " । खंडोजी बोलूं लागला । " महाराज ! बहिरोजी माझा भुयारांत आहे कोंडला ॥ आतां सोडवीन मी त्याला । मग येइन आपल्या चरणाला " । मग राजाराम बोलला । " चिटणीस ! जीवांत जीव आहे तंवर ही गोष्ट शक्य नाहीं मला । चला सगळे जाऊं जिंजीला । आणी आणूं बहिरोजीबाळा । मग सारे मिळुन आपण जाउं आपल्या देशाला " ॥ जिंजीला जाण्याचा बेत सर्वांनीं केला ! ॥ ६ ॥

—: ७ :—

**फौजेचा** लोंढा परतला । जिंजीवर आला । हल्ला मग केला । झाली यवनांची दाणादाण पार । अचानक छापा आला जोरदार । झाले भयभीत यवन सरदार ! ॥ रक्ताचे पाट वाहवून । मुंडकीं कापून । किल्ला सर करून । मराठा किल्ल्या-





वरतीं गेला । टोंकावर भगवा झेंडा चढला । चढला पर खालीं गळुन आला ! ! ॥ भुयाराच्या जवळ जाउन । कुलपं काढून । दार उघडून । खंडोजी भुयारांत गेला । आशेनं नेलं आंत त्याला । पण निराशेनं रस्ता बंद केला ! ॥ चाल ॥ बहिरोजी-जवळ मग गेला । आणि लावला हात अंगाला । बहिरवनं हात झटकला ! । बहिरोजी बोलूं लागला । " कोण ? कोण माझ्या अंगाला हात लावतय ? । काय बाटवणार तुम्ही मला । ? अरे ! प्राण गेला तरी बेहेत्तर ! पण सोडणार नाहीं धर्माला" । असं बहिरोजी वीर बोलला । अन् झटकन खाली हिरकणी त्यानं ते वेळा ! ! ॥ खंडोजी तंवा बोलला । " बाळ ! खंडोजी रे मी ! तुझा बाप ! । मराठ्यांनीं किल्ला सर केला । अन् सोडवायला आलों आम्ही तुला " । असं म्हणुन घट्ट पोटाशीं धरलं बाळाला ! ॥ बहिरोजी बाळ बोलला । " कोण ! बाबा ! " । सुसकारा लांब टाकला ! । " बाबा ! बाटवणार होते आज मला । मला वाटलं बाटवायलाच कोण आला । म्हणून आत्तांच गिळलं विषाला । आतां हें विष घेऊन जाणार मला । असं सांगा बाबा ! आईला । कीं ' बाळ तुझा मरुन ग गेला ! ॥ चाल ॥ देशासाठीं बाळ बळि दिला । पाणी आणूं नको डोळ्याला ग ॥ मरणाला बाळ नाहीं भ्याला । त्यानं हंसता हंसता जीव दिला ग ॥ फुललेलं जसं कांहीं फूल । तसं होतं

आनंदी मूल ! ॥ बाळ तुझा देवाघरिं गेला । दुनियेंत अमर पण झाला ! ग, ॥ चाल ॥ असं सांगा बाबा ! आईला " । बाळानं डोळा फिरविला । मिठी मारली त्यानं बापाला । किती गचके बसले मानेला । देहाची बेडी तोडून प्राण चालला !॥ बहिरोजी हिरवाचार झाला ! । स्वातंत्र्य रडलं खळखळा । सौंदर्य रडलं ढळढळा । कौमार्य रडलं घळघळा । स्वातंत्र्यदेविचा प्यारा हिरा हरपला !! ॥ ७ ॥

—: ८ :—

**प्रियपुत्राचें** प्रेत पाहुनी शोकानळ भडकला । खंडोजी जळुन खाक जाहला ! ॥ ठिकऱ्या ठिकऱ्या पार जाहल्या हृदयहार करपला ! । डोळ्यांतुन अश्रुलोट चालला ! ॥ शब्दरूप घेउनी मनांतिल दुःखभार उसळला । फोडुनी कंठनाळ चालला ! ॥ खिन्नमुखांतुन शब्द उमटला म्हणे, " बाळ राजसा ! । असा तूं गेलासी रे कसा ! ॥ चाल ॥ लहानाचा मोठा मी केला ! रे बाळा ! ॥ तुज मांडीवर खेळविला ! रे बाळा ! ॥ तुज घांस काढुनी दिला ! रे मी बाळा ! ॥ चाल ॥ मृत्युमुखीं मी तुला लोटिला दुष्ट मीच पाडसा ! । आवरूं दुःखभार हा कसा ? ॥ चंद्राविण ती रात्र जशी की कमळाविण कमळिणी । तशी तव





माता तुज वाचुनी ! ॥ चाल ॥ डोळ्यास तिरमिरी आली । आदळला भूवर खालीं ॥ शुद्धबुद्ध सारी गेली । हृदयाची होळी झाली ! ॥ जगण्याची आशा मेली । प्रेतकळा तनुला आली ॥ चाल ॥ जरा वेळ गेल्यावर आला । खंडोजी वीर शुद्धीला । मग राजाराम बोलला । " खंडोजी ! शोक बहु झाला । सर्वस्व दिलंत देशाला । वडिलांनीं स्वामिभक्तीचा झेंडा लावला ॥ संतु-माई तुमची हो बहिण आली कामाला ! ॥ किती कष्ट तुम्ही भोगले—ठाव हें मला ॥ वणवणा तुम्ही भटकला । अनवाणी पायिं हिंडला । फटक्याचे वण अंगाला । राखेचा तोबरा तोंडाला । अशा किती सांगूं गोष्टीला ? । आज पोटचा गोळा बळि दिला । हा कळस तुम्ही चढविला ! । बहिरोजी नष्ट जरि झाला । तरि कीर्तीचा झेंडा फडकला । त्रिभुवनीं अमर जाहला " । असं राजाराम बोलला । मंत्राग्नि प्रेताला दिला । बहिरोजी गेला स्वर्गाला । पण शूरवीर तरुणांच्या हृदयिं बिंबला ! ॥ चाल ॥ स्वातंत्र्याच्या क्षितिजावरती प्रभु—तारे झळकती । होउनी अमर जगीं राहती ! ॥

नरसप्रभु, मुलगा दादाजी, । मुरारबाजी तो रणगाजी, । बाजीप्रभुही देशकार्जी, । बाळाजी आवजि, खंडोजी, । खंडो-जीसुत तो बहिरोजी, । कैक असे हो झाले फर्जी । ज्यांच्यावर

कीर्तीची मर्जी । कधीं न झाले ते हलगर्जी ॥

प्रभुलोकांनीं कमाल केली । स्वातंत्र्याच्या झेंड्याखालीं । निजरक्ताची नदी बनविली । मुंडक्यांची तटबंदी केली । देहांची कारंजीं उडविली । मासांची बळिदानें दिधलीं । स्वार्थाची खांडोळी केली । देशासाठीं कुडी वाहिली ! ॥ चाल ॥ खंडोजी वीर रणगाजी, । अहो बहिरोजी, । माझी ही अर्जी । मोहुनी तुमच्या प्रतापाला । वर्णाया तुमच्या पोवाड्याला । शाहीर **पांडुरंग** आला । करुनि घ्या गोड कवनमाला ! ॥ ८ ॥

श्रावण व०, ८ १८५५.



# ९

## सिन्धु–ग्रहण

## पोवाडा.

पुण्याचा अंश संपला । नाशकाळ आला । आठव्या शतकाला । पारतंत्र्याचें ग्रहण देशास । लागलं होतं; त्याचा सांगतों इतिहास । बाराशें वर्स झाली आज त्यास ॥ धृ० ॥

—: १ :—

**रणशूर** पराक्रमी धीर । वीर गंभीर । राजा दाहर । सिंधदेशाचा होता भूपाल । लोकहितासाठीं घेइ करभार । भार पर कोणा वाटेना फार ॥ चाल ॥ सागरापरीस गंभीर । आणि स्थिर जसा गिरिवर ! ॥ त्याची राजधानी देबाल । सिंधूच्या काठीं बंदर ॥ चाल ॥ एके दिवशीं वारा भडकला । दर्या खवळला । घो घो गर्जला । लाटावर लाटा भिडल्या गगनास । प्रळयकाळ आला वाटलं सकळांस । घेतो उदरांत काय विश्वास !

॥ सागराला वेसण घालून । त्याच्या अंगावरनं । फिरतो ऐटीनं । असा झाला गर्व फार मनुजास । असे पण क्षुद्र डांसाहुन डांस । जणु दाखवायला सत्य हें त्यास । समुद्रानं धरलं असल्या रूपास ! ॥ कित्येक गलबतें गेलीं पार भंगून । त्यानीं पाहिला ठाव सागराचा खालीं जाऊन । दोन चार लागलीं किनाऱ्याला दैवयोगानं । देबाल बंदराला आली मोठ्या आशेनं ! ॥ चाल ॥ माल होता गलबतांतून गच्च भरलेला ॥ कित्येक अरब व्यापारी होता चालला ॥ चाल ॥ चाचे लोकांनीं हल्ला केला । माल बहुमोल लुटुन नेला । कैद केलं अरब मंडळीला । खबर गेली दूर बगदादाला । खलीफानं लिहिलं दाहराला । "प्रकार असा तुमच्या गांवीं झाला । जबाब द्या काय तो आज मजला । नाहींतर येऊं लढाईला " ॥ ऐकावं र दादा ॥ दाहरानं उलट जबाब लिहला । कीं " चाचे लोकांनीं हल्ला केला । करावं काय आम्हीं त्याला बोला ? " । दाहराचं म्हणणं खलीफाला । पटलं नाहीं, लालेलाल झाला । अन् धाडलं महम्मद कासीमाला । कासीम फौज घेऊन चालला ॥ ऐकावं र दादा ॥ चाल ॥ मोठमोठीं गलबतं आलीं यंत्रें घेऊन ॥ देबालला येऊन थडकलीं मोठ्या वेगानं ॥ जणु काळपुरुषाच्या सुसरी तोंड उघडून ॥ स्वातंत्र्य देशाचं गिळण्या आल्या धांवून ! ॥ चाल ॥ कासीम बसला देबालला वेढा घालून ॥ मग काय प्रकार झाला





आतां पुढं सांगीन ॥ १ ॥

—: २ :—

**जंवा** बसला वेढा गांवाला । मारा सुरू झाला । धडाधडा आला । गोळा, यंत्रांनीं केला भडिमार । अरबांनीं केला हल्ला जोरदार । किल्ल्याचा तट हादरला पार ! ॥ तंवा राजा दाहर शूर । पराक्रमी धीर । मोठा झुंजार । झाला लढाईला वीर तय्यार । कधीं त्यानं नव्हती खाल्ली हो हार । होता तो हिंदभूमिचा हार ! ॥ जसा शोभे सूर्य गगनांत । मगर पाण्यांत । सिंह प्राण्यांत । तसा नगरांत शोभे भूपाळ । सदा कीर्तिनं घातली माळ । मोठा लढवय्या भव्य तेजाळ ! ॥ नगरांतले लोक पण सारे । दुर्बल झाले । षंढपण आलें । बुद्ध-धर्मानं केला हा ऱ्हास । शेळ्यामेंढ्यांचा केला अभ्यास । सिंहाची जात विसरले खास ! ! ॥ चाल ॥ आतां ऐका प्रकार जो झाला । जोराचा हल्ला जंवा झाला । तंवा दाहरानं विचार काय केला । अलाफी अरब दाहराच्या होता नोकरीला ॥ दाहर बोलला तंवा त्याला । " जा तुझी तुकडी घेऊन तोंड देण्याला " ॥ तंवा अलाफीनं जबाब काय दिला । " महाराज ! अरबानं अरबाशीं लढणं पाप हें मला ! ॥ तुम्हीं धाडा दुसऱ्या फौजेला ।

ही गोष्ट शक्य नाहीं मला " । असा जबाब खडखडीत दिला !
। मग राजा बोलला गांवच्या लोकांला । " अरे शत्रूचा हल्ला
हा आला । जर नाहीं प्रतिकार केला ! । तर कंठस्नान सर्वाला ।
हा यवन घालील, लागेल डाग नांवाला ।। ह्मणून चला आतां
रे सगळे युद्ध करण्याला " ।। चाल ।। एक होतं मोठं देऊळ ।
गांवाच्या आंतल्या बाजूला ।। एक निशाण शिखरावर । फड-
कत उंच ते वेळा ।। चाल ।। सारे लोक बोलले राजाला ! ।
" चिंतेचं कारण नाहीं तुला । हा झेंडा जंवर फडकेल उंच
शिखराला । तंवर भगवंत सहाय आह्मांला । अन् लढण्याची
जरूर नाहीं तुला । मंत्रांनीं झेंडा भारलेला । दाद देणार नाहीं
कोणाला " । लोकांचं बोलणं नाहीं पटलं दाहर राजाला ।।
जरी नव्हतं पाठबळ त्याला । तरी लढाईला तय्यार झाला ।।२।।

—: ३ :—

**कासिमनं** मोठ्या धैर्यानं । हल्ला चढवून । गोळा फेंकून ।
पाडलं तें निशाण खालीं धरणीला । देवळाचा कळस कोसळे ।
मातीवर लोळे । भयभीत झाले । लोक ते वेळा ! ।। अरबांची
धडाडी फार । देहाचा पूल । करून रणशूर । खंदकावरनं
निघून ते गेले ! । किती एक घायाळ झाले । पाण्यांत पडले ।





कितीजण मेले ! ।। कोटाला पाडलं खिंडार । अरब बहादर ।
चालले भराभर । दाहरानं धरले सारे आडवून । कितीकांना
त्यानं काढलं कापून । कितीकांना त्यानं काढलं सडकून । आले पण
अरब फार चालून ! ।। चाल ।। तंवा दाहर बोलला लोकाला ।
" भित्र्यानों ! शत्रु आंत आला । कोसळलं निशाण धरणीला ।
शिखराचा चेंदामेंदा झाला । कुठं गेला देव तुमचा बोला ? ।
आतां तरी चला लढाईला " । पर बोलले लोक राजाला ।
" जर आलों आह्मी लढाईला । तर हिंसेचं पाप लागेल आह्मांला ! ।
शिवाय, प्रतिकूल दैव आपणाला ! । जर दैवाचं साहाय्य असतं
आह्माला । तर निशाण कसं पडलं असतं भूमिला ? । दैवानं आणला
हा घाला । परतवील कोण–तुम्ही बोला ? । किती जरी यत्न
आम्हीं केला । तरी जाईल व्यर्थ या वेळा । म्हणुन स्वस्थ बसुन
पाहुया दैवाची लीला " ! ।। चाल ।। ऐकुनी म्याड हे बोल ।
दाहर झाला व्याकूळ ! ।। तो होता शूर रणधीर । पर एकटा
काय करणार ? ।। चाल ।। राजानं विचार असा केला । कीं
जावं आतां दुसऱ्या गांवाला । तिथं जमवून मोठ्या फौजेला ।
हैराण करावं शत्रुला । असा बेत त्यानं हो केला । अन् रात्रीच्या
वेळीं वेढ्यात्नं पार निसटला ! ।। दुसऱ्या दिवशीं अरब वीरानं
गांव सर केला ।। आणि केली कत्तल ते वेळा । जसं लांडग्यानं
खावं शेळीला । तसे सरसकट लहान थोर चिरले त्यानं झरझरा ! ।।

गांवांत हाडकामासाचा चिखल जाहला ! ॥ रक्ताचा ओढा चालला । बौद्धांच्या मठामधिं गेला । तिथं सातशें रूपवान स्त्रिया होत्या सेवेला ॥ सगळ्यांच्या अब्रूवर घाला । ते दिवशीं हाय ! हो आला । आणि त्यांना दासी बनवून घेऊन गेला ! ! ॥ ३ ॥

—: ४ :—

**देबाल** गांव जिंकून । लूट घेऊन । मोठ्या हुरपेनं । कासीम चालला दुसऱ्या गांवाला । नेरून आणि शिबिस्थान । तसं बुधिया गांव जिंकून । वत्सराज ठार करून । आला परतून नेरून गांवा ॥ चाल ॥ नेरून गांव सिंधूच्या एका तीराला ॥ दाहर होता तय्यार दुसऱ्या तीराला ॥ दाहराशीं सामना देण्याला । कासीमला जायचं होतं, पण पाण्यानं दुथडी भरलेला ! । वलांडायचं कसं हो त्याला । ही चिंता पडली कासमाला । सुचेना मार्ग मुळिं त्याला । फौजेंत रोग सुरुं झाला । पटापटा माणसं आणि घोडीं मरतीं ते वेळा ॥ दाणागोटा संपूं लागला । कासीमचा उपाय सारा थकला ! ॥ कासीम भांबावून गेला । पण दैवाचं साहाय्य होतं त्याला । तें कसं सांगतों तुम्हांला ॥ चाल ॥ सिंधूच्या भव्य पात्रांत । एक होतं सुंदर बेट ॥ त्याचा मुख्य मोका बसय्या । मनानं होता हलकट ॥ जातीचा होता





ब्राह्मण । पर कर्म त्याचं कळकट ! ॥ तो झाला फितुर शत्रूला । कासीमचं दैव बळकट ॥ चाल ॥ बसय्या बोलला कासमाला । "हें बेट ठेवाल जर मला । तर मी करतों मदत तुम्हांला । दाणागोटा देतो फौजेला । दोघे मिळून मारुं दाहराला" । फितुरीनं किती राष्ट्रांचा बळी घेतला ! ॥ प्लेग पटकी इन्फ्लुएन्झानं कितिक बळि नेला ! ॥ पण फितुरीचा रोग करि ठार साऱ्या देशाला ! ॥ असो ! आतां ऐका गोष्टीला ॥ चाल ॥ होडक्यांचा पूल बनवून । दिला बसय्यानं । अरब गेले वरनं । झाले लढाईला फिरून तय्यार । सांगीन पुढचा सारा प्रकार । पांचव्या चौकाला घालून भार ॥ ४ ॥

—: ५ :—

**माऱ्याची** जागा रोखून । नदी उतरून । फौज घेऊन । दाहर राजा होता तय्यार । फौज कासिमची होती अनिवार । एकमेकांला भिडली तलवार ! ॥ मदमस्त हत्ती घेऊन । हौदा चढवून । गच्च बांधून । दाहर त्यांत होता बसला । जणु इंद्राचा भास झाला । सोक्षमोक्षाचा विचार केला ! ॥ सरसरा बाणावर बाण । सुटती चहुकडून । झाले हैराण । कैक रणवीर आले धरणीला । रणरंग थाटला फार । चमके तलवार । डोक्यावर

वार करती ते वेळा ॥ चाल ॥ राजानं घोर संग्राम मोठा मांडला ॥ कितीकांची पटापट पाडलीं मुंडकीं धरणीला ॥ कितिकांचीं धडं थयथया नाचती ते वेळा ॥ कितिकांचा डोळा भंगला । कितिकांचा हात छाटला । राजानं कहर उडवला । जंवा राजा सोडी चक्राला । तंवा कृष्णाचा भास जाहला ! । चक्रानं किती फौजेचा धुव्वा उडविला ! ! ॥ शत्रूचं रान जाळण्याला । राजा हा वणवा लागला । पर यश नव्हतं ठेवलं वांट्याला ! । कासिमनं एक नफ्थ्याचा बाण टाकला ॥ त्या सरशी प्रकार काय झाला । ज्यांत राजा होता बसलेला । त्या हौद्यानं पेट घेतला ! । धडधडा जाळ भडकला ! । जंवा लागलं अंग भाजायला । तंवा सैरावैरा हत्ती धांवला ! । जवळच होता पाण्याचा तलाव; । त्यामधीं उडी टाकली त्यानं त्या वेळा ! ॥ राजानं विचार जरा केला । अन् हौद्यात्नं उडी टाकली त्यानं त्या वेळा । अन् कांठाला पोहून गेला! । पण तिथं होता अरब आलेला । त्यानीं घेरलं एकट्या राजाला । आणि कापलं त्याच्या मुंडक्याला । अन् बगदादला धाडलं मुंडक्याला । वीरानं मरणपद आलं वीर राजाला ! ॥ कासीमनं विजय मिळवला । अन् चालला राउर गांवाला । ततं बाईनं जोहार कसा केला ॥ तें आतां सारं सांगीन पुढच्या चौकाला ॥ ९ ॥





—: ६ :—

**नवऱ्याच्या** मरणाची वार्ता घोर ऐकून । दाहराची राणी हो बाई गेली करपून । हृदयाच्या झाल्या चिंधाड्या गेलं वाळून । डोळ्यात्नं पाणी घळघळा । वाही खळखळा । आंवरिल कोण ? ॥ क्षण एक बसली दांतखिळी घट्ट आंवळून । आली घेरी बाईला पडली डोळे फिरवून । जसं झाड बठल्यावर जाइ वेल वाळून । पतिशोक आर्य महिलेला मोठा दारुण ! ॥ पर राणी होती बहुशूर विवेकी धीर । आंवरून शोक लढाईला झाली तय्यार । तिनं बंद केलं राउरच्या किल्ल्याचं दार । कासीम आला पाहून । जल्दी करून । घेतली तलवार ! ॥ चाल ॥ कासीमनं राउर गांवाला वेढा घातला ॥ पुन्हां भडिमार यंत्रांचा मोठा मारा चालला ॥ आठ दिवस सारखा रक्ताचा पाट वाहला ॥ बाईनं मोठ्या शर्थीनं किल्ला लढवला ॥ पण फितुरीनं किल्ल्याला मोठा भोंकसा पाडला ! ॥ जंवा राणिचा उपाय सारा थकला । तंवा राणिनं बेत काय केला । गांवांतल्या साऱ्या बायकांना । तिनं बोलवलं आपल्या वाड्याच्या आंतल्या बाजूला ॥ आणि राणी बोलली सर्वाला । "बायानों ! एक सवाल घालतें तुम्हांला । यवनांच्या हातीं लागून भ्रष्ट होणार । का मी करतें तसं करणार ? । बायानों ! आर्य धर्माला । तुम्ही साऱ्या भूषण झाला ।

तुम्ही साऱ्या सिंहीणी झाला। झोंबतील कुत्रीं अंगाला!। माझ्या पावलावर पाऊल ठेवायला। जितक्या आहेत तय्यार। तितक्या जणींनींच इथं राहावं। अन् बाकीच्यानीं निघून जावं। अन् द्यावा देह परक्याला"। राणी सांगेल तस्सं करण्याला। सगळ्यानीं होकार जंवा दिला। तंवा राणिनं घेतलं अग्निला। अन् वाडा सारा पेटवला। जाळ भिडला जाऊन गगनाला। आंत बायकांचा देह खाक झाला। **पांच हजार** बायकांनीं तंवा जोहार केला!।। हा **पहिला** जोहार झाला। असं इतिहास सांगतो आपणाला। धन्य! धन्य! धन्य! बाईचा जन्म जाहला!।।६।।

—: ७ :—

**गांव** राउर असं सर करून। पुरुष ठार करून। लूट मारून। कासीम ब्राह्मणाबादला गेला। तिथं जयसिंग आडवी त्याला। बापाचा सूड उगवण्याला।। चाल।। दहा हजार फौज मदतीला। पर होती सारी नांवाला।।दहा हजार होते पंक्तीला। पर नव्हत कोणी लढण्याला।। तरी त्यानं निश्चय केला। कासी-मशीं झुंज करण्याला।। चाल।। कोटाच्या वरती विश्वासू फौज ठेवून। ठाइ ठाइ माऱ्याच्या जागा धरल्या रोखून। आठ दिवस केलं शत्रुला त्यानं हैराण। शत्रूचा सुटला धीर सारा गेला





घाबरून।।। चाल।। शत्रूचा धुव्वा उडवला। पर फितुरीनं फांसा उलटवला!। कासीमच्या मदतीला मोका बसय्या आला।। जसे राहूकेतू ग्रासायला चंद्रसूर्याला!!।। त्यानं दिली माहिती किल्ल्याची सर्व कासीमाला।। तंवा निकराचा हल्ला त्यानं केला। अन् शिड्या लांवल्या कोटाला। अन् झपझपा वरती चालला। जयसिंगानं जंवा पाहिलं कीं आतां कांहीं उपाय चालत नाहीं। तंवा जयसिंग कोटावर गेला। अन् शिड्या खालती लोटल्या धडधडा!। पर दैवाचं नव्हतं बळ त्याला!। एक बाण सट् करून आला। अन् छातित्नं घुसुन पार गेला!। जयसिंग खालीं कोसळला। मग गांव खुलं झालं शत्रुला। मग सारा पुरुष चिरुन काढला!। साऱ्या बायका घेऊन कासीम चालू लागला!!।। त्यांत दाहरच्या दोन मुली लागल्या त्याच्या हाताला।। त्यानं पाठवलं त्यांना बगदादाला। खलिफानं त्यांच्या बरोबर निका लावला!।। ७।।

—: ८ :—

**असे** विजय कैक मिळवून चालला कासीम। जातां जातां लागलं वाटेंत गांव मुलतान। आलं गांव शरण, लढाईचं नुरलं कारण! लुटालूट केली गांवाची पार झाडून!।। सूर्याचें देऊळ

गांवांत होतें एक छान । त्यानं पाहिली सोन्याची मूर्ति आंत जाऊन । सांपडलं त्याला पंधराशें पन्नास मण सोनं । कासीमचं मन हर्षानं झालं बेभान ! ॥ पुढं चालला कनोज नगराला । हल्ला करण्याला । लूट करण्याला । कनोजचा राजा आडवी त्याला । पुन्हां लढाईच्या प्रसंगाला । कासीम तय्यार हो झाला ॥ चाल ॥ गांवाला वेढा घालायचा बेत त्यानं केला ॥ इतक्यांत प्रकार काय झाला । लखोटा एक कासीमला । बगदाद गांवाहून आला । त्यांत लिहिलं होतं कीं, “ कासीम ! असशील तस्सा कच्च्या कातड्याच्या पेटींत बसून ये ” ॥ चाल ॥ खलिफाचा हुकूम वाचून । कासीम झाला बहु खिन्न ! ॥ मग बोलला आपल्या लोकाला । “ कातड्याच्या पेटीमधीं मला । आंत घालून पेटी बंद करा । आणि पाठवा बगदादाला । खलिफाचा हुकूम असा आला ! ” । पेटारा तय्यार केला । कासीम पेटाऱ्यांत बसला । मग नोकरांनीं सीलबंद केला । अन् बगदादला चालला पेटारा। पण आंत कासीम गुदमरून मेला ! । पेटारा गेला बगदादला । पुढें काय प्रकार झाला । तो सांगीन पुढच्या चौकाला ॥ ८ ॥





—: ९ :—

**बगदादला** पेटारा नेला । कळलं गांवाला । प्रकार घडलेला । लोकांना गूढ पडलं ते वेळा । ‘खलिफानं हुकुम कसा दिला,’ । असं लोक म्हणती जागोजागेला । पेटारा वाड्यांमधिं नेला। कळलं खलिफाला । बाहेर आला ! ॥ शिपाई बोलले खलिफाला । “ आणला पेटारा । आपल्या चरणाला । हुकमाचे बंदे आम्ही सरकार । कच्च्या कातडाचा केला तय्यार । हुकुम काय पुढचा सांगा सरकार ! ” ॥ खलीफ बोलला शिपायांला । “ अरे, किसका हुकूम, कब दिया ? किसका पेटारा ? । इसमे कुछ है ? ” । शिपायांचा नाईक बोलला । “ गरीब परवर ! आपणच हुकूम दिला कासीमाला । कीं, ‘ कच्च्या कातड्याच्या पेटींत बसून असशील तस्सा निघून ये म्हणून ’ । कासीमानं केला पेटारा । आणि आंत बसला ते वेळा । मग आम्हीं आणला आपल्या चरणाला ” । असं ह्मणून शिपायानं दिला । हुकुमाचा कागद खलिफाला । पण खलीफ हुकुम पाहून गोंधळून गेला ! ॥ पेटारा जंवा त्यानं फोडला । तंवा कासीमचं प्रेत खलिफाच्या आलं नजरेला ॥ खलिफाच्या सहीसारखी सही ! । खलिफानं नव्हता हुकुम दिला । रागानें जळूं लागला । नागानं फूत्कार केला । पण कुणीं दिला हुकुम मग बोला ? । समजेना कांहीं

कोणाला ! । असा जेव्हां गोंधळ झाला । तंवा दाहरच्या मुली पुढें झाल्या । अन् बोलल्या । "हुकुम आह्मी दिला ॥ चाल ॥ ज्यानं मारलं आमच्या बापाला । ज्यानं चिरलं कैक लोकाला ॥ ज्यानं केलं भ्रष्ट बायकांला । ज्यानं घेतलं आमच्या अब्रूला ॥ ज्यानं देश हैराण केला । त्या नीचाचा सूड घेण्याला ॥ आह्मी असा प्रकार हा केला । मनासारखं झालं या वेळा ॥ आतां आमचं पाहिजेल तें करा" ॥ असे जळते बोल ऐकून खलीफ लाल झाला ! ॥ लगेच त्यानं हुकुम सोडला । कीं, "बांधारे यांना घोड्यांच्या शेपटीला । अन् फरफटत फरफटत मारा" । बांधलं त्यांना त्यावेळीं घोड्यांच्या शेंपटीला ॥ मग घोडा दौड पळवला । फरफटत त्यांचा देह गेला ! । रक्ताचा पाट वाहला । मासाचा गोळा लोंबला । डोक्यांच्या झाल्या चिंधाड्या हाय ! ते वेळा ! ॥ दोघींचा प्राण मग गेला ! । त्यांचा जन्म सार्थ हो झाला । दाहरानं देशकार्याला । घराण्याचा सारा बळी दिला । **पांडुरंग** शाहीर गातो त्याच्या कवनाला ॥ ९ ॥



# १०

## धाडशी शिवाजी

अर्थात्

## शाहिस्ताखानाचा पराभव.

## पोवाडा.

नाश कराया शिवरायाचा आला शाहिस्ताखान ॥ छाटुन बोटें दूर पळविला; । धन्य शिवाजी भूरमण ! ॥ ध्रु० ॥

—: १ :—

**केला** धुमाकुळ शिवरायानं संकट मोंगलराज्याला । स्वातंत्र्याच्या मुळ्या भेदिती अभेद्य मोंगल-भिंतीला ! ॥ चिरे

घडाधड पडूं लागले, बुरुज कोसळे धरणीला ! । शिवशक्तिच्या तोफेमधुनी सुटला भीषणसा गोळा ! ।। शिवतेजाची वीज देतसे झटके औरंगजेबाला ! । कांहीं सुचेना, अन्न रुचेना, झोंपहि ये ना नयनाला ! ।। भगवा झेंडा फडफड फडके भूषण वाऱ्याला झाला । फडफड करुनी गगनी बोले, 'धन्य शिवाजी अवतरला !'।। दऱ्याखोऱ्यांतुन मैदानांतुन पाउल टाकी शिव जेव्हां । विजय-श्रीचीं फुलें उमलतीं त्या त्या स्थानीं मग तेव्हां ।। फिरंग फिरवी शिवबा इकडे, तिकडे मोंगल गडबडला ! । टाप घोडिची ऐकुनि तिकडे शाहा कासाविस झाला ! ! ।। दर्प असा हा शिवशक्तीचा सहन होइना दिल्लीला । रात्रंदिन नच झोंप कुणाला, काय करावें शिवबाला ! ।। विचार ठरला, दूत निघाला आला दख्खन देशाला । बादशाहाचं पत्र दिलं मग त्यानं शाहिस्ता-खानाला ! ।। "चला, मरा, तुम्हि कांहिं करा, पण धराच या शिवचोराला । सरा न मागे, धरा न जावें, चराचरा शिवचोर चिरा !" ।। बादशाहाचं पत्र असं हें वाचुन शास्ताखान जरा । मनीं चरकला, विषण्ण झाला, क्षणिं कोमेजुन ही गेला ! ।। शुभ्र लोंबत्या दाढीवरचा रंग लगोलग पालटला ! । हात मस्तका-वरती ठेवुन करि तो घोर विचाराला ।। "काम असें हें अवघड मोठें शिवा न सोपा धरण्याला । पिशाच्च चेटुक अनुकुल त्याला कसें धरूं सैतानाला ! !" ।। स्वारीचा पण निश्चय केला





शूर शिपाई जमवीला । फौज घेउनी खान चालला शिवरायाला धरण्याला ।। जातां जातां बेत ठरवला चाकण किल्ला घेण्याला । वेढा दिधला मग खानानं सत्वर, चाकणकिल्ल्याला ।। प्रकार पुढचा काय जाहला सांगिन पुढच्या चौकाला । धन्य शिवाजी रसिकजनानों ! ऐका श्रीशिवकीर्तीला ।। १ ।।

—:२:—

**नरसाळा** फिरंगोजी वर । होता किल्लेदार । मोठा बाणेदार । झाला तय्यार संग्रामाला । केलं घनघोर लढाईला । अस्मानांत धुरळा सारा भरला ! ।। आटोकाट झगडा त्यानं केला । किल्ला लढविला । उपाय पर थकला । खानानं केलं कैद त्याला । किल्ला खानाच्या हातीं गेला । नरसाळा धन्य धन्य झाला ! ।। चाल ।। शाहिस्ताखान मग त्याला । काय बोलला सांगतों तुम्हांला । "ऱ्हा आतां आमच्या चाकरीला । चढवीन मोठ्या हुद्याला । शिवा काय देणार तुला ? । शिवाजीचा नाश करण्याला खान हा आला ।। शिवाजीचा नाश खास झाला । असं समज आज या वेळा ।। कोल्ह्यांनं सिंहाशीं झगडा कधीं काय केला ? ।। शिवा चोर बंडखोर झाला । चल माझ्यासंगं या वेळा । पकडुया बंडखोराला " ! ! । असं बोलला खान हो

त्याला। फिरंगोजी लालेलाल झाला !। फिरंगोजी बोलला खानाला ।। चाल ।। "शिवाजीचा बंदा नोकर। नरसाळा अस्सा राहणार ! ।। शिवाजीच्या पायावर शीर । ठेविन मी, तोच मज प्यार ।। शिवराय माझा रे मोर । शिवराय चंद्राची कोर ।। चाल ।। बडबडसी व्यर्थ या वेळा । जंवा पाहशी खाना ! तूं त्याला । तंवा दरदरेल घाम अंगाला । दांतखिळी बसेल तोंडाला । शिवराय सिंह रे झाला । लोळवले कैक भूमिला । करु नको त्याच्या निंदेला । जारूं नको त्याच्या वाटेला । माझ्यासारखे कैक रे वीर त्याच्या पदरीला ।। परतून जा जा माघारा । अन् सांग बादशाहाला । कीं शिवाजीला कैद करण्याला । गेलें होतों—आलों माघारा ! । जो करील कैद शिवाजीला । असा एवढा साऱ्या दुनियेंत कोण हि न झाला !।" ।। चाल ।। ऐकुनी बोल वीराचे । खान मनीं गारेगार झाला ! ।। पाहून स्वामिभक्तीला । खानाला संतोष झाला ! ।। खानानं सोडलं मग त्याला । अन् त्याचा मोठा गौरव केला ।। चाल ।। शिवरायाकडं पाठबलं त्यानं मग त्याला ।। चाल ।। चाकणचा किल्ला घेऊन । चालला जल्दीनं । मोठ्या ऐटीनं । पुण्यामंदि थेट खान आला । शिवाजिचा वाडा त्यानं घेतला । ऐका प्रकार काय झाला ।। २ ।।





—: ३ :—

**शिवाजिच्या** महालामधिं खान । राहिला येऊन । बंदोबस्तानं । जागजागीं ठेवलं शिपायाला । हुकुम मनाईचा हत्याराला । वेशीवर पहारा रोज बसला ! ।। खानाच्या परवान्याबीण । फिरकेना कोण । पाखरुं हि लहान । एवढा त्यानं बंदोबस्त केला । धाक शिवाजीचा वाटे त्याला । रात्रींही झोंप न डोळ्याला ! ।। सिंहाच्या गुहेमधिं जसा । ससा कसाबसा । शिरावा तसा । शिरला पुण्यामंदि खान ते वेळा । मगराच्या दाढेला हात । हात लावला त्यानं निभ्रांत । निभ्रांत जाहला भ्रांत । झाला काय वात । कळेना मजला ! ।। शिवराय होता सिंहगडीं । घेउन संवगडी । विचार घडोघडी । घडविती किल्यावरती ते वेळा ।। शाहिस्ता आला चालून । पुण्यामंदि राहिला येऊन । काढावा कसा हुसकून । विचार जोरानं असला हा झाला ।। पाठवला एक ब्राह्मण । शिवरायानं । पुण्यामंदि त्यानं । जाऊन वश केलं एका मराठ्याला ।। एक खोटचा लग्नाचा घाट । घाट घातला बीनबोभाट । वरातीचा रात्रीला थाट । केला ऐटींत । लोक किति जमला ! ।। चाल ।। घाट कात्रजचा जवळ झाला । तीन कोसाच्या अंतराला । शक्कल सुचली शिवाजीला । खानाची फौज चकविण्याला । पोत बांधवले हो झुडपाला ! । कात्रज

घाटांत ते वेळा । पोत बैलांच्या हो शिंगाला ! । बांधले खानाला ठकविण्याला । झुडपं झालीं साहाय्य शिवाजीला । पशुपक्षी झाले साहाय्य त्याला । दुसरा जणु रामचंद्र आला ! । नंदी झाले साहाय्य शंकराला ! । गाऊं किती त्याच्या पोवाड्याला ? । इकडं असा त्यानं बेत केला । अन् एका बोलावलं मावळ्याला । गवताचा भारा दिला त्याला । भाऱ्यामंदि घातलं तलवारीला ! । मावळा पुण्यामंदि घेउन गेला । तंवा शिवाजिनं । दहावीस जण । मावळे घेऊन । वेष पालटून । सोडला गड, पुण्यामंदि आला । काळोख काळा कुट्ट भरला । वरात आली होती गणपतीला । गर्दिमंदि शिवराय हो शिरला । ऐकावं र दादा ॥३॥

—: ४ :—

**लाल** महालामधीं येऊन राहिला जरि खान । तरि हालचाल होइना शत्रुपासून । खानाला वाटलं शिवराय गेला घाबरून । बंदोबस्त मोठा पाहून । खानाचं मन । होतं प्रसन्न ॥ चहुकडं सामसूम झाली । माणसं झोंपली । गाढ झोंप आली । खानाला, नव्हतं त्याला देहभान । भररात्रीं खिडकी उघडून । शिवराय आणि चार जण । गेले घुसून ! ॥ खानाचा मुलगा ठार केला । झाला गलबला । खान जागा झाला । पाहतो तों





दिसला काय प्रकार । शिवाजी झाला छातीवर स्वार । तय्यार झाला कराया वार ॥ बायकांनीं दुःखी होऊन । अति गहिंवरुन । हात जोडून । विनवणी केली शिवाजीला । "आमच्या कडं बघुन या वेळेला । जीवदान द्यावं—थोर झाला !" ॥ चाल ॥ शिवराय बोलला खानाला, । "बायकांनीं आक्रोश केला । ह्मणुन देतों जीवदान तुला । पण ऐक माझ्या बोलाला । इथं राहणं योग्य नाहीं तुला । शिवाजीचा मुलख हा झाला । तो घेईल तुझ्या जीवाला । जीवदान देतों आज तुला । जर ऐकशील एका गोष्टीला । माझ्या संगं गोटाबाहेर चला; । आलं पाहिजे तुह्मां सर्वाला" । खानसाहेब घाबरुन गेला ! । हा कोण अदमी घरीं आला । समजेना कांहीं हें त्याला । खानसाहेब चालले शिवाजीच्या संग ते वेळा ! ! ॥ गोटाच्या बाहेर जंवा गेला । तंवा बोलला राजा खानाला ॥ चाल ॥ "धाक ज्याचा बादशाहीला । शिवाजी तोच हा झाला ! ॥ जाऊं नको याच्या वाटेला । वाघनखं लाविलं पोटाला ॥ पण आठवण रहावी रे तुजला । ह्मणून छाटतों तुझ्या बोटाला ! ॥ आजपासून ऐक बोलाला । ह्मण 'शास्ताखान' आपणांला" ॥ असं म्हणून बोट छांटून शिवबा पार झाला ! ! ॥ मग खान गेला माघारा । लाज मोठी वाटली त्याला । तय्यार केलं फौजेला । अन् पाठविली पाठलागाला ॥ इकडं शिवाजीनं काय बेत केला ।

धोक्याचा करणा फुंकला । कात्रजच्या घाटांतिल पोत पेटले ते वेळा ! ।। शिवाजी गेला त्या स्थळा । असं वाटलं यवनी फौजेला । अन् कात्रजच्या घाटाकडं गेली पाठलागाला ! ! ।। ततं जाऊन पाहाती त्या वेळा । अन् परतले सारे माघारा ! ! ।। पर इकडं सिंहगडावरीं शिवा पार झाला ।। चाल ।। गेला खान फार घाबरुन । पुणं सोडून । तळ हालवून । भवानी साहाय्य शिवाजीला । यश राजाचं वर्णायाला । शाहीर **पांडुरंग** झाला ।।४।।

गोकुळाष्टमी, श. १८५३.



# ११

## ठकास महाठक !

अर्थात्

## आग्र्याहून दख्खन !



महाठक ठका भेटला । अजब युक्तीला । योजून पार झाला । शेराला सव्वाशेर शिवराय । दिल्लिपति सदा करित हाय ! हाय ! ! । पोवाडा **पांडुरंग** कवि गाय ।। ध्रु० ।।

—: १ :—

**जंवा** पुरंदरचा तह झाला । शाहा खुष झाला । जयसिंगाला । शिवाजीनं मदत केली हो फार । अदिलशाही त्यानं केली बेजार । शौर्याची शर्थ केली अनिवार ।। शाहानं लिहिलं शिवाजीला, । " तुमच्या शौर्याला । तुमच्या कीर्तीला । तोड नसे, फिदा झालों मी फार । यावं भेटिला, करिन दरबार । करिन बहुमान तुमचा मी फार ! ।। मनिं शंका मुळीं नच

धरा । माझ्या या घरा । विचार ठाम करा । येण्याचा, तोष होइल चित्तास । एकमेकांचा जडेल विश्वास । एकदां आम्हां-कडं यावं तुम्ही खास " ।। विश्वासु मित्र जमविले । किल्ल्यावर भले । राजा मग बोले । " गड्यानों ! शहा बोलवी आम्हांस । सल्ला काय तुमचा असल्या समयास । धरावा कसा त्याचा विश्वास ? ।। तरी जावं वाटतयं मला । भेट देण्याला । हिंदु-राज्याला । चार शाह्या झोंबती आजच्या समयास । कांहीं काळ वश करणं एकास । खास जरुरीचं वाटतं आम्हांस " ।। सर्वांनीं विचार जरा केला । अभिप्राय दिला । अनुकुल त्याला । राजा मग बोलला फिरुन सर्वांस । " शाहाचा मुळीं नसे विश्वास । केव्हां दगा होईल कळे ना कोणास " ! ।। चाल ।। म्हणुन मोरोपंत पेशवे पंडित; । अण्णाजी दत्तो सुरनीस; । निळो सोन-देव मदतीस । तीघांच्या हातीं सोंपविली सत्ता ते वेळा ।। किल्ल्यांची पाहणी शिवराय करून हो आला ।। राज्याचा बंदो-बस्त केला । अन् कोण कोण घेतले मदतीला । दादानों ! सांगतों तुम्हांला ।। चाल ।। निराजी आवजी न्यायाधीश । बाळाजी आवजी चिटणीस ।। त्रिंबक सोनदेव डबीर । आणि प्रतापराव गुजर ।। जीवनराव माणकोजी खास । नरहरपंत सबनीस ।। राघो मित्र घेतले मदतीस । दत्ताजी त्रिंबक हि खास ।। हिरोजी फर्जंद बोरास । राजानं घेतलं मदतीस ।।





कित्येक असले सरदार घेतले मदतीला ।। संभाजी राजपुत्राला । त्येनं संगं घेतलं ते वेळा । पांच हजार घेतलं फौजेला । भवा-नीच्या केलं स्मरणाला । आठवलं रामदासाला । जिजाईला भेटून आला । आणि राजा चालला आग्र्याला । दोन महिने लागले जाण्याला । शिवाजिला खास राहण्याला । **शिवपुरा** तयार होता केला । ततं राजा जाऊन उतरला । **रामसिंह** दिला दिमतीला । असा राजा थाटामाटानं गेला आग्र्याला ।। ।। चाल ।। पुढं काय प्रकार झाला । पुढच्या चौकाला । सांगिन तुम्हांला । कथानक गोड मोठं छानदार । शिवाजी सांबाचाच अवतार । असा कधीं हिरा पुन्हां होणार ! ! ।। १ ।।

—: २ :—

**दरबार** शाहानं भरविला । दुसऱ्या दिवसाला । थाट लई केला । वाटे जणु ' मयसभा ' ही छान । कराया शिवा-जीचा अपमान । बादशाहा झाला होता बेभान ! ।। तंवा जमले सारे सरदार । मोठे सुभेदार । शाहीचे नोकर । जमले पाह-ण्याला शिवाजीला । दरबारीं जो तो खडा झाला । माना-प्रमाणंच ते वेळा ।। पच्चिस हात मारतोय उडी । शिवाजी गडी । वाघाला फाडी । असला हा वीर कसला झाला ! । पाहा कं-

एकदां तरी त्याला । जो तो करि असल्या विचाराला ! ॥ शिवाजीनं पोशाख छान केला । तलवार कमरेला । चालला दरबाराला । ज्याचा त्याचा डोळा खिळुन गेला । वाटे जणु मदनाचाच पुतळा । अमीर उमराव थक्क झाला ! ! ॥ चाल ॥ शिवाजीनं लवुन शाहाला मुजरा तंवा केला ॥ पंधराशें होनांचा वरती नजराणा दिला ॥ सहा हजार मोहरा देऊन बहुमान केला ॥ असा बहाणा राजनिष्ठेचा ठाकठीक केला ! ॥ असा विधि झाल्यावर शहा बोलला शिवबाला ॥ "राजनिष्ठा तुमची पाहुन शाहा खुष झाला ! ॥ जसवंतसिंगराजाच्या खालच्या बाजूला ॥ जा, उभे रहा, तो मान तुम्हांला दिला !" ॥ असं बोलला शहा शिवबाला । शिवाजीचा अपमान झाला ! । क्रोधाग्नि आंत भडकला ! । जसा सूर्य बारा डोळयानं, तसा चमकला ! ॥ जसा वणवा रानाला, तसा राजा भडकला ! ॥ जसा जलधी खवळावा, तसा राजा खवळला ! ॥ तंवा शिवबा बोलूं लागला । "अपमान माझा करण्याला । काय इथं आणलं तुम्ही मला ? । जो करार जयसिंगराजानं माझ्याशीं केला ॥ तो आज तुम्ही मोडला ! । बस्स ! पुरे ! जातों माघारा" । असं बोलला राजा ते वेळा ! । सरदार सुभेदार जिरले जागच्या जागेला ! ॥ जणु महारुद्र खवळला । शाहानं दरबारच जल्दी बरखास्त केला ! ! ॥ २ ॥





—: ३ :—

**शिवाजीचा** बाणा पाहून । दरबारी खान । गेले हादरून । शाहाही झाला थक्क ते वेळा ! । सर्वांची मति कुंठित । धाक पोटांत । एक चित्तांत । शिवाजी हो दिसला ! ॥ तंवा शहा विचारमूढ झाला । सुचेना कांहीं त्याला । सल्ला देण्याला । आली तंवा त्याची मामी जोरानं । नवऱ्याचीं बोटं कापलीं । म्हणुन भडकली । बोलाया आली । मामी आणि सून ! ॥ चाल ॥ "अवरंग ! ऐक सल्ल्याला ॥ शिव्या आयता हातीं गवसला । कैद कर त्याला । कांटा हा झाला । उपटून काढला पाहिजे या वेळा । ही संधी आली चालून । जर म्हणसी आतां तूं न न । शिरजोर पुढं होऊन । सूडाची ज्योत घऊन । करिल हैराण । पादशाहीला !" ॥ मामीचा सल्ला हा पटला बादशाहाला ॥ शाहानं कैद केलं त्याला । शिवपुत्र्यामधींच शिवाला । कोंडून ठेवलं ते वेळा । पिंजऱ्यांत कोंडलं सिंहाला । कडेकोट पहारा वाड्याला । पोलादखान मुख्य नेमला । पांचहजार शिपाई मदतीला । जो राजा भेटिला आला । शाहानं कैद केलं त्याला ! । विश्वासघात करुनि हो शिवा पकडला ! ! ॥ अवरंगखेबाला स्वर्ग दोन बोट उरला ॥ शिवाजीला पूर्वी धरण्याला । बडाबडा खान पाठवला । पण ज्यानं

थांग नाहिं दिला । तो आज कपटजाळयांत सिंह सांपडला ! ॥ चाल ॥ दख्खनचा सिंह कैद झाला । आपदा हिंदुराज्याला ॥ बीं नुकतं रुजलं भूमीला । पर मुंगा लागला त्याला ! ॥ स्वातंत्रसूर्य उदयाला । पर केतु ग्रस्त करि त्याला ! ॥ या दुष्ट बातमीचा गोळा । दख्खनला जाळत आला ! ॥ जणु आला वज्राचा घाला ! । काळ मोठा दारुण आला ॥ चाल ॥ काय युक्ति शिवबा योजील । कसा निसटेल । सांगे शाहीर । दादानों ! गोष्ट घ्यावी चित्तांत । शिवाजीनं केली शाहावर मात । कशी ती ऐका पुढच्या चौकांत ॥ ३ ॥

—: ४ :—

**जगदंबा** गेली सपाला । बोलली शिवबाला । " भीऊं नको बाळा ! । निरशीन तुझ्या संकटाला " । शिवाजीला तोष फार झाला । उपाय एक सुचला खासा त्याला ॥ आजाऱ्याचा बहाणा त्यानं केला । अंथरुणाला खिळला । निरोप शाहाला । धाडला त्यानं एक त्याच वेळेला ॥ " लोक माझा हैराण झाला । हवापाणी मानवेना त्याला । जाण्याला दख्खन देशाला । आतुर फार झाला । निरोप द्या त्याला ॥ चाल ॥ ताप रोज येतो हो मला । नाइलाज माझा





पण झाला । हा आपला बंदिवान झाला । म्हणुन जाणं शक्य नाहिं मला । द्या रजा माझ्या लोकाला । विनवणी एवढी तुम्हांला " ॥ चाल ॥ शाहानं विचार मनिं केला । ' देऊं । निरोपाला । साऱ्या फौजेला । शिवाजिच्या, जाऊंद्या दख्खन देशाला । मग शिवा एकटा राहील । भय त्याचं कमी होईल । मग तोच झुरून जाईल । मरण पाहील । खास आग्र्याला " ॥ लोक सारा पाठवुन दिला । दख्खनदेशाला; । थोडा पण ठेवला । ठायीं ठायीं गावामध्यं ते वेळा ॥ ते आपला वेष पालटून । गावात्नं राहिले जाऊन । शिवाजीला जाती भेटून । नित्य येऊन, । रोजचा नेम झाला ॥ बरं वाटतं आतां जीवाला । म्हणून मिठाई हो । वाटतो गांवाला । पेटारे जाती भरून ते वेळा । शिवपुऱ्यांतून रोज किती । नाहीं गणती । अचाट हि युक्ति । सुचली शिवबाला ! ॥ चाल ॥ रोज पहारेवाले नेमानं । पेटारे बघती उघडून ॥ आरंभीं रोज उघडून । पाहती नित्य नेमानं ॥ पर कंटाळले रोज पाहून । पुढं पुढं पाहतीना कोण ! ॥ ठका-लागीं ठक होऊन । शिवाजीनं केलं वर्तन ! ॥ चाल ॥ रोज असा नेम चालला । विश्वास वाटला सर्वाला । एकेदिशीं शिवानं कळविलं आपल्या लोकांला ॥ " कीं व्हा तय्यार अमक्या जागेला । आज रात्रीं नेमक्या वेळेला " । जंव्हा सूर्य चालला अस्ताला । तंवा त्यानं सोडलं पलंगाला । **हिरोजी फर्जंद** वीराला । त्यानं

पलंगावरती निजवला । पांघरली शाल अंगाला । शिवाजीची आंगठी हिरोजीनं घातली ते वेळा ॥ अन् हात बाहेर (उघडा) ठेवला । शिवाजीच्या गादीवर हिरोजी हो पहुडला ! ॥ एक मुलगा चेपतो पायाला । असा सारा देखावा केला । अन् शिवाजी पेटाऱ्यांत बसला । संभाजी जवळ घेतला । अन् पाहाऱ्यातनं बाहेर चालला ! । शिवा गेला ! गेला ! निसटला ! ! । आणि बघतां बघतां शिवराजा नाहिंसा झाला ! ॥ ४ ॥

—: ५ :—

**दुसरे** दिवशीं पोलादखान आला । पहारा करण्याला । थक्क पर झाला ! । गलबला रोजचा दिसेना त्याला । सामसूम वाडा शांत दिसला । पक्षी कोंडलेला उडून गेला ! ॥ लगबगीनं शहाकडं गेला । बोलला शाहाला । " हुजूर ! घात झाला ! । पिंजरा आज रिकामाच पडला । शिवा फसवून निघुन गेला ! । गेला कसा ठाव न कोणाला ! ॥ चोवीस तास पहारा खडा केला । तरि ही पार झाला ! । कळेना कसा गेला ! । काय जमिनीच्या आंत शिरला । अस्मानांत काय उडुन गेला । भूत चेटूक साहाय्य त्याला ! ॥ पचीस हात मारतोय उडी । ऐकलं घडोघडी । म्हणुन मोठे गडी । ठेवले होते पहाऱ्यावरती





मी खास । फसवून गेला कसा सकळास । समजेना गूढ पडलं आम्हांस ! ॥ दात ओंठ चावले शाहानं । मुठी वळून । बोलला रागानं । " गेला कसा ? कुठं हराम सैतान । काय करूं ! "— बोलला दाढी हालवून । गेलं कंबरडं त्याचं वांकून ! ॥ चाल ॥ मग धाडली फौज शाहानं चारी दिशेला ॥ ' जिथं शिवा दिसेल तिथं पकडा '—हुकुम असा केला ॥ किती स्वार गेले शोधायला चारी बाजूला ॥ पण शिवा सांपडेना त्याला । दाढी मिशा काढल्या ते वेळा । वेष वैराग्याचा हो केला । अन् चालला राजा मथुरेला । अज्ञातवास हा भला । काय धर्मराज प्रगटला ! । नलराम–पांडवादींना जोड जाहला ! ॥ असो ! आतां ऐका गोष्टीला । मथुरेला राजा हो गेला । संभाजी संगें घेतला । कृष्णाजी विसाजी काशिराव मथुरेला ॥ होते, त्यांच्या जवळ संभाजी बाळ ठेवियला ॥ शिवराय गेला मग पुढं काशि-यात्रेला ॥ हळुहळु राजा मग आला दख्खन देशाला ॥ मग गेला राजगडाला । **बालेकिल्या**जवळ जरि गेला । तरि वळखेना कोणी राजाला । शिपायानं रोखलं राजाला ! । आणि आंत निरोप धाडला । कीं " बैरागी एक वर आला । अन् भेटायची इच्छा तुम्हांला " । मोरोपंत आले दाराला । जिजा माउली आली दाराला । पण वळखेना आई बाळाला ! । शिवबानं धरलं पायाला । जंवा हात लागला पायाला । तंवा वळखिलं तिनं मग

त्याला ! । प्रेमाचा ओघ सुरु झाला । अन् शिवाजीच्या हातां-तुन तिच्या पायामधिं शिरला ॥ पोटाशीं धरलं बाळाला । प्रेमानं डोळा भरुन आला । आनंदीआनंद झाला ॥ चाल ॥ किती तोफा झडल्या ते वेळा । चहुकडं बातमी देण्याला । किती दानधर्म हो केला । आणि पुजा बांधली देवीला ॥ असा कांहीं काळ मग गेला । संभाजी दक्षिणेंत आला ॥ चाल ॥ उघडलं शब्दभांडार । शारदेचा वर । तरि न भरपूर । शिवाजिचं यश वर्णाया खास । 'नेति ! नेति' ! मौन पडलं सकळांस । शाहीर **पांडुरंग** शिवदास ॥ ५ ॥

गोकुळाष्टमी, श. १८५३.



# १२

## वसईचा वेढा.

## पोवाडा.

थरकांप सुटे शत्रुला । पाहुन ज्याला । वसईचा किल्ला । ज्यानं सर केला धरून तलवार । फिरंग्यांना ज्यानं दिला बहु मार । चिमाजी धन्य धन्य सरदार ! ॥ ध्रु० ॥

—: १ :—

**सिंहांचा** सिंहपणा गेला । भ्याडपणा आला । म्हणून घात झाला । आर्यभूमिला परक्यांचे पाय । लागले, लोक करिती हाय ! हाय ! ! । फिरंग्यांनीं केले कितिक अन्याय ! ॥ कोंकणचा प्रान्त जिंकून । किल्ले बांधून । बंदोबस्त करून । फिरंग्यानं मोठा जुलुम केला । हैराण सारा लोक झाला । असा छळ कधीं कुणि न केला ! ॥ चाल ॥ साष्टी, आगर, वसई

आणि वांद्रे—या गांवचा लोक जुलमानं सारा बाटवला ! ॥ तुरुंगांत डांबलं कितिकाला । कितिकांनीं अन्नपाण्यावीण प्राण सोडला ॥ लोखंडी पत्रा तापवला । अन् त्यावरती कितिक उभा केला ! । तंवा पाय होरपळून गेला ! । असा तडफडून कैक जण मेला । तंवा कोणी विरोध जर केला । तर बांधती त्याला खांबाला । आणि टांचण्या लावती अंगाला । लोखंडी चाप पायाला । डोळ्यात्नं काढती बुबळांला । मग कांपती मुंडकं ते वेळा । इतक्या छळानं जर कोणी नाहीं नमला । तर लावती मशाली अंगाला । अन् उभा जाळती मग त्याला ! ! । ॥ चाल ॥ हिंदूंचीं देवळं पाडून । त्यावरती चर्चं बांधून ॥ बाटविले लोक जुलमानं । विहिरीत्नं मास टाकून ! ॥ झालं बंद होमहवन । असे लोक केले हैराण ! ॥ चाल ॥ तंवा हिंदूनीं विचार असा केला । कीं मराठ्यांच्या ध्यावं मदतीला । मग गंगाजी नाईक पाठारे गेले सातान्याला ॥ अंताजी कावळे देसाई गेले सातान्याला ॥ अन् बोलले शाहू राजाला । "महा-राज ! आलों चरणाला । ऐकावं आमच्या कहाणीला ! फिरंग्यांनीं हिंदुधर्माचा नाश मांडला ! ! ॥ त्यांनीं गांवच्या गांव बाट-वला । बायकांच्या घेतलं अब्रूला । उभ जाळलं कैक लोकाला । हिंदूंचे वाली तुम्हीं झाला । या जाचात्नं सोडवा आम्हांला । नाहींतर तुम्हीच उडवा मुंडक्याला । आपल्या हातानं मरण





आलं तरी बरं—पण नको त्यांच्या जुलमाला । म्हणून आलों आपल्या चरणाला" ॥ चाल ॥ शाहूचें हृदय कळवळे । त्यांना मग बोले । "तुम्ही जा सारे । लवकर करूं दुष्ट-संहार । फौज मराठ्यांची येईल अनिवार । करूं जुलमाला रणावर ठार" ॥ १ ॥

—: २ :—

**रणशिंग** वाजे घनघोर । ऐकुनी वीर । मराठा धीर । पटापट झाला सारा तय्यार । कमरेला जो तो लावी तलवार । सोडुन बायकापोरं घरदार ! ॥ फौजेचा मुख्य रणगाजी । होता चिमणाजी । ज्याच्यावर मर्जी । सदा विजयाची, शौर्याचा जाळ । शत्रूला होता रुद्र कळिकाळ ! । सदा कीर्तिनं घातली माळ ! ॥ मल्हारराव होळकर । शिंदे, पवार । बाजी भिवराव । रामचंद्र हरी, असे सरदार । विठ्ठल शिवदेव पट्टयाची धार । धारेनं केले कितिकजण ठार ! ॥ ठाण्याच्या किल्ल्यावर हल्ला । जो-राचा केला । किल्ला सर झाला । झाला फिरंग्यांचा सेनापति गार । पेड्रो डमेलो झाला रणीं ठार । टोपीवाले झाले कितिक थंडगार ! ॥ मग साष्टी, माहिम, बेलापूर । केळवे, मनोर । डहाणू, शिरगांव । नारगोळ—आलीं त्यांच्या कबजांत । तारापुरीं झाला मोठा आकांत ।

कैक रणवीर पडले समरांत ! ॥ चाल ॥ मराठ्यांची फौज झुंजार । किति झाले फिरंगी ठार ॥ लोकांना देइ आधार । मराठ्यांची ढाल तलवार ॥ चाल ॥ फिरंग्यांचा आधार गेला। मराठ्यांनीं मुलुख जिंकला । फिरंग्यांचा नक्षा उतरला। असा सारा मुलुख सर केला । मग एक राहिला वसईचा किल्ला । तिकडं सारा गनिम मग गेला । वसईचा किल्ला असा आहे कीं समुद्राचं पाणी पसरलं दोन बाजूला !। दलदली जमीन पूर्वेला । म्हणून भय नव्हतं तीनी बाजूला। आणि रेताड मुलुख चवथ्या बाजूला !। फिरंग्यानीं विचार असा केला । " कीं हा किल्ला खंबीर झाला । इथं राहून करून युद्धाला । मराठ्यांच्या जिरवूं मस्तीला "। असं म्हणून झाला तय्यार युद्ध करण्याला !! ॥ जागजागीं शिपाई उभा केला। तोफखाना बुरुजावर ठेवला। दारुगोळा तय्यार केला । इकडं मराठ्यांना कळलं कीं वसईला फिरंगी गेला । तंवा मराठ्यांचा सेनासागर तिकडं चालला ॥ घनघोर संग्राम जो झाला । सांगीन आतां दादानों ! पुढच्या चौकाला ॥ २ ॥

—: ३ :—

**वसईच्या किल्ल्यावर** हल्ला । करण्याला आला ।





मराठा भाला । बंदुका, तोफा आणि तलवार । पट्टे, खंजीर, बर्च्या अनिवार । ज्यांनीं कितिकांना केलं हो ठार !॥ माघाच्या शुद्ध दशमीला ! वेढा घातला। वसई किल्ल्याला । तोफांचा मारा सुरूं झाला। मराठ्यांनीं हल्ला जबर केला । फिरंग्यांनीं मोठा जोर धरला ! ॥ माणसांचा मोठा बंधारा । घालुन खंद-काला । कोटाला भिडला । मराठा शौर्याचाच अवतार । फिरं-गीहि होता मोठा लढणार । त्यानं तोफांचा केला भडिमार । जणू पसरला अग्निचा जाळ ! ॥ चाल ॥ फिरंग्यांना वाटलं ते वेळा। हा शत्रु जबर बहु झाला। काय होईल ठाव कोणाला?। म्हणुन मुलं बायका पाठवूं गोव्याला । अजून समुद्रावर जंवर मराठ्यांचा नाहीं जोर झाला। तंवरच पाठवावं बायकापोराला। असा त्यांनीं बेत हो केला। एके दिवशीं मध्यरात्रीला। काळोख फार दाटला । एक नाव आणली ते वेळा । बसविलं बायका-पोराला । अन् चालली नाव गोव्याला ! पण—मराठ्यांनीं पाठलाग केला । आणि आणलं धरुन सगळ्याला !। त्यामाजी किल्लेदाराची होती सुंदरा ! ॥ छावणींत नेलं मग तिला। मग नावाडी बोलले आप्पाला । " सरकार ! काल रात्रीं एक नाव चालली होती गोव्याला !। पाठोपाठ हल्ला आम्हीं केला। आणि पकडलं साऱ्या लोकांला। वसईच्या किल्लेदाराची ही हो सुंदरी ॥ कशी आहे पहा गोजिरी । ही पहा ओठाची कळी।

तारुण्य मुसमुसे उरीं। ही खरी मदनमंजरी। सरकार! न्यावी ही घरीं"। चिमणाजी आप्पा बोलला। "छट्! बोलूं नका असल्या गोष्टीला। परनार मातेसम मला। साडी चोळी देऊन हिला। पोंचवा किल्ल्यावर, चला"। चिमणाजी बोलला मग तिला। "बाई! आईसारखी तूं मला। धर धीर, सोड शंकेला। पोचविन तुझ्या घरीं तुला"। असं म्हणून त्यानं पाठवलं किल्ल्यावर तिला! ॥ चाल ॥ श्री रामचंद्र जगिं शूर। महारणवीर। तयाहुन शूर। तोच नर ज्यानं जिंकला काम। चिमाजी धन्य! धन्य! तव नाम!! असे किति वीर जगीं निष्काम! ॥ ३ ॥

—: ४ :—

**निकराचा** हल्ला चढविला। धडाधडा गोळा। तोफेंतुन गेला। तरी पण किल्ला नाहीं पडला। फिरंग्यांनीं मोठा जोर केला। तीन महिन्यांचा काळ गेला! ॥ चार पांच धमधमे केले। तय्यार भले। सुरुंग लावले। यत्न पर सारा फुकट गेला। फिरंग्यांनीं वरनं मारा केला। गरनाळा टाकती वरनं गोळा! ॥ आधणाचं पाणी करून। पन्हाळी लावून। सोडती मग वरनं। खालीं किति लोक भाजला फार!। जळत्या लांकडांनीं केला संहार। असल्या जाळांत कोण जाणार! ॥ चाल ॥





तेंवा चिमणाजी अप्पा बोलला। "वीरानों! लाज आम्हांला। तीन महिने झाले तरी किल्ला नाहीं सर झाला!। अतिरथी महारथी झाला। पण आज काळिमा आला। तुम्हीं जिंकलं कैक शत्रुला। तुमची कीर्ति गेली मुलखाला। तुमचा धाक नवहि खंडाला ॥ चाल ॥ रणीं तुम्हां पाहून खडे। शत्रूचें ऊर धडधडे ॥ तुम्हीं पर्वताचे जणु कडे। असं असता झाला माकडें! ॥ तुम्ही मर्द वीर फांकडे। आज झाला काय तुम्ही रडे! ॥चला उचला पैजेचे विडे। चला, चढा कोटावर खडे ॥ चाल ॥ जर नसेल शक्य तुम्हांला। तर कांपा माझ्या मुंडक्याला। अन् तोफेच्या बांधा तोंडाला। आणि द्यावी बत्ती तोफेला। अशानं तरी माझं मुंडकं जाऊन पडेल किल्ल्याच्या आंतल्या बाजूला। मरण बरं! पण दुष्कीर्ति नको!। मर्दानों! इज्जत आज जाईल, विचार हा करा" ॥ चाल ॥ आप्पाचं बोलणं जोरानं। हृदयांना गेलं भेदून ॥ आप्पाचे शब्द दारुण। जणु मर्मीं लागले बाण!!। 'जय महादेव!' गर्जून। चमकले भाले वेगानं ॥ चाल ॥ रणवीर भिडला कोटाला। कोटाचा चिरा फोडला। सुरुंगानीं पाडलं बुरुजाला। खिंडार पडलं कोटाला। अन् मराठ्यांचा लोंढा किल्ल्याच्या आंत चालला!! ॥ फिरंग्यांचा जराळ (सेनापति) सिल्वेरा। पुढं आला युद्ध करण्याला। पर घुसला छातितुन भाला। आणि मरुन पडला भूमिला। सिल्वेरा जेव्हां

रणीं मेला। तेव्हां फिरंग्यांनीं पळ काढला!। शत्रुचा फडशा उडवला। मग जराळ (सेनापति) पेरिरा आला शरण ते वेळा!!॥ वसईच्या किल्ल्यावर भगवा झेंडा फडकला!!॥चाल॥ जसं कुरुक्षेत्रीं दारुण। पूर्वी झालं रण। किंवा रामानं। केला लंकेला दैत्यसंहार। तसा वसईला झाला संहार। चिमाजी आप्पा धन्य सरदार!। शाहीर पांडुरंग गाणार!॥ ४॥

गणेशचतुर्थी, श. १८५५.



# १३

## माझा हिंदुस्थान!



## पोवाडा

—: १ :—

इथं गंगा यमुना गोमती। सिंधु सरस्वती। गोदा कावेरी। तापी नर्मदा कृष्णा जलभार। नित्य पसरती भूमिवर फार। म्हणून हा हिंददेश मज प्यार॥ सह्याद्रि, विंध्य, हिमगिरो,। दिव्य निलगिरी। अतुल भूवरी,। सातपुडा, इथं शोभा करणार। लाखो वृक्षांना जन्म देणार। म्हणुन हा आर्यदेश मज प्यार॥ जिथं निघे सोन्याचा धूर। नित्य घरोघर। मोत्याचा चूर। राजहंसाला जिथं मिळणार। खनिज संपत्ति जिथं अनिवार। तीच ही आर्यभूमि मज प्यार॥ शुक, मोर, साळुंकी, मैना। मारती ताना। पक्षिगण नाना। करती तरुवर गोड झंकार।

दूत रामाचे करती हुंकार । म्हणुन हा आर्यदेश मज प्यार ॥
चाल ॥ कटाव ॥ किती फुलंझाडं सुरम्य फुलर्ली । जाई जुईंची
लयलूट झाली । बकुल, शेवंती, चाफा, कर्दळी । निशिगंधानं
कमाल केली ! ठाइ ठाइ गुलबक्षी फुलली । गुलाबानीं तर गर्दी
केली । मोगऱ्यानीं फुलबाग फुलविली ! । सदाफुली तर सदाच
फुलली । किती कमळांनीं तळीं खुलविलीं । पारिजातकें मनेंच
हरलीं । ताडमाड वटवृक्ष पिंपळी । आंबा चिंच आणि साग
पोफळी । देऊं कशी मी यादी सगळी ? ॥ चाल ॥ काशी, गया,
प्रयाग, केदार, । द्वारका, अवन्तीपूर, ॥ जगन्नाथपुरी सुंदर, ।
नाशीक, त्र्यंबकेश्वर, ॥ वैराजक्षेत्र, करवीर, । महाबळेश्वर,
डाकूर, ॥ गोकर्ण, हि रामेश्वर, । तीर्थे हीं पाप हरणार ॥ चाल ॥
रायगड सांगे किती गोष्टी माझ्या जीवाला ॥ राजगड, प्रतापगड,
देत मला स्फूर्तीला ॥ तानाजी सिंहगडावर बोलवित मला ॥
मुरारबाजी पुरंदराला । बाजीप्रभु पन्हाळगडाला । संभाजी
सिन्धुदुर्गाला । बहिरोजी बाळ जिंजीला । झांशीची राणी झांशीला ।
चिमणाजी वसईदुर्गाला ॥ चाल ॥ जें नसे पांच खंडांत । सप्त-
लोकांत । असे तें येथ । देवांना हाच देश आधार । पुरुषरत्नांचं
मोठं भांडार । म्हणुन हा हिंददेश मज प्यार ॥ १ ॥



माझा हिंदुस्थान !

—: २ :—

**रावणानं** धुमाकुळ केला । देश गांजला । धर्म ठार केला ।
केलं सुजनांना फार बेजार । रामानं इथं धरून अवतार । केला
रावणाचा पार संहार । म्हणुन हा पुण्यदेश मज प्यार ॥ न्याय-
नीति सारी संपली । स्वेच्छाचार बळी । धुमाकुळ घाली । कंसाचा
जुलुम झाला अनिवार । कृष्णानं इथं धरून अवतार । कंसाला केलं
ताडकन् ठार । म्हणुन ही पुण्यभूमि मज प्यार ॥ नळ, हरिश्चंद्र
भूपाळ । राजा श्रियाळ । आणि युधिष्ठिर । यांनीं भूषविला देश
हा फार । ध्वजा शीलाची फडके दारोदार । म्हणून ही हिंदभूमि
मज प्यार ॥ दमयन्ती, सीता, पांचाली । तारा मंदोदरी ।
जिजाबाई भली । अहिल्या–रत्नं मोठीं पाणिदार । यांनीं नटविलं
देशाला फार । म्हणुन ही आर्यभूमि मज प्यार ॥ प्रतापसिंह
राणा, शिवाजी, । नेताजी गाजी, । राजा संभाजी, । मुरारबाजी,
ताना, बाजी सरदार । होती सर्वांची प्यारी तलवार । म्हणुन
ही हिंदभूमि मज प्यार ॥ चाल ॥ बाजीराव, शिंदे महादजी ।
भाऊसाहेब, विश्वास गाजी ॥ होळकर, शिंदे दत्ताजी । आणि
त्यांत रंगोबापूजी ॥ चाल ॥ इथं सती लक्ष्मीबाईनं जीव अर्पिला
॥ इथं किती वीर अबलांनीं जोहार केला ॥ चाल ॥ विष्णुशास्त्री
चिपळुणकर । लोकमान्य, आगरकर ॥ गोखले, रानडे, थोर ।

दादाभाई नौरोजी थोर। लाला लजपतराय नरवीर। दास चित्तरंजन थोर ।। मोतीलाल आणि जवाहीर । सुभाषचंद्र मोठे झुंजार ।। महात्माजी धीर गंभीर । झाले वंद्य आज जगभर ।। चाल ।। असे कैक जन्मले वीर। महारणधीर। पुरुष गंभीर;। यानीं देशाचा केला संसार। स्वार्थबुद्धिला मारुन ठार। म्हणुन हा आर्यदेश मज प्यार ।। २ ।।

—: ३ :—

**किती** धर्म जन्माला आले। कित्येक गेले। नामशेष झाले। एक पर हिंदुधर्म चिरकाल। इथं फोफावला देशभर फार। म्हणुन ही हिंदभूमि मज प्यार!।। जंवा होतं जग लोळत। अंधकारांत। हिंदुस्थानांत। तंवा होता ज्ञानदीप तेजाळ। झाला होता अज्ञानाचा संहार। म्हणुन ही ज्ञानभूमि मज प्यार!।। चार वेद आणि सहा शास्त्र। अस्त्र आणि शस्त्र। तसे महामंत्र। यांनीं इथं घेतला पूर्ण अवतार। केला पण विश्वावरती उपकार। म्हणुन ही वेदभूमि मज प्यार!।। सत्य, दया, शांति, कौशल्य,। पुण्य, रणशौर्य,। शील, तप, धैर्य,। त्याग आणि नम्रभाव, चिरकाल। इथं वाढले जोरानं फार। म्हणुन ही तपोभूमि मज प्यार!।। वाल्मीकि, व्यास भगवान्।





धौम्य धीमान्। दाल्भ्य तपोधन। वसिष्ठविश्वामित्रादि खास। इथं जन्मुनी केला त्यानीं वास। म्हणुन मज हिंदभूमिचा ध्यास ।। चाल ।। आतां सांगतों संत महंत शील–भांडार ।। ज्ञानदेव, एकनाथ, तुका, गोराकुंभार, ।। मिराबाई, नरसीमेहता, मुक्ता, कबीर, ।। रामदास, तुलसीदास, चोखामेळा, नरवर ।। स्वामी रामकृष्ण, रामतीर्थ झाले हो थोर ।। विवेकानंद आणि अरविंद घोष मुनिवर ।। कालिदास भासानीं नाट्यदेवी नटविली ।। कितिकांनीं हौसेनं काव्यदेवी सजविली ।। तिज अलंकारांनीं मम्मटानं फुलविली ।। चाल ।। सरस्वतीभक्त अगणित। भाषा नटवीत। काव्य फुलवीत। झाले प्रख्यात भूमिवर फार। इथं उघडलं ग्रंथभांडार। म्हणुन मज आर्यदेश हा प्यार ।। ३ ।।

—: ४ :—

**जरी** आज आली अवकळा। माझ्या देशाला। मान संपला। जरि मदमस्त हिणविती फार। जरी खदखदा हसती वाचाळ। तरी मज हिंददेश हा प्यार ।। चाल ।। जरि माझा देश कंगाल आज जाहला ।। जरि नाहीं सोन्याचा लेश आज राहिला ।। चाल ।। अपमानकर्दमीं जरी। गुंतला हरी,। धडकी जरी उरीं। जरी निराशेचा घोर अंधार। पसरला गर्द,

झालों बेजार । तरी मज हिंददेश हा प्यार ॥ उन्मत्त लोकांनों ! जरा । विचार तुह्मीं करा । पूर्वकाळ स्मरा । गर्वानं होऊं नका बेताल । भरलेला पोहरा खालती जाणार । खालचाही खास वरती येणार ! ॥ चाल ॥ दिवसाच्या पाठीला रात्र नित्य लागली ॥ भरतीच्या मागं ओहटी सदा राहिली ॥ जुवानीच्या मागं ती जरा धावूं लागली ॥ जन्माच्या मागं मृत्यूची दौड चालली ॥ दहातोंड्या काळाच्या पोटीं गप्प जाहला । कंसाला काळानं टिचकीसरशीं उडवला ॥ रोमराज्य गेलं विलयाला । नेपोलियन नाहिंसा झाला । चार्लसचा फन्ना उडवला । केसरचा ढंग उतरला । रशियाचा झार हबकला । काळानं किती जुलम्यांचा नक्षा उतरवला ॥ चाल ॥ या नद्या जोंवरी मजला । सांगती पूर्व गोष्टीला ॥ हे पर्वत गड हे सारे । वर्णिती पराक्रम मजला ॥ जोंवरि हीं पुण्यक्षेत्रें । पावित्र्य देत चित्ताला ॥ चाल ॥ जोंवरी ग्रंथ बिनमोल । दाखविती खड्डे खोल । तोलती मनाचा तोल । तोंवरी न चिंता मजला ॥ जोंवरी कूस जननींची । देतसे जन्म वीराला ॥ जोंवरी स्वाभिमानाची । तापवी ज्योत हृदयाला ॥ जोंवरी पारतंत्र्यानें । न च विटाळलें चित्ताला ॥ चाल ॥ तोंवरी न चिंता मजला । जाईल दैन्य विलयाला । भाविकाळ उज्ज्वल झाला । विश्वास पांडुरंगाला । ४ ।

गणेशचतुर्थी, श. १८५५.



# १४

## सुधारणा कीं कुधारणा ?

## पोवाडा.

ऐका लोकानों ! पोवाड्याला । नारद इंद्रलोकिं गेला । देव सारा होता गोळा झाला । नारद त्यांना तंवा बोलला । “ देवानों ! ऐका भाषणाला । स्वर्गाचा दिमाख पुरे झाला । स्वर्गावर मोठा घाला आला । तुमच्यावर मोठा घाला आला । मृत्युलोकाचा स्वर्ग झाला ! । माणसानं केलं करामतीला । जें जें नाहीं स्वर्गांत या वेळा । तें तें मी पाहिलं नृलोकाला । माणूस प्रती देव झाला । कोणी विचारेना रे तुह्मांला ॥ ॥ ऐकावं ॥ १ ॥

देव सारा कावरा बावरा झाला । घसा मग त्यांचा कोरडा पडला । एक त्यांनीं रेझोल्युशन (ठराव) केला । कीं भेटावं भगवान् विष्णूला । मग तय्यार केलं डेप्युटेशनाला (शिष्टमंडळ) । डेप्युटेसन गेलं भेटायाला । देव तंवा बोलले भगवानाला ।

" आमच्यावर मोठा घाला आला । नारदानं सांगितलं आम्हांला । कीं माणसानं दुसरा स्वर्ग केला । मग कोण विचारणार आम्हांला ? । नारदाचं म्हणणं पडताळायला । कुणी तरी जावं नृलोकाला । चंद्र आणि सूर्य ही मदतीला । आपणच जावं कामगिरीला " । काळजी देवांची भगवानाला । भगवानानं जायचा विचार केला ॥ ऐकावं० ॥ २ ॥

विष्णु नररूपीं प्रगट झाला । गोपाळ नांव घेतलं आपणाला । गोपाळ मुंबईंत आला । रस्ता चकाचक्क दिसला त्याला । नित्य लोकांच्या कल्याणाला । रस्तोरस्त्याला शिपाई राहिला । मोटारींचा सुळसुळाट झाला । वीजगाड्यांनीं कहर केला । विमानं फिरतीं आकाशाला । माणूस मुळीं नव्हतं हो गायाला । पण गाण्याला रंग आला । पेटीला कंठ गोड फुटला । टॉकीमधिं गोपू दंग झाला ॥ ऐकावं० ॥ ३ ॥

ताजमहाल हॉटेलांत गेला । प्यूननं बोलावलं आंत त्याला । बटन जरा दाबलन भिंतीला । सरसर लिफ्ट वरती गेला । जणु विमानाचा भास झाला । गोपाळ खोलीमंदीं गेला । कॉटवर जरा खालती बसला । गरगर पंखा वरती फिरला । इतक्यांत एक इसम आला । त्यानं गोपाळचा पाय धरला । अन् बूट काढून दूर ठेवला । मग एक चहाचा कप आला । बिस्किट होती बरोबरीला । चहाचा घोट घशांत गेला । सारा





कप ढसा ढसा प्याला ! । पंचपक्वानं भोजनाला । ' ट्रीटमेंट व्हेरी फाइन ' बोलला । पत्र त्यानं लिवलं देवलोकांला । कीं " गोपाळ आज चहा प्याला; । चहानं लाजवलं अमृताला ! । येतांना आणीन तुम्हांला " ॥ ऐकावं० ॥ ४ ॥

गोपाळ सायंकाळीं गेला । चौपाटीवरती फिरायाला । देवलोकाचा भास झाला । होता किती लोक रंगलेला । होता जरी कैक वृद्ध झाला । तरी जुवानाचा ढंग केला । कलपानं केस काळा केला । पांढऱ्या चूर्णानं गोरा झाला । तेलानं घमघमाट केला । नटण्या थटण्याला ऊत आला ॥ ऐकावं० ॥५॥

गोपाळ गेला जर्मनीला । तत फ्यासनला ऊत आला । नवा नवा ढंग रोज झाला । गल्लोगल्लीं अप्सरांचा मेळा । हिटलर साहेब भेटला त्याला । त्यानं नेलं त्याला लेक्चराला । हिटलर लागला बोलायाला । " कंट्रीमेन । ऐका भाषणाला । राष्ट्रसंघानं ठराव केला । कीं जगामंदीं पीस ( शांतता ) नांदण्याला । डिस आर्मामेंट ( शस्त्रसंन्यास ) मंत्र झाला । खरोखर ठराव योग्य झाला । पण ऑनेस्ट्ली ( प्रामाणिकपणें ) सांगतों तुम्हांला । दुसऱ्या राष्ट्रांनीं अमलांत आणावं त्याला । पण फॉर द प्रेझेंट ( तूर्त ) आमच्या देशाला । सवड नाहीं असल्या ठरावाला । दुसऱ्या देशांनीं जोर केला । आमच्यावर त्यांचा मोठा डोळा । फ्रान्सचं बिनसलय वाटतं मजला । अमेरिका

देश गबर झाला । बॅलन्स् ऑफ पावर (समानबलत्व) राखण्याला । तोफखाना वाढवला पाहिजे आम्हांला । विमानं लढणारी बांधण्याला । बावं तुम्ही आपल्या मंजुरीला " ॥
॥ ऐकावं० ॥ ६ ॥

हिटलरानं नेलं गोपाळाला । युद्ध सामुग्री बघायाला । हिटलर बोलला गोपाळाला । " याला म्हणतात बाँब गोळा । एक गोळा मारतो शंभराला । हा एक जहरी गॅस (धूर) झाला । करतो रणीं ठार हजाराला । तोफेचा गोळा म्हणती याला । तट पाडण्यांत हुशार झाला । नुकतीच एक झाली मोठी लढाई, । त्यांत एक कोटि ठार झाला । हा लढाऊ जहाजांचा तांडा आला । विमानांचा मोठा तळ पडला." । गोपाळ बोलला हिटलराला । " कुणाला मारायचं यानं बोला । तुम्ही मर्त्य लोकाचा स्वर्ग केला । भाऊ भाऊ तुम्ही सगळे झाला । आंतवर झकपक झाला । शांतिचं राज्य दिसलं मजला " ॥
॥ ऐकावं० ॥ ७ ॥

हिटलर लागला बोलायाला । " डिअर गोपाळ ! आम्हांला शांतता कुठं नको आहे ? । पण अॅज अ नेसेसिटी (जरूर म्हणून) हें सारें पाहिजे आम्हांला ! । नाश दुष्टांचा करायाला । जर मजुरांनीं गिल्ला केला । तर त्यांना ह्यानं समजावायला । ठेवणं भाग आहे आम्हांला । पण मात्र हृदयांत दुःख होतयं





कीं जगांत शांतता नांदत नाहीं म्हणून ! ! " ॥ ऐकावं० ॥८॥

गोपाळ गेला रशियाला । रक्ताचा चिखल दिसला त्याला । मुंडक्यांच्या माळा दिसल्या त्याला । गोपाळ देशोदेशीं गेला । सगळीकडं तोच प्रकार दिसला त्याला । भूलोकाचा वीट आला । अन् एक वर्सानं स्वर्गीं गेला ! ॥ ऐकावं० ॥ ९ ॥

देवगण सम्दा गोळा झाला । भगवान् विष्णु बोलले त्याला । कीं " देवानों ! भीति नाहीं तुमच्या महात्म्याला । **माणुस पक्का ढोंगी झाला** । वरवर दिसतो सुधारलेला । आंत पर काळाकुट्ट झाला । गाळतो नक्राश्रु वेळोवेळा । स्वार्थ तर रोमरोमीं भरला । कृतज्ञता नाहीं ठाव त्याला । हत्तीवाणी मदोन्मत्त झाला । गरीबाची गणती नाहीं त्याला । बलवान छळतो दुर्बळाला । न्यायनीतिचा विचार सरला । ह्मणतो कल्चर्ड आपणाला । पण त्यानं केलय असल्या यंत्राला । कीं एक यंत्र एकावेळीं मारतयं लाखाला ! । क्रूराहून क्रूर खास झाला । किती देश बंदिवान दिसला । दुरूनच रूप डोंगराला । किती जरी दिसला सुधारलेला । तरी जोंवर मनांमधिं नाहीं सुधारलेला । तंवर भिण्याचं कारण नाहीं तुह्मांला " ॥
॥ ऐकावं० ॥ १० ॥

ऐकून अशा भाषणाला । देवांच्या जीवांत जीव आला । पांडुरंग गातो पोवाड्याला ॥ ऐकावं० ॥ ११ ॥

# १५

## लोकमान्यांचें देहावसान !

---

## पोवाडा.

( हा पोवाडा लेखकानें १९२० सालींच लोकमान्यांच्या देहावसानानंतर लगेच लिहिला आहे. )

अगाध लीला परमेशाच्या घडवी संसार ।
जगताचा बहुविधा करुनिया घेउनि अवतार. ॥
पानपतीं संग्राम चालला भीषण घनघोर ।
धन्य बाळ विश्वास, सदाशिव गेले महशूर ! ॥
' हर हर हर हर ' शब्द चालला हृदयें भेदून ।
' खण खण खण खण ' शब्द दाटला गगनीं संपूर्ण ॥





चाल—जरि असे दैव वांकडें । कांहिं नच घडे । येति सांकडें ।
एकत्र जमुनिया सारीं । तात्या देव ही मारी ।
शूर मराठे भूमातंकीं निजले हो सारे ।
उघडीं झालीं स्वागत करण्या तीं स्वर्गद्वारें ॥ २ ॥
नाना आले सद्‌बुद्धीची घेउनिया ठेव ।
उभा राहिला उद्योगाच्या पार्श्वभागिं देव. ॥
राज्य राखिलें त्या मर्दानें पुण्य शिवाजीचें ।
आलें रे आमंत्रण त्याला निष्ठुर देवाचें ॥
गेले गेले शिवबा गेले, ते दिवसहि गेले ।
सौख्याचे ते बागबगीचे पार शुष्क झाले !! ॥
चाल—ते धन्य होउनी गेले । राज्य घडविलें । दुष्ट नाशिले ॥
सत्प्रेम मिसळुनी गेले । हृदयांत वीर्य कालविलें ॥
दैवाचा दुर्विपाक झाला पुण्य-भाग सरला ।
धीर द्यावया परि लोकांला एक पुरुष आला ! ॥ ३ ॥
आला आला अमित तपोबल वंदित बलवंत ।
शंखचक्र करिं धरुनि पातला विष्णु मूर्तिमंत ॥
उदयाचलिं चंडांशु रंगला पारतंत्र्यरजनी !
थर थर कांपे कांहिं कळेना काय करिल ह्मणुनी !
मदोन्मत्तता विचार करिते ' भ्याड काय करितो ! ' ।
शस्त्रशक्तिपंचाननपुढती अहा काय करि तो ! ॥

चाल—परि असे एकटी शक्ती । गुप्त राहती । आर्यधर्मीं ती ।
'अध्यात्मशक्ति' त्या नांव । शस्त्रास्त्र शक्तिला घाव ।
घालुनी जयान्वित होय ॥
ठावे कैंचें हें त्या आमुच्या सुज्ञ बांधवाला ? ।
भौतिकसुखिं मर्यादित ज्याची सर्व शक्ति त्याला ? ॥ ४ ॥
चढत चालला अनुक्रमानें 'बाल' अंतरिक्षीं ॥
त्या तेजानें दिपत जाउनी नृपती त्या लक्षी ।
सुरतेचीं तीं मेघमंडळें कालिकुट्ट सगळीं ।
शकलें करुनी, करुनि विदारित, आपद्विषहि गिळी ।
षड् वर्षें कारागृहिं रुधिला गंगाधरतनय ।
रुधिला कैंचा, दिसे आम्हांला, तेज न गत होय ॥
चाल—तो गीतारहस्य लिहुनी । शांतिपद वरुनि ।
पातला भुवनीं । गीतामृत सकला द्याया । अमृतें
अमरपद घ्याया ।
"बाल' दिवाकर चढत चालला आला माध्यान्हीं ॥
तेज तयाचें प्रचंड झालें, असह्य या भुवनीं ॥
श्रीमंताला कुरवाळुनि, करिं गरिबाला धरुनी ! ।
सिंचुनि प्रेमामृत, संपादुनि अतुल कीर्ति भुवनीं ॥
शत्रूंनाही मित्र करोनी, देशकार्य करुनी ।
संघ घडवुनी, भूमातेला सुपुत्र साजोनी ॥





आर्यमहीवरि स्वातंत्र्याचा वरद हस्त धरुनी, ।
'लोकमान्य' पदवीयुत होत जी दिली बांधवांनीं ॥
चाल—पश्चीम दिशेला गेला ! रक्तपट त्याला । नेत्र फिरविला ! ।
देशांतरिं गडबड झाली । नैराश्यपंकिं भू रुतली ! ।
बालरवी अस्तंगत झाला, शोक—सागरांत ।
बुडली नौका आर्यमहीची, एकच आक्रांत ! ॥ ६ ॥
हाय ! हाय ! रे दुष्ट कृतांता ! हें केलें काय ? ।
कां नच तुजला हृदयाचें तें बंधन, रे हाय । ॥
गेले गेले सर्वहि गेले थोर थोर गेले ! ।
राम कृष्ण शिवबाही गेले रामदास गेले ! ॥
दादाभाई राष्ट्रपितामह, देश दास, गेले ।
धन्य असे हे सर्व हि गेले ! कां ? कोण गेले ? ॥
चाल—आज हा कळस चढविला ॥ पूर्ण जाहला । तिलक
घेतला; ॥ कां झाले सौख्य मनाला ? । कां झाले
सौख्य जिवाला ? ॥
परि ऐसे मी कैसे वदलों ? कृतान्त तो काय ? ।
सेवक परमेशाचा, देवचि दोषस्पद होय ॥ ७ ॥
कां जगदीशा ! आजचि तुजला हाही आवडला ।
देवा केव्हांही तो तुमचा, आजचि कां नेला ? ॥
कां स्वर्गामधिं मुत्सद्यांची पडली ती वाण ।

ह्मणुनी नेला सत्वरिं येथुनि हा आमचा प्राण !।।
हिंद देविचे दुर्भाग्याचे अजुनि दिन न सरले !।
हेंचि खरें बा निंद्य असे रे त्वां कांहिं न केलें ।।
चाल–त्वां जरी देह नाशिला। जीव पळविला। सर्व हरपला;।
तरि सर्वहि फसली करणी। ती मूर्ति दिसे या नयनीं।
हृदयासनिं जो सतत विराजित सर्वांच्या झाला।
तो बा! आतां जाईल कैसा जरि आला घाला! ।। ८ ।।
जीर्ण देह हा ह्मणुनी नेले कां देण्या त्याला।
अन्य देह तो पुनरपि देशा उद्धृत करण्याला? ।।
जोंवरिं स्वातंत्र्याचा तरुवरि पूर्ण बहर न दिसे।
तोंवरि दहिवरजलकणसिंचन केले बा कैसे? ।।
हाय हाय हा सद्‌बंधूंचा प्राणसखा गेला!।
प्रत्येकाचा विगतचेतन स्वस्थ देह ठेला! ।।
चाल–तें तेज लुप्त जाहलें। धैर्य ना ढळें। भाग्य संपलें;।
शोकाकुल संप्रति झाले। लोक; दास्य नित्यचि ठेले।
संशय आला हाय असा हा, तिलक दीननाथा!।
हिंदभूसुता! पतितोद्धारा! कृपा करी आतां ।। ९ ।।
अंधाराला दुरि करणारा दिनकर तो गेला!।
कैसें आतां करितिल तारे निरस्त तिमिराला? ।।
अंधारामधिं धडपडतांना एक दीप होता! ।।





तोही गेला; घोर तिमिर तो आज दिसे आतां!।
स्वैरपणें संचार चालला वन्य पशुवरांचा।
उगम दिसेना, मध्य दिसेना अंतहि मार्गाचा ।।
चाल–तरि चला सर्व जाउया। विघ्न चिरडुया। मार्ग काढुया।
स्वातंत्र्य पूर्ण मिळवाया। मातेचें मोचन करुया।
'स्वराज्य माझा जन्मसिद्ध हा हक्कचि आहे' या ।।
उक्तीला मनिं नित्य वागवुनि झिजवूया काया ।। १० ।।

# १६

## श्रीसमर्थ–चरित्र

## पोवाडा.

रामदास सद्गुरूराया ! । धन्य तव माया। धर्म रक्षाया । घेतला महाराष्ट्रीं अवतार । कंठीं धरियेला कीर्तिचा हार । पोवाडा **पांडुरंग** गाणार ॥ ध्रु० ॥

—: १ :—

**गेला** धर्म पार विलयाला । अधर्म जगिं आला। आचार नष्ट झाला । हिंदुनीं सोडला सारा अभिमान । मान यवनाच्या हातीं, तरी मान । घालि मनामधीं मोठा थयमान ! ॥ देवतांची मूर्ति भंगली । पायीं तुडविली ॥ छिन्नभिन्न केली। कितिक जळामधीं झाल्या साऱ्या गार । वरती यवनांची चमके तलवार ।





देवळं किती भंगली नाहीं पारावार ॥ हंबरडा फोडे किती गाय । विश्वाची माय । करिते 'हाय ! हाय !'। दीनवाणी झाली, नुरला आधार । दीनदुबळा झाला हिंदु सरदार। नष्ट कितिकांचें झालें घरदार ! ॥ यवनांनीं मांडला अनाचार । करति बलात्कार । झाली कारागार । घर कसलीं ? झाला जीव बेजार। धैर्य गेलं आली मोहाची तार। झाला अभिमान हाय ! पुरा ठार ! ! ॥ चाल ॥ ब्राह्मणानीं सोडला आचार झाला ज्ञानहीन ॥ क्षत्रियांनीं लठेपणा दिला आपला तो दान ॥ दोर्घानीं सोडलं धर्माला, करति सुरापान ॥ भांग गांजा तंबाकू यांचं नित्य सेवन । पोटासाठीं करती म्लेंच्छांचा मोठा सन्मान ॥ झाला दीन, मूढ विसरला सारं देहभान ! ॥ चाल ॥ अशि दशा दीन देशाला । हाय ! आली; मोठा हा घाला ! ॥ जगण्याचा भरवंसा गेला ! । उद्यां काय ? नकळे कोणाला ॥ चाल ॥ असा धर्म सारा लोपला । यवनांनीं हैराण केला । त्राहि त्राहि केलं लोकाला । तीर्थांचा व्याप संपला । किती बायका जपती अब्रूला । सुळसुळाट दैत्यांचा झाला । वेदांचा संहार केला !। अवकळा आलि भाषेला ॥ चाल ॥ धर्माचा करण्या उद्धार । झाला अवतार । आला यतिवर । ह्मणति जन **रामदास** चिरकाळ ! । रामाचा दास, काळाचा काळ ! । शुभ्र कीर्तिनं घातली माळ ॥ १ ॥

—: २ :—

शके पंधराशें तीस सालाला झाला महिवर अवतार ।
ठोसर कुळिं सूर्याजिपंत ते, धन्य जाहले घरदार ! ॥
**नारायण** मग नांव ठेविलं, रूप मनोहर सुकुमार ।
पाहुनिया हे बाळ सकळजन झाले मनिं गारेगार ! ! ॥
बाळपणिंच वनवास आवडे येइ जगाचा तिटकारा ! ।
गिरिकुहरांतुन बसुन लपुन रघुराजपदाचा घे थारा ! ॥
बारा वर्साचं बाळ जाहलं विवाह ठरला मग त्याचा ।
'सावधान' रव ऐकुन झाला सावधान तो कायमचा ! ॥
॥ चाल ॥ घर सोडुन गेला मग टांकळीस तो बाळ ॥ बारा वर्षे केलं तप, झाला काळाचा काळ ॥ ऋद्धि सिद्धि रामदासाला घालती माळ ! ॥ मग केलं तीर्थाटण, बारा वर्साचा काळ ॥
॥ चाल ॥ देश वेश पाहुनी पारखुन लोक, लागली मग चिंता ।
महाराष्ट्रभूमिची घोर, करुणा कधिं येईल भगवंता ! ॥ २ ॥

—: ३ :—

**छत्तिस** वर्स पुढं चालवित महाराष्ट्राचा संसार । धर्माला उजळा बहु दिधला—फिरति नित्य दारोदार ! ॥ चैतन्य नवें





खेळु लागलें स्वतंत्र होण्या अनिवार । पिकलीं पानं टप् टप् गळलीं, धर्मवृक्ष धरि फळभार ॥ नौबत झडली, कडीं कडाडलीं, खड्ग करी रणिं कल्लोळ । 'रामदास-शिवराय' युगल हें होउनि गेलें बिनतोल ! ॥ धर्म मिळविला, देश मिळविला, दास्य बंध सत्वर तुटला । 'यवन बंड आडदांड बुडविलं,' हाच पवाडा जनिं केला ! ॥ चाल ॥ किती केला व्याप मठ किती स्थापन केला ॥ दीड हजार होते मठ, घेरलं साऱ्या देशाला ! ॥ आगगाडी मोटार नव्हती तंवा जाण्याला ॥ पर पायीं देशभर गेले, जीव कष्टविला ! ॥ चाल ॥ ठायीं ठायीं मग महंत ठेवुन, करुन जागृति धर्माची । शके सोळाशें तिसऱ्या वर्षी केली समाप्ती जन्माची ! ॥ ३ ॥

—: ४ :—

**समर्थांनीं** उपदेश केला । आपल्या शिष्यांला । तोच या काळा । आज आपणांला चतुर करणार । देशाला तेज तोच देणार । ऐका शाहीर तोच गाणार ॥ हरिकथा आर्धी निरुपण । राजकारण । सावधानपण । सर्व विषयांच्या ठायीं अनिवार । हेंच स्वराज्याचं दार छानदार । बंधुनों ! स्मरा त्यांचे उपकार ! ॥ बोलावें तसें चालावें । करावें करवावें ।

धरावें धरवावें । भजनमार्गाला लोक वश खास । जोडावीं मनं धरावा विश्वास । परीक्षावं नीट साऱ्या लोकांस ॥ चाल ॥ मध जसा गोड तसं सदा गोड बोलावं ॥ एके जागीं राहूं नये, सदा दूर हिंडावं ॥ भिक्षामिषें लहान थोर पारखून सोडाव ॥ विवेकाला मित्र बनवावं । यत्नाला कधिं न सोडावं। आळसाला दूर लोटावं । उदासीन कधीं न राहावं । क्षण एक जगणं कीर्तिनं बरं समजावं ॥ वैराग्य अंगिं राखावं । चैनिचं घरटं जाळावं । निस्पृह सदा राहावं । महंतानं क्षमाशील शांत सदा जनिं व्हावं ॥ उपकार करून कितिकांचं चित्त जोडावं ॥ कामक्रोधादिक सर्वही पार जिंकावं । असं सदा चित्तिं ठेवावं । मग स्वातंत्र्य येइल चालून, सूख भोगावं ॥ चाल ॥ आज काळ कठिण बहु आला । हिंद देशाला । गेलं विलयाला । सारं तेज, झाला गरीब सगळा । हिंदु सारा झाला दीन दुबळा । म्हणुन आठवावं समर्थांच्या बोला ॥ ४ ॥



# १७

## गुजराथचा जलप्रलय !

### पोवाडा.

---

गरीबांच्या मदतीला चला, । ईश्वरी घाला । गुजराथीं आला । त्यांत कितिकांचा झाला संहार । बेकार झाले कैक हज्जार । वाहुनि गेली कितिक घरदार ॥ ध्रु० ॥

—: १ :—

**तारीख** पंचवीस जुलै सोमवार । घोराहून घोर । पाण्याचा पुर । आला, तंवा वाटे मोठा प्रळेकाळ । जणू काय खालीं पडलं आभाळ । भीतिला नाहीं राहिला हो ताळ ॥ गरिबीनं केलं लोकास । आधीं कासविस । त्यांत हा त्रास । हाय ! अगणित आला आयास । कोपला देव, एक विश्वास । कोणाचा आता

सांगा जीवास ? ।। आधीं एक मोडकी झोंपडी । आणि ही कुडी । बाळबापडीं । तीं ही वरपडीं झालीं दुःखास । त्यांत कितिकांचा जाहला नाश । ठाव एक संख्या चित्रगुप्तास ! ।। शेषशाई गेला हादरून । सूर्य दचकून । गेला लोपून । वारा पण झाला सारा थंडगार । इंद्रानं धरला घोर आकार । तांडवनाच नाचे शंकर ।। झाडं वाजति हो कडकडा । घर धडधडा । चालला धुमधडा । रडारड झाली । शहारा आला ।। कोण ह्मणती वाचवा मला, । माझ्या बाळाला । माझ्या बायकोला । हाल जीवाला ।। आतां कथा सारी घडलेली सांगे शाहीर ।। गरीबांना आतां दादांनों ! काय देणार ? ।। असो ऐका गोष्ट मेसुर । मग करा आपला निर्धार । दोन दिवस पडला पाऊस मोठा घनघोर ।। खळ नाहीं, सारखी लागली पाण्याची धार ।। आधीं नुसत्या पावसानंच किती बसलं घरदार ।। सोमवारीं रात्रीं हा घडला सारा प्रकार ।। टेंभीचा फुटला तलाव, लोक बेजार ।। टेंभी, हर्णी, मकर–पुरा, झालीं गांवं ही गार ।। विश्वामित्री नदी कोपली आला हो पूर ।। आलं पाणी बडोदे शहरांत बेऽसुमार ।। चार पुरुष पाणी राहीलं रस्त्यावर ।। पाणी मध्यरात्रीला चढलं दुमजल्यावर ।। चाल ।। भिंतीचा चिखल मग झाला । तळमजला खालीं घसरला । किती निजले होते जागेला । तुळयानीं त्यांचा चूर केला ! । नाका-तोंडांत पाणी जाऊन, जीव घुस्मटुन लोक किती मेला ! ।।





पाण्याचा लोंढा पाहिला । कोण वरच्या मजल्यावर गेला । खालीं सारा कोसळला । चिखलांत गेला मिसळून नाहींसा झाला ! ।। कोण रडती जीव कोंडला । कोण ह्मणती 'मेलों हो मेलों राखा जीवाला' ।। कोण ह्मणती 'काढा पोराला' । पर कोण जाणार बोला ! । घडी घडी इमला तडकला । सहा हजार इमला धुळीला । मिळाला एकाच गांवाला । आणि किती आले भूमिला ठाव कोणाला ? ।। (चाल) ।। मृत्युचा भरला दरबार । असला हा घोर । केला संभार । भूमिचा कमी, काय समजेना । गरीबाला झाल्या यातना । काय थोरांना । नाहीं कल्पना । राखा दीनांना ।। १ ।।

—: २ :—

**कोण** बसती धरून झाडाला । कोण तारेला । कोण छपरावरती जाऊन राखती जीवाला । तीन दिवस नाहीं झोंपेला नाहीं अन्नाला । हाय ! खालीं जळसागर कोपला ।। आली घेरी हात सुटला पाण्यामधीं पडला । घुस्मुटुन कैकांचा जीव देहांतुन गेला । असा काळ आला काय ठाव होता कोणाला । काय नशीब फुटलं करुणा नव्हति दैवाला ।। एका बाइनं मूल बांधलं आपल्या पोटाला । पर अंतकाल दोघांचा एकदम आला ।

पाण्यांत घुस्मटुन सोडलं त्यांनीं जीवाला । कधीं सांगा कोणी देखावा असा पाहिला ? ॥ ज्या झाडावरनं असा लोक होता बसलेला । तीच झालीं झाडं आधार कितिक सापांला । आधार सापांचा त्यांना, त्यांचा सापांला । दोघांच्या जीवाला घाला एकदम आला ! ॥ चाल ॥ दोन दिवस गेल्यावर महापूर ओसरला ॥ घरदार माणसं किती मेलीं—अंदाज केला ॥ सहा हजार घरदार मोडलं, कहर हा झाला ! ! ॥ किती मुडदे कुजलेले घोर दिसती त्या वेळा ॥ किती प्रेतं सडलेलीं दिसतीं जागजागेला ॥ धनधान्य नासून गेलं—घाण गांवाला ॥ गाडीचा रस्ता बिघडला । तारांचे खांब भूमिला । बाहेरची बातमी समजेना, बंदी डाकेला ॥ जगलेले लोक मग दुवा देती कोणाला ? । जो गेला त्यांच्या मदतीला । तो धन्य धन्य हो झाला ! । कोणी केली मदत दीनाला सांगतों तुह्मांला ॥ कुमार धैर्यशीलराव आले स्वतः मदतीला ॥ दिलदारपणा हाच योग्य राजपुत्राला ॥ सरदार मुजुमदार दाजीसाहेब तांबे त्या वेळा ॥ माणिकराव, अभ्यंकर आले साह्य देण्याला ॥ नारायणगुरुंच्या तालमी, माणिकरावांचा व्यायाममेळा ॥ ब्रह्मपुरीमंडळ ही आलं हात देण्याला ॥ हरिभक्ति, महाजन देती अन्नदानाला ॥ आणी किती आले मदतीला । कसं सांगुं त्यांच्या गणतीला । किती खूप यत्न जरि झाला । तरि थोडा पडला त्या वेळा ।





किती लोक मुकला प्राणाला । एक गांवचा हिशेब हा झाला । असे किती गांव सिंधूला । गेले वाहून ठाव कोणाला ? । गुरंढोरं मुकलीं प्राणाला । गांवच्या गांव वाहून गेला ! । चाळीस हजार बेकार झाला । असा आला दैवाचा घाला । याचा विचार दादांनों ! केला पाहिजे तुह्मांला ॥ चाल ॥ असा झाला ईश्वरी कोप । दैवी संताप । केलं काय पाप । समजेना, झाला घोर प्रकार । आतां तुह्मी सांगा काय देणार । गप्प मुंबईला काय बसणार ? ॥ २ ॥

—: ३ :—

**परीक्षेचा** काळ हा आला । सोडा स्वार्थाला । द्यावं उदारपणें धर्मकार्याला । गरीबाचा दुवा तुह्मांला । दीनदुबळ्याला द्यावं मदतीला । घ्यावं पुण्याला ॥ ते आपलेच भाईबंद, नित्यसंबंध, । एक गोविंद । सांभाळ देव तोच करणारा । दोघांचा नित्य हो झाला । दया भूताला । दाखवुन गेला । प्राणि मुक्तीला ॥ चाल ॥ मदतीस नाहीं जर गेला । चाळीस हजार बेकार झाला । खास जी ॥ काळ हा कठिण बहु आला । धर्मावर येईल घाला । घोर जी ॥ चाल ॥ दानास योग्य हा काळ । झाले घायाळ । बंधु, सांभाळ । भाळशी स्वार्थी । तरि येईल संकट आतां । घोर

जी ॥ जरि एक हात:हा तुटला । वेदना सर्व अंगाला । लागती ॥ पाहुनिया परदुःखाला । जो दुःखी आपण झाला । धन्य जी ॥ जरि घाला गुजराथेला । मुंबईला झटका आला । पाहिजे ॥ चाल ॥ जपण्यास हिंद–लोकांस । हिंद–देशास । हिंद–धर्मास । सिद्ध हो वीरा । दीनांचा पालनवाला । आज जी ॥ आधींच हिंदुधर्म रोडला । अन् त्यांत आली असली पीडा । घारीच्या देखीनं सारा चोर हो बसला ॥ सापाच्या दातानं सज्ज झाला चावायला ॥ वाघाच्या जबड्यानं बसला लोक गिळण्याला ॥ विषाच्या जहरीनं बसला ठार करण्याला ॥ देऊं नका वाव हो त्याला । जसं मास लावलं गळाला । अन् मग मासा त्यांत आडकला । त्यानं चिरलं त्याच्या नरड्याला । असले लोक घालतिल घाव, चला मदतीला ! ॥ चाल ॥ ही संधि आज तुह्मांस । आली हो खास । दानधर्मास । हिंदूनों ! धांवा आतां मदतीला । नाहींतर कालिमा आला । आपल्या नांवाला । विनवि तुह्मांला ॥ ३ ॥

ॐ पूर्णमदः पूर्णमिदं पूर्णात्पूर्णमुदच्यते ।
पूर्णस्य पूर्णमादाय पूर्णमेवावशिष्यते ॥
ॐ शान्तिः शान्तिः शान्तिः ॥

समाप्त.



# पोवाड्यांतील कथानकें.

## १ तानाजी.

**एके** दिवशीं जिजाबाई शिवाजीला म्हणाली, " शिवा ! जोंपर्यंत कोंडाणा किल्ला तुझ्या स्वाधीन झाला नाहीं तों पर्यंत तुझ्या राज्याला बळकटी येणार नाहीं. माघ व० ९ च्या आंत तो किल्ला जर सर करशील तरच तूं खरा शूरवीर ! नाहींतर तूं असलास काय अन् नसलास काय मला सारखेंच. " शिवाजीनें तशी प्रतिज्ञा केली.

त्यावेळीं शिवाजीचा उजवा हात तानाजी उमराठें गांवीं होता. तेथें शेलारमामाच्या सांगण्यावरून त्यानें आपल्या मुलाचें लग्न ठरविलें व लग्नाचा मुहूर्त दैवयोगें माघ व. ९ चाच धरला ! शिवाजी महाराजांना लग्नाची अक्षत देण्यासाठीं तानाजी मामासह राजगडला गेला तेव्हां तेथें त्याला सर्व हकीकत समजली. नंतर तानाजीनें मुलाचें लग्न रहित करून कोंडाण्याच्या मोहिमेवर जाण्याचें ठरविलें.

त्याच सुमारास कोंडाण्याचा घेरेसरनाईक रायाजी याच्या मुलीचें लग्न होतें. तानाजी गोंधळ्याचा वेष करून तेथें गेला व त्यानें मोठ्या कौशल्यानें रायाजीला वश करून घेतलें व तो वीर परत फिरला.

नंतर फौज घेऊन सूर्याजीस येण्यास सांगून बरोबर पांच पन्नास लोक घेऊन तानाजी तडक निघाला. रात्रींच्या वेळीं **येशवंती** नांवाच्या घोरपडीच्या साहाय्यानें तानाजी किल्ल्यावर चढला व तेथें त्यानें धुमाकूळ माजविला. सूर्याजी वेळवर येऊन पोहोंचला नाहीं. त्यामुळें तानाजीचे सारे लोक कांटले गेले. शेवटीं तानाजी व उदयभानु यांची लढाई झाली आणि त्यांत तानाजी ठार झाला !

कांहीं वेळानें सूर्याजी वर येऊन पोहोचला तेव्हां त्याला आपल्या भावाच्या मरणाची हकीकत समजली. तरी त्यानें धीर न सोडतां घन-

घोर युद्ध केलें व शत्रूचा पराभव करून किल्ल्यावर भगवा झेंडा फडफडविला !

अशा रीतीनें **गड** हस्तगत झाला खरा, पण **सिंह** मात्र गेला ! तेव्हांपासून त्या किल्ल्याला ' **सिंहगड** ' हें नांव पडलें.

## २ बाजीप्रभु.

**अफझलखानाचा** वध झाल्यावर विजापुरचा बादशाहा व इतर अमीर उमराव भयभीत झाले. अफझलखानाचा मुलगा फाझलखान एके दिवशीं झोंपला असतां त्याला स्वप्नांत अफझलचें मुंडकें दिसलें. तें मुंडकें त्याला म्हणालें, " फाझल ! त्या शिव्याचें मुंडकें कांपून आणून विजापुरच्या वेशीला टांगशील तरच तूं खरा पुत्र ! " फाझल या कामाला तयार झाला व या कामगिरीवर अदिलशाहाच्या अनुमतीनें **फाझल** व **शिद्दी जोहार** निघाले. त्यानीं पन्हाळगडच्या किल्ल्यांत शिवाजीमहाराजांना कोंडण्यासाठीं त्या किल्ल्याला वेढा घातला. वेढा बराच दिवस पडल्यानें किल्ल्यांतील दाणा गोटा संपूं लागला तेव्हां महाराज शिद्दी जोहाराकडे गेले व त्यांनीं सर्व मुलूख परत देण्याचें कबूल केलें. व इतर कांहीं गोष्टी करून महाराज किल्ल्यावर परत गेले.

या सर्वाचा परिणाम म्हणजे पहारा ढिला झाला व महाराज रात्रौ किल्ल्यांतून निसटून गेले !

महाराज गेल्यावर त्यांना पकडण्यासाठीं शत्रुसेना त्यांच्या मागें लागली. गजाखिंडीपर्यंत महाराज येऊन पोहोचले इतक्यांत शत्रु-सैन्यही अगदीं नजीक येऊन ठेपलें. तेव्हां **बाजीप्रभु** दबा धरून त्या खिंडींत कांहीं मावळ्यासह राहिला व शिवाजीमहाराज विशाळगडाकडे निघून गेले. सुखरूपपणें विशाळगडीं पोहोंचल्यावर ती बातमी बाजी-प्रभूस समजावी म्हणून पांच तोफा उडविण्याचा संकेत ठरलेला होता.





फाजलखान त्या खिंडीपर्यंत येऊन पोहोंचला पण तेथें त्याला बाजीप्रभूनें अडवून धरलें ! लढाई बराच वेळ चालली. शेवटीं बाजी-प्रभूला एक गोळा लागला व तो वीर घायाळ होऊन खिंडींत कोसळून पडला. पण त्याचा प्राण जाईना ! तो वीर तशा स्थितींतही माव-ळ्यांना उत्तेजन देत होता. बाजीचे प्राण कासावीस होऊं लागले पण ते प्राण इतक्यांत कुडी टाकून जाऊं शकत नव्हते. इतक्यांत तोफांचा धडाका बाजीच्या कानीं येऊन आदळला व त्या वीरानें तेथें प्राण सोडला. अशा रीतीनें ती खिंड **पावन** झाली म्हणून तिला **पावन-खिंड** हें नांव पडलें !

## ३ संभाजीमहाराज.

**श्री शिवाजीमहाराज** दिवंगत झाल्यानंतर अवरंगजेबाला असें वाटलें कीं आतां आपण दक्षिणेंत जावें आणि मराठ्यांचें राज्य पार नाहींसें करावें ! असा बेत करून बादशाहा स्वतः दक्षिणेंत स्वारीवर आल्यावर त्यानें अदिलशाही व कुतुबशाही यांचा अंत केला, व मराठी-राज्य जिंकण्यासाठीं मोहिमेवर तुळापुरीं छावणी टाकून राहिला.

त्यावेळीं संभाजीमहाराज राज्य करीत होते. संभाजीमहाराजानीं शत्रूशीं सारखा सामना सुरूं ठेवला व लहान मोठ्या अशा एकूण एकवीस लढायांत यश मिळविलें. विश्रान्ति घेण्यासाठीं संगमेश्वराला जाऊन राहिले तेव्हां तकलीफखानानें फितुरीशस्त्राचा अवलंब करून महाराजांना कैद केलें आणि त्यांना तुळापुरीं बादशाहाच्या छावणीकडे नेण्यांत आलें !

ही बातमी जेव्हां राजाराम महाराजांना कळली तेव्हां त्यांना अत्यंत त्वेष आला ! नंतर अपरंपार फौज घेऊन राजाराम महाराज आपल्या भावाला सोडविण्यासाठीं निघाले.

संभाजीला पकडून आणल्यानंतर बादशाहा आपल्या मुलीला म्हणाला, " मुली ! या मराठ्यांच्या सिंहाला ठार करून सारा मराठा मुलुख काबीज करावा असा माझा बेत आहे. हा बेत तुला कसा काय आवडतो तें सांग. " पण त्या राजपुत्रीनें उलट तसें केल्यास भयंकर अनर्थ ओढवेल असें सांगितलें. पण बादशाहाला तिचें म्हणणें पटलें नाहीं.

नंतर संभाजीमहाराजांना बद्ध करून बादशाहापुढें नेण्यांत आलें. धर्मान्तर केल्यास बरें, नाहींतर शरीराचे तुकडे करण्यांत येतील असें बादशाहानें संभाजीमहाराजांना सांगितलें. पण संभाजीनें बादशाहाच्या म्हणण्याला रुकार दिला नाहीं. त्यामुळें अमानुषपणें संभाजीचा वध करण्यांत आला !

इकडे राजाराम महाराज तुळापुरीं येऊन पोहोंचले; पण आदल्या दिवशींच संभाजीचा वध झाला होता. त्यामुळें त्यांना अत्यंत वाईट वाटलें. नंतर संभाजीमहाराजांचें अंत्य दर्शन घेण्यासाठीं जेथें त्यांचें शव नेऊन टाकलें होतें तेथें सर्व मंडळी गेली ; आणि महाराजांच्या शवाला अग्निसंस्कार करण्यांत आला.

पुढें सर्व मराठे एकछत्राखालीं गोळा झाले व त्यांनीं शत्रूला नामोहरम करण्याचा सपाटा चालविला. खुद्द बादशाहाच्या तंबूवर हल्ला करून धनाजी जाधवानें शाहाच्या तंबूचा सोन्याचा कळस कापून नेला ! पुढें नैराश्यामुळें आणि वार्धक्यामुळें ग्रस्त झालेला राजकारण धुरंधर असा महापराक्रमी बादशाहा नगर मुक्कामीं परलोकवासी झाला. आणि त्याची मराठीराज्य नेस्तनाबूत करण्याची मनीषा अपुरीच राहिली !

## ४ सती लक्ष्मीबाई.

**मोरोपंत तांबे** या नांवाचे एक गृहस्थ पेशव्यांचे आश्रित होते. त्यांना **मनुबाई** नांवाची एक मुलगी होती तिचें लाडकें नांव **छबेली**





असें होतें. छबेली अत्यंत सुस्वरूप होती. तिचें लहानपण नानासाहेब पेशवे व रावसाहेब पेशवे यांच्या सहवासांत गेल्यामुळें या दोघांच्या बरोबरच तिलाही मर्दानी खेळांचें शिक्षण मिळालें. मुलगी सात आठ वर्षांची झाल्यावर तत्कालीन रीतीप्रमाणें तिचा विवाह झांशीचे राजे गंगाधरपंत पारोळेकर, ( यांना नेवाळकर असें ही म्हणत असत. यांचें टोपण नांव बाबासाहेब असें होतें ) यांच्याशीं झाला. नंतर छबेलीचें नांव **लक्ष्मीबाई** असें पडलें.

लक्ष्मीबाईला एक पुत्र झाला होता; पण तो अल्पवयीच ठरला. बाबासाहेबांनीं वृद्धापकाळीं **आनंदराव** या नांवाच्या मुलाला दत्तक घेऊन त्याचें नांव **दामोदरराव** असें ठेवलें. दामोदररावांचें वय तेव्हां सहा सात वर्षांचें असेल.

या दत्तक मुलाला राज्य देण्याच्या ऐवजीं कंपनी सरकारनें झांशीचें संस्थान खालसा केलें. त्यामुळें राणीला अत्यंत वाईट वाटलें. पण ती अबला काय करणार ? लवकरच १८५७ साल उजाडलें. त्यासालीं काळ्या पलटणी बिथरल्या व त्यांनीं देशभर धामधूम सुरू केली. झांशी गांवावर चढाई केली व पुन्हां त्यांनीं लक्ष्मीबाईच्या नांवाचा डंका गांवभर केला. यानंतर सरासरी नऊ महिने झांशी संस्थान राणीच्या हुकमतीखालीं होतें. तेवढ्या अवधीनंतर सर् ह्यू रोज यानें पुष्कळ सैन्य घेऊन झांशी गांवाला वेढा दिला व राणीला निरोप पाठविला कीं, " बाईसाहेब ! तुम्हीं बंडखोर आहांत. ताबडतोब शरण याल तर ठीक ; नाहीं तर तुम्हां सर्वांना तोफेच्या तोंडीं देऊं व झांशी गांव जमीनदोस्त करूं. "

त्या वीर स्त्रीला हा निरोप अर्थातच झोंबला आणि तिनें लढाईची तयारी केली. तुमुल युद्ध सुरू झालें. दहाव्या दिवशीं **तात्या टोपे** राणीच्या मदतीला आला; पण किल्ल्यांत फितुरी झाल्यामुळें तात्याचा

पराभव झाला. राणीला जेव्हां तेथें निभाव लागत नाहीं असें वाटलें तेव्हां तिनें हातांत जळती मशाल घेतली व दारूच्या कोठारांत शिरून आपल्याला जाळून घेण्यासाठीं ती दारूच्या कोठारांत शिरली. आगभडका करणार इतक्यांत सरदार रामचंद्रराव तेथें आले व त्यानीं राणीला त्या घोर कर्मापासून परावृत्त केलें. पुढें राणी रात्रींच्या वेळीं किल्ल्यांतून निसटून गेली ती थेट काल्पीला जाऊन पोहोंचली. पण इकडे झांशीगांवांत शिपाईलोक शिरले व त्यांनीं अनन्वित कृत्यें केलीं !

राणी काल्पीला गेली पण तेथें ही पेशवे व राणी यांचा पराभव झाला ! नंतर सर्व मंडळी ग्वालेरला गेली. तेथें शेवटची लढाई झाली. त्या लढाईत पाण्याचा पाट ओलंडत असतां राणीचा घोडा बुजला ! तेथें जो घोर संग्राम झाला त्यांत ती वीर स्त्री धारातीर्थी पडली.

## ५ प्रतापगड !

**चंद्रराव मोरे** ठार करून त्याचा **जावळी** प्रान्त, व वाई व कऱ्हाड हे सुभे महाराजांनीं आपल्या मुलखाला जोडले, ही बातमी विजापूरला वज्रासमान येऊन थडकली ! महाराजांचें पारिपत्य करणें आवश्यक होतें. त्यासाठीं अफझुलखानानें पैजेचा विडा उचलला व फौज घेऊन शिवाजीमहाराजांना ' जिता-मेला ' धरण्याचा संकल्प करून विजापुराहून तो निघाला. वाटेंत त्यानें अनेक अनर्थ केले व मजलदरमजल करीत तो वाईला येऊन पोहोचला. शिवाजी महाराज त्यावेळीं प्रतापगडीं होते. एके दिवशीं महाराज आपल्या मित्र मंडळीसह प्रतापगडावर बसले असतां एक हेर आला व अफझलखानाच्या आगमनाची बातमी त्यानें त्यांना दिली. महाराज ही पुढच्या बंदोबस्तास लागले.

वाईस पोहोंचल्यावर खानानें **कृष्णाजी भास्कर** नांवाच्या आपल्या वकिलाबरोबर " बादशाहाचा सारा मुलुख परत द्यावा आणि





या वजिराची भेट घ्यावी; व जर हें तुम्हांस पसंत नसेल तर जीवाची आशा धरूं नये " असा निरोप महाराजांना पाठविला. महाराजांनीं त्या वकिलाला अंबेच्या देवळांत नेऊन, त्याला देवीची शपथ घालून खानाचा अंतःस्थ बेत काय आहे तें सांगण्याची विनंति केली. कृष्णाजी भास्कर वश झाला आणि त्यानें " आपणांस जिता-मेला धरण्याची प्रतिज्ञा करून खान आला आहे " असें सांगितलें.

नंतर शिवाजी महाराजांनीं **पंताजी गोपिनाथ** नांवाच्या आपल्या वकिलाबरोबर असा निरोप पाठविला कीं, " अदिलशाहाचा मी अपराध केला आहे; सारा मुलुख परत करतों, आपलें मला अतिशय भय वाटत आहे तेव्हां आपणच भेटीला यावें. " कृष्णाजीनें शिवाजी कसा भयभीत झाला आहे वगैरे वर्णन केलें व आपणच भेटीला जावें असा सल्ला खानाला दिला. खानाला वाटलें कीं शिवाजी तो काय ! सहज त्याला दाबून मारूं ! असा बेत करून **पसरणीच्या** घाटावरून खान प्रतापगडाकडे चालला.

इकडे खानाची भेट घेण्यासाठीं महाराजांनीं अतिशय सुंदर मंडप सजविला. खान प्रतापगडाजवळ आला पण तो सशस्त्र आला. तेव्हां शिवाजीनें पुन्हां निरोप पाठविला कीं " आपण एकटेच याल तर भेट घेण्याचें धाडस मी करीन. मी ही एकटाच येतों. " खानाला अतिशय आत्मविश्वास असल्यामुळें खान एकटाच एक नोकर घेऊन भेट घेण्यास मंडपांत दाखल झाला.

इकडे महाराजांनीं जगदंबेची पूजा केली व तिचा निरोप घेतला. तसेंच, न जाणों, कांहीं जिवाला धोका झालाच तर घोंटाळा होऊं नये म्हणून त्यांनीं राज्याची निरवानिरव केली, मावळ्यांचा निरोप घेतला, ठाई ठाई मावळे तय्यार ठेवले व महाराज भेटीच्या मंडपांत दाखल झाले.

भेट घेत असतां खानानें महाराजांचें डोकें आपल्या बगलेंत दाबलें त्या सरशीं महाराजांनीं वाघनखें खुपसून खानाचा प्राण घेतला.

## ६ शिवप्रतिज्ञा.

**एकदां शिवाजी** विजापुरीं आपल्या वडिलांच्याकडे राहण्यास गेला असतां तेथें त्यानें एक खाटीक गायीला मारण्याच्या बेतांत आहे असें पाहिलें; पण लगेच बाल शिवाजी तेथें धांवून गेला आणि त्यानें त्या खाटकाला शिक्षा केली. पण त्यामुळें शिवाजीला वाईट वाटलें आणि विजापूर सोडून तो पुणेंप्रान्तीं जाऊन राहिला.

तेथें गेल्यावर शिवाजीनें सर्व मावळ्यांचीं मनें काबीज केलीं. भोर संस्थानांत रोहिडा म्हणून एक खोरें आहे. त्या खोऱ्याचे देशपांडे **नरस प्रभु** ( वय सुमारें ८० ) व त्यांचा मुलगा **दादाजी** ( वय सुमारें ४० ) हे दोघेही त्याला वश झाले.

रोहिडा खोऱ्यांत रोहिडा याच नांवाचा एक डोंगर आहे त्या डोंगरावर रोहिडेश्वराचें इतिहासप्रसिद्ध जुनें शिवमंदीर आहे.

एके दिवशीं मावळ्यांची परीक्षा करण्यासाठीं शिवाजीनें सर्व मावळे त्या मंदीरांत जमविले व तेथें त्यांच्याकडून 'हिंदवी-स्वराज्य' स्थापन करण्याची प्रतिज्ञा करविली. त्या जमलेल्या लोकामध्यें एक देश-द्रोही होता! त्यानें घडलेली सर्व हकीकत विजापुराला कळविली. तो मनुष्य म्हणजे नरस प्रभूंचा जावई बाळाजी हाच होय!

एके दिवशीं बाळाजीनें आपण विजापुरीं सर्व हकीकत कळविलेली गोष्ट आपल्या बायकोला सांगितली व तो तिला म्हणाला, "प्रिये! काय ग! तुझ्या बापाला म्हातारचळ लागलाय वाटतं! शिवाजी म्हणे राज्य स्थापणार आणि हे म्हणे त्याला मदत करणार! ही गोष्ट कधींतरी शक्य होईल काय? असो! ही सर्व बातमी मी विजापुरीं





दिली आहे. आतां बादशाहा खूष होईल व मला सुभेदारी देईल; मग तूं ही सुभेदारीण होशील बरं!"

हे शब्द ऐकून तारामती फार संतप्त झाली. तिनें पतिराजाचा उपहास केला व केली ही गोष्ट अत्यंत वाईट केली असें सांगितलें.

विजापुरच्या बादशाहाला बाळाजीचा लखोटा पोहोंचल्यावर बाद-शाहानें नरसप्रभूंना लिहिलें, "नरस प्रभु! तुम्ही बंडखोर आहांत म्हणून आम्ही तुमची जाहगीर जप्त केली आहे; व आठ दिवसांत शरण न याल तर तुम्हां सर्वांना ठार करूं या गोष्टीचा विचार करा."

नरसप्रभूंना तो लखोटा मिळाल्यावर त्यानीं तो वाचला व त्यांना क्षणभर वाईट वाटलें. नरसप्रभु दररोज रोहिडेश्वराची पूजाअर्चा केल्याशिवाय अन्नग्रहण करीत नसत. लखोटा आला तेव्हां ते शंकराची पूजा करीत बसले होते. त्यानीं तेथेंच सात दिवस शंकरावर अनुष्ठान करण्याचें ठरविलें.

नंतर दादाजीला नरसप्रभूची गांठ घेतल्यावर सर्व हकीकत कळली. पुढें त्याला हा सर्व प्रकार कोणी केला तें समजलें व त्यानें बाळाजीला बद्ध केलें, आणि रोहिडेश्वराच्या मंदिरांत बाळाजीला घेऊन दादाजी गेला.

इकडे शिवाजी महाराजांनाही ही गोष्ट समजली होती; तेव्हां ते ही नरसप्रभूंना भेटण्याला रोहिडेश्वरीं जाण्यास निघालेच होते.

तो अनुष्ठानाचा सातवा दिवस होता. ते दिवशीं दादाजी, बाळाजी, शिवाजी वगैरे मंडळी त्या मंदिरांत जमली. तेव्हां दादाजीनें शिवाजी महाराजांना व नरसप्रभूंना सर्व हकीकत सांगितली व अशा मनुष्याला देहान्तशासन हेंच योग्य आहे असें सांगितलें: पण शिवाजी महाराजांनीं त्याला बंधमुक्त केलें आणि चार उपदेशाच्या गोष्टी सांगून त्याला आपल्या कार्यास जोडून घेतलें.

## ७ मुरारबाजी.

**शिवाजी महाराजांनीं** शाहिस्तेखानाची धुळदाण उडविली त्यामुळें अवरंगजेब मोठा कष्टी झाला. नंतर महाराजांचें पारिपत्य करण्यासाठीं बादशाहानें मिर्झाराजा जयसिंग व दिलीरखान या दोघा सरदारांना दक्षिणेंत पाठविलें. विजापूरच्या दरबारानें, त्याचप्रमाणें दुसऱ्या बऱ्याच हिंदू सरदारांनींसुद्धां जयसिंग–दिलीरखानांना या प्रसंगीं मदत केली !

जयसिंग जरी स्वारीवर आला होता तरी त्याला शिवाजी महाराजांच्या प्रतापाची कल्पना होती; म्हणून लढाईच्या भानगडींत न पडतां जमल्यास तह करून मोहिमेचें यश घ्यावें असा त्याचा विचार होता; शिवाय तो अंतस्थरीतीनें महाराजांच्या उद्योगांना अनुकूल होता. म्हणून त्यानें महाराजांना योग्य असा सल्ला दिला व शत्रुसेना बलाढय असल्यामुळें तह करणें हें आवश्यक आहे असें त्यानें महाराजांना कळविलें. महाराजांनीं ही पण काळवेळ पाहून तह करण्यास तयारी दर्शविली. पण दिलीरखानाला हें जयसिंगाचें वर्तन पसंत पडलें नाहीं; आणि तो पुरंदरचा किल्ला घेण्यासाठीं चालला, व त्यानें पुरंदराला वेढा घातला.

त्यावेळीं पुरंदरगडाचें संरक्षण **मुरारबाजी** करीत होता. त्यानें नानातऱ्हेचे वेश धारण करून शत्रूला सतावून सोडलें; पण शत्रुसेना अफाट असल्यामुळें त्याचा फारसा उपयोग झाला नाहीं. पुरंदराला लागूनच एक **वज्रगड** नांवाचा किल्ला आहे. तेथील अधिकारी, बाबाजी बोवाजी व यशवंतराव बोवाजी, हे ठार झाल्यानंतर तो किल्ला शत्रूच्या स्वाधीन झाला. नंतर दिलीरखानानें वज्रगडावर तोफा चढविल्या व तेथून त्यानें पुरंदरगडाच्या तटावर भीषण मारा सुरूं केला. त्यासरशी त्या किल्ल्याचे बुरुज धडाधडा कोसळूं लागले.

अशा आणीबाणीच्या प्रसंगीं मुरारबाजी आपल्या प्रिय पत्नीला म्हणाला, " प्रिये ! अशा वेळीं जगण्यापेक्षां मरणें मला आवडतें; पण





तुझा प्रिय असा प्रेमपाश मला बाधून टाकीत आहे. " भार्येनें त्याला प्रेमपाश तोडून टाकून कर्तव्यकर्म करण्यास प्रोत्साहन दिलें व तो वीर किल्ल्याखालीं चालला.

मुरार व दिलीर यांची गांठ पडली. दिलीरच्या मोहक शब्दाला मुरार बळि पडला नाहीं. दोघांचा संग्राम झाला त्यांत मुरारबाजीचें शिरकमल धडापासून वेगळें झालें !

मावळ्यांनीं मुरारच्या शरीराचे तुकडे किल्ल्यावर नेले व ते त्याच्या प्रियपत्नीपुढें ठेवले ! साध्वीला अतिदुःख झालें पण तिनें धीर धरून हातांत तलवार घेतली व पळत सुटलेल्या मावळ्यांना पुन्हां लढाईला प्रवृत्त केलें.

दिलीरखानाला वाटलें कीं आतां स्त्री लढाई करण्यास आली आहे ! येथें पुरुषाप्रमाणें स्त्रियाही लढाई करतात ! तेव्हां तो किल्ला सर करतां येणें शक्य नाहीं असें म्हणून खान वेढा काढून निघून गेला !

मग त्या साध्वीनें पतीचें प्रेत एका पालखींत घातलें व ती साध्वी ती पालखी घेऊन रायगडकडे चालली. तेथें गेल्यावर महाराजांना अतिदुःख झालें. त्यावेळीं जिजाबाई मुरारच्या पत्नीला म्हणाली, " बाई ! तूं धन्य आहेस ! तूं आपला पतीहि धर्मकार्यास दिलास व तूं ही हातांत तलवार घेतलीस. तीनही लोकांत तुझ्या पतीचें नांव चिरकाल फडकत राहील ! "

## ८ खंडो बल्लाळ.

रायगड पडल्यानंतर राजाराम महाराज वगैरे मंडळी मराठाराज्य संकटांतून बचावण्यासाठीं कर्नाटकांत जिंजीला निघून गेली व तेथें त्यानीं मराठाराज्याची पुन्हां स्थापना केली. पण झुल्फिकिरखान रायगड काबीज करून व तेथें असलेल्या येसूबाई व तिचा पुत्र ( शाहू )

यांना कैद करून जो निघाला तो राजाराम महाराजांना धरण्यासाठीं तडक जिंजीला गेला आणि त्यानें त्या किल्ल्याला वेढा दिला.

सात वर्षेपर्यंत तो वेढा तसाच बसला होता. तितक्या अवधींत धनाजी जाधवानें पुन्हां मराठा मुलुख मोंगलांच्या तावडींतून सोडविला आणि जिंजीच्या किल्ल्यापासून जवळच दहा पंधरा मैलावर येऊन छावणी टाकून बसला; आणि त्यानें किल्ल्यांत असा निरोप युक्तिप्रयुक्तीनें पाठविला कीं कोणीतरी किल्ल्यांतून त्याच्या भेटीला लवकर जावें.

त्यावेळीं किल्ल्यांत खंडोबल्लाळ वगैरे मंडळी होती. मोठ्या मनुष्यास शत्रु पकडून ठेवतील म्हणून खंडोजीनें आपला सतरा अठरा वयाचा मुलगा **बहिरोजी** याला तिकडे धनाजीची भेट घेण्यांस पाठवून दिलें. चार आठ दिवस झाले, तरी मुलगा परत येईना असें पाहून आपल्या मुलाला शत्रूनें खास मारलें असावें असें खंडोजीला वाटलें व स्वतः च दुसरे दिवशीं वेष पालटून किल्ल्याबाहेर चालला. पण दैव अनुकूल नसल्यामुळें तो शत्रूच्या हातीं लागला. खानानें त्याला एका भुयारांत कोंडून त्याच्या हातापायांत साखळदंड आडकविले.

ते दिवशीं खान त्या भुयारांत गेला व त्यानें " तुझें नांव काय? कोण तूं ? " असें खंडोजीला विचारलें. पण खंडोजीनें आपलें नांव न सांगितल्यामुळें खानानें त्याला बेदम मारलें व " दहा दिवसांत नांव सांगशील तर ठीक ! नाहींतर विस्तवाच्या भट्टीवर तुला भाजून काढीन " असें सांगून खान निघून गेला.

इकडे धनाजीचा निरोप घेऊन बहिरोजी आला तों आपल्या पित्याला भुयारांत ठेवलें आहे असें त्याला कळलें. नंतर तो तडक भुयारांत गेला. तेथें पितापुत्रांची भेट झाली. तेव्हां बहिरोजीनें बापास





सांगितलें कीं " बाबा ! असा असा धनाजीचा निरोप आहे. अशा आणीबाणीच्या प्रसंगीं तुम्ही भुयारांतून निघून जा, मी येथें तुमच्या जागेला राहतो." आपल्या प्रियपुत्राला विकाळ काळाच्या तोंडांत लोटून कोणता बाप निघून जाईल ? खंडोजी म्हणाला, " बाळ ! अजून तुझें वय फार कोंवळें आहे; तूं तुझ्या आईचा फार लाडका आहेस; तुझ्याकडून इथले हाल कसे सहन होतील ? तेव्हां तूं च निघून जा. "

शेवटीं पुत्राच्या अत्याग्रहावरून खंडोजी तेथून निघून गेला.

दोन तीन दिवसानंतर खान एकदा त्या भुयारांत गेला. तेव्हां तेथें त्याला तो मुलगा दिसला. त्या मुलानें खानाला सर्व हकीकत सांगितली तेव्हां खानाला अत्यंत राग आला. त्या रागाच्या भरांत खान त्या मुलाला म्हणाला, " दोन दिवसाची मुदत तुला देतों. तेवढ्या अवधींत जर धर्मान्तर करशील तर ठीक; नाहींतर तिसरे दिवशीं सकाळीं तुला जुलमानें धर्मान्तर करावें लागेल; नाहींतर मरावें लागेल." असें बोलून खान तेथून निघून गेला.

इकडे खंडोजी जो भुयारांतून निघाला तो थेट किल्ल्यावर जाऊन पोहोचला. नंतर त्यानें खालीं शिर्क्यांच्या छावणींत जाऊन त्यांना वश करण्याचें ठरविलें. त्याप्रमाणें रात्रींच्या वेळीं बुरुजावरून खालीं शिर्क्यांच्या छावणींत उतरूं लागला; इतक्यांत शिर्क्यांनीं एक बाण सोडला तो खंडोजीच्या पायांतून घुसून पार निघून गेला; त्या सरशीं खंडोजी धाडकन् जमीनीवर पडला तो शिर्क्यांच्या समोर. नंतर शिर्के व खंडोजी यांचा संवाद झाला तेव्हां खंडोजीनें शिर्क्यांना वश करून घेतलें.

नंतर मोठमोठे पाळणे आणविले व त्या पाळण्यांतून राजाराम वगैरे मंडळी बसली व रात्रौ बुरुजावरून उतरून पार धनाजीच्या छावणीकडे निघून गेली.

तेथें गेल्यावर खंडोजीनें राजाराम महाराजांना साताऱ्यास धनाजी बरोबर जाणेस सांगितलें व स्वतः मुलास भुयारांतून सोडविण्यासाठीं परत जिंजीस जाण्यास निघाला. अर्थात् राजाराम महाराजांना ही गोष्ट पटली नाहीं आणि सर्व मंडळी पुन्हां जिंजीवर हल्ला करण्यास निघाली.

जिंजीवर पुन्हां जोराचा हल्ला करून तो किल्ला मराठ्यानीं सर केला; भुयाराचीं कुलुपें काढलीं व खंडोजी बहिरोजीला सोडविण्यासाठीं भुयारांत शिरला. खंडोजीनें बहिरोजीच्या अंगाला हात लावला तेव्हां बहिरोजीनें त्याचा हात झिडकारला; बहिरोजी म्हणाला, "कोण ! कोण माझ्या अंगाला हात लावतयं ? " असें म्हणून बहिरोजीनें हिरकणी चटकन् खाल्ली. जेव्हां त्याला कळलें कीं आपल्याजवळ खंडोजी आला आहे तेव्हां तो म्हणाला, " अरे ! रे ! बाबा ! आतांच मी विष खाल्लें. आतां मी मरणार. बाबा ! आईला तुझा मुलगा गेला असें सांगा." असें म्हणून त्या मुलानें आपला प्राण सोडला !

## ९ सिन्धुग्रहण.

**दाहर** नांवाचा एक महापराक्रमी राजा इ. स. ७१२ च्या सुमारास सिंधप्रान्तावर राज्य करीत होता. त्याची **देबाल** नांवाची राजधानी सिन्धु नदीच्या पश्चिम तीरावर होती. त्याला **बाई** नांवाची एक बायको व जयसिंग नवाचा एक मुलगा होता.

एके दिवशीं अरबी समुद्र फार खवळला व त्यामुळें कित्येक गलबतें समुद्रांत पार बुडून गेलीं. जीं कांहीं दोनचार वांचलीं तीं सिंधु नदींतून वर सरकत सरकत देबाल बंदराला येऊन लागलीं. गलबतें सोन्यारुप्यानीं व इतर जडजवाहीरांनीं भरलेलीं होतीं त्यामुळें साहजिकच चांचेलोकांचें लक्ष्य तिकडे गेलें व त्यांनीं तीं जाहजें लुटून फस्त केलीं व त्यांत असलेल्या अरब व्यापाऱ्यांना कैद करून ठेवलें.





ही बातमी बगदादला गेली तेव्हां खलीफाला मनस्वी राग आला आणि त्यानें दाहरला या कृत्याचा जाब देण्यास कळविलें. पण यांत दाहराचें कांहींच अंग नसल्यामुळें त्यानें " आपणास ही गोष्ट माहीत नाहीं. चांचेलोकांनीं हा प्रकार केला असावा " असें उत्तर दिलें.

या उत्तरानें खलीफाचें समाधान झालें नाहीं आणि त्यानें महमद कासीम नांवाच्या आपल्या अधिकाऱ्याला सिन्ध देशावर स्वारी करण्यास पाठविलें.

कासीम बरीच फौज घेऊन आला आणि त्यानें देबाल नगराला वेढा घातला.

त्यावेळीं बुद्ध धर्माचा प्रसार बहुत झाला होता त्यामुळें लोकानीं वीरवृत्ति जवळ जवळ संपूर्णपणें टाकली होती.

राजानें लोकांना लढाईस तयार होण्यास सांगितलें पण बऱ्याच लोकांनीं हिंसेचें पाप लागेल म्हणून लढाई करण्याचें नाकारिलें ! दाहराला असली भ्याडवृत्ति पसंत नसल्यामुळें, पण देबाल नगरांत भरपूर साहाय्य न मिळाल्यामुळें राजा नगरांतून निसटून गेला व त्यानें झीम प्रान्तांत लढाईची तयारी केली.

कासिमनें देबाल गांव सर केलें, तेथील लोकांचीं अमानुषपणें कत्तल केली, स्त्रियांना भ्रष्ट केलें व बरीच लूट केली. नंतर दाहराशीं सामना देण्यासाठीं तो झीम प्रान्तांत उतरला. तेथें त्याची व दाहराची घनघोर लढाई झाली. त्यांत लढाई करतां करतां दाहरच्या हत्तीला एक जळता बाण लागल्यामुळें व त्यामुळें त्याचें अंग भाजूं लागल्यामुळें हत्ती बुजला आणि त्यानें जवळच असलेल्या एका तलावांत एकदम बुडी मारली. दाहरनें कौशल्यानें अंबारींतून बाहेर पाण्यांत उडी मारली व पोहून तो कांठावर जाऊन पोंहोचला. पण तितक्यांत अरबांनीं त्याला गांठलें व त्याचें मस्तक कांपून नेलें !

नंतर जयसिंगनें लढाईस तोंड दिलें पण त्याचा ही पराभव झाला!

दाहराची बायको **बाई** राऊर गांवीं होती. तिनेंही राऊरचें दार बंद केलें आणि लढाईस तोंड देण्याचें ठरविलें. पण जेव्हां तिचा उपाय कांहीं चालेना तेव्हां तिनें गांवातल्या साऱ्या बायका आपल्या वाड्यांत जमा केल्या आणि तिनें त्या वाड्याला आग लावून दिली. हा इतिहासांतला **पहिला जोहार** म्हणून प्रसिद्ध आहे.

या सर्व मोहिमेंत ब्राह्मणाबादला दाहरच्या दोन मुली कासीमच्या हातीं लागल्या. त्यानें त्यांना बगदादला पाठविलें व खलिफानें त्यांच्याशीं निका लावला.

पुढें स्वारीसाठीं काशीम मुलतानकडे गेला असतां त्याला एक बगदादहून पत्र आलें. त्यांत असें लिहिलें होतें "कासीम, असशील तस्सा कच्च्या कातड्याच्या पेटींत बसून, पेटी बंद करून घेऊन इकडे ये." पत्र खलिफाच्या सहीचें होतें!

त्या प्रमाणें कासीमनें पेटारा तयार केला व आपण आंत बसला व पेटी बंद करविली, पण कासीम आंत गुदमरून मेला!

पेटारा बगदादला नेण्यांत आला व खलिफापुढें ठेवण्यांत आला. सर्व हकीकत खलिफाला कळली तेव्हां त्याचा राग बेफाम झाला. त्यानं नव्हता हुकुम दिला! मग हा प्रकार कसा झाला? दाहरच्या मुलींनीं खलिफाच्या सही सारखी सही करून असा लखोटा कासीमचा सूड घेण्यासाठीं पाठविला होता!

त्या मुलींना घोड्यांच्या शेंपटीला बांधून, फरफरत फरफटत मारून टाकण्यांत आलें!

## १० धाडशी शिवाजी.

शिवाजीला पकडण्यासाठीं शाहिस्तेखान बादशाहाच्या हुकुमावरनं





येण्यास निघाला. वाटेंत चाकणचा किल्ला लागला तेथें नरसाळा फिरंगोजी किल्लेदार होता. त्याला त्यानें वश करण्याचा प्रयत्न केला पण तो फुकट गेला! खानानें चाकणचा किल्ला सर केला आणि खान पुण्यावर थेट चालत आला. तेथें येऊन तो शिवाजीच्या **लालमहालांत** येऊन राहिला.

त्यावेळीं महाराज सिंहगडावर होते. आपल्या मित्रमंडळींना बोलावून त्यांच्याशीं सल्लामसलत करून महाराजांनीं एक नामी युक्ति योजिली. एका विश्वासू नोकराला पुण्यांत जाण्यास सांगून तेथें एक खोट्याच लग्नाचा घाट घालण्यास सांगितलें. व विशिष्ट वेळेला मिरवणूक गणपतीला नेण्यास सांगितलें.

ठरल्याप्रमाणें सर्व गोष्टी घडून आल्या. तेव्हां शिवाजी महाराज व इतर मंडळी वेष पालटून त्या लग्नाच्या मिरवणुकींत सामील झाली. रात्रीं अकस्मात् महाराज लालमहालांत खिडकींतून घुसून गेले. तेथें शाहिस्ताखानाच्या खोलींत जाऊन त्याच्या छातीवर बसले!

खान घाबरून गेला! खानाच्या बायकांनीं विनवणी केली म्हणून महाराजांनीं खानाला जीवदान दिलें पण शिवाजीची आठवण राहावी म्हणून त्याचीं बोटें तेवढीं छाटून टाकलीं; आणि ताबडतोब पुणें सोडून जाण्यास सांगितलें; त्याप्रमाणें भयभीत होऊन खानसाहेब पुणें सोडून निघून गेले!

## ११ आग्र्याहून दख्खन.

पुरंदरच्या तहाप्रमाणें शिवाजी महाराजांनीं मोंगल बादशाहाला मदत केली. अवरंगजेब त्या मुळें खूष झाला; पण त्याच्या मनांत हा कांटा केव्हांतरी एकदा काढावयाचाच होता. तेव्हां त्यानें या परिस्थितीचा फायदा घेण्याचें ठरविलें. अवरंगजेबानें शिवाजीस निरोप पाठविला कीं "तुमच्यावर आम्ही खूष झालों आहों; तुमचा आमचा प्रेमसंबंध कायम राखण्यासाठीं तुम्ही एकदां इकडे येणेचें करावें."

त्यावेळीं मराठाराज्याला तीन चार शाह्या–अदिलशाही, कुतुबशाही, वगैरे–झोंबत होत्या. शिवाजीला वाटलें कीं तशा परिस्थितींत बलाढ्य मोंगलाशीं तंटा न करणेंच बरें. असा विचार करून शिवाजीनें उत्तर-हिंदुस्थानांत जाणेचें ठरविलें. बरोबर निवडक माणसें घेऊन शिवाजीराजे आग्र्याला गेले. अवरंगजेबानें शिवाजीसाठीं खास **शिवपुरा** म्हणून एक निवासस्थान तयार केलें होतें व रामसिंगाला त्यानें शिवाजीच्या दिमतीला दिलें होतें.

नंतर बादशहानें दरबार भरविला व त्या समारंभास हजर राहण्यास शिवाजी दरबारांत गेला; पण तेथें त्याचा अपमान झाला त्यामुळें शिवाजी खवळला व तडक दरबार सोडून आपल्या मुक्कामस्थानीं निघून गेला !

बादशहाला काय करावें तें क्षणभर समजेना; इतक्यांत त्याची मामी आणि सून ( शाहिस्ताखानाची बायको आणि सून ) पुढें आल्या. मामी भाच्याला म्हणाली, " अवरंग ! आयता शत्रु हातीं सांपडला आहे. त्यानेंच माझ्या पतीची बोटें छाटलीं ! तरी त्याला शिवपुऱ्यांतच कोंडून ठेव. " मामीच्या सल्ल्याप्रमाणें भाच्यानें लगेच हुकूम सोडला व अशारीतीनें शिवाजी शिवपुऱ्यांत कोंडला गेला ! पांचहजार पाहरेवाले देऊन पोलादखानाला पाहऱ्यावर नेमलें.

पोलादखानानें रात्रंदिवस पाहारा खडा केला होता. पण एके दिवशीं शिवाजी व संभाजी पेटाऱ्यांत बसून निघून गेले ! !

शिवाजीमहाराजांनीं बैराग्याचा वेष केला आणि तीर्थयात्रा करीत करीत महाराज राजगडीं येऊन पोहोंचले. बालेकिल्ल्यापर्यंत गेले तेथें शिपायानें त्यांना आडवलें व " कोणी बैरागी आपणांस भेटूं इच्छीत आहे " असा निरोप त्यानें आंत धाडला. जिजाबाई दारांत आली पण तिला ओळख पटेना ! सरतेशेवटीं महाराजांनीं तिच्या पायाला





वंदन करण्यासाठीं स्पर्श केला त्यासरशीं तिला ओळख पटली व तिनें आपल्या प्रियपुत्राला घट्ट पोटाशीं आंवळून धरलें ! !

## १२ वसईचा वेढा.

कोंकणचा प्रांत जिंकून पोर्तुगीज लोकांनीं तेथील लोकांचा अनन्वित छळ केला आणि त्यामुळें लोक त्रासून गेले. साताऱ्याला जाऊन एकदा शाहूराजाला भेटावें म्हणून **गंगाजी नाईक पाठारे** आणि **अंताजी कावळे देसाई** साताऱ्याला गेले आणि त्यांनीं या जाचांतून सोडविण्याची राजाला विनंति केली. शाहूराजानें त्यांना आश्वासन दिलें व लवकरच मराठ्यांची फौज तिकडे येईल असें सांगितलें.

मराठ्यांनीं स्वारीवर निघण्याची जय्यत तयारी केली. या मोहिमेंत, मल्हारराव होळकर, शिंदे, पवार, बाजी भिवराव, रामचंद्र हरी, विठ्ठल शिवदेव वगैरे प्रमुख मंडळी होती. सैन्याचें आधिपत्य **चिमाजी आप्पा** यांच्याकडे देण्यांत आलें होतें.

मराठ्यांनीं, ठाणें, साष्टी, माहिम, बेलापूर, केळवे, मनोर, डहाणू वगैरे ठिकाणें काबीज केलीं तेव्हां फिरंगी वसईच्या किल्ल्याचा आश्रय घेऊन राहिले. वसईचा किल्ला अतिशय मजबूत असून जिंकण्यास फार अवघड आहे. दोन बाजूला समुद्र, पूर्वदिशेस दलदली जमीन, आणि रेताड मुलुख चवथ्या बाजूला–त्यामुळें तेथें धड तोफा चालत नाहींत अन् सुरंग ही लावतां येत नाहींत !

मराठ्यांचा सेनासागर वसईकडे वळला आणि त्यानें त्या किल्ल्याला घेरलें. तीन महिने सारखी झुंज चालली होती तरी फिरंगी नरम पडेनात ! तेव्हां चिमाजीला फार वाईट वाटलें आणि त्यानें एके दिवशीं सोक्षमोक्ष करण्याचा निश्चय केला. सर्व प्रमुख मंडळींना चिमाजी म्हणाला, " वीर हो ! तीन महिने झाले तरी कांहीं उपाय चालत

नाहीं ! ही गोष्ट आम्हांला अत्यंत लाजिरवाणी आहे. किल्ला जर सर होत नसेल तर निदान माझें मुंडकें कांपून तोफेच्या तोंडीं बांधून तोफ उडवा ! अशानें तरी निदान माझें मस्तक किल्ल्यांत जाऊन पडेल ! ”

आप्पाचें असें हृदयाला भिडणारें भाषण ऐकून मराठे वीर बेफाम झाले आणि त्यांनीं निकराचा हल्ला केला. त्या चढाईत फिरंग्यांचा सेनापति सिल्वेरा ठार झाला त्यामुळें शत्रुसैन्याची दाणादाण झाली. नंतर सेनापति पेरिरा शरण आला आणि विजयश्रीनें मराठ्यांना माळ घातली !

जगांच्या इतिहासांतल्या अत्यंत मर्दुमकीच्या लढायापैकीं वसईचा प्रसंग हा एक आहे.

## १३ माझा हिंदुस्थान !

या पोवाड्यांत आपण हिंदुस्थानावर कां प्रेम करावें तें सांगितलें आहे. हिंदुस्थान म्हणजे नैसर्गिक सौंदर्याचें आगर, शूरवीरांचे माहेर, साधुसत्पुरुषांचें निवासस्थान, देवादिकांचा आवडता देश, सद्‌गुणांची खाण ! आणि आपली पितृभूमि !

## १४ सुधारणा कीं कुधारणा !

आमच्या पूर्वजांपेक्षां आम्ही जास्त सुधारलेले आहों, आमचे पूर्वज आमच्यापेक्षां जास्त अडाणी, व क्रूर होते असें आपण नेहेमीं म्हणत असतो. तर हें म्हणणें बरोबर आहे कां नाहीं याचा विचार या पोवाड्यांत केलेला आहे. खरोखरीच आम्हीं सुधारलों आहों काय ? आमचा क्रूरपणा कमी झाला आहे काय ? आमचीं अंतरंगें स्फटिकासारखीं दिवसें-दिवस निर्मल होत चाललीं आहेत काय ?





## १५ लो. टिळक यांचें देहावसान !

१९२० सालीं लोकमान्यांचें देहावसान झाल्यानंतर लगेच लिहिलेला पोवाडा.

या पोवाड्यांत त्यांचें देहावसान झाल्यावर देश कसा शोकसागरांत निमग्न झाला त्याचें वर्णन केलें आहे.

## १६ श्री समर्थचरित्र.

या पोवाड्यांत श्री रामदासस्वामींचें संपूर्ण चरित्र व त्यांचे जीवन-रहस्य सारांशरूपानें ग्रथित केलें आहे.

## १७ गुजराथचा जलप्रलय.

सुमारें सात वर्षापूर्वी गुजराथेंत, विशेषतः बडोदें शहरांत व आंसपास खेड्यांतून जो प्राणान्तक जलप्रलय झाला त्याचें वर्णन या पोवाड्यांत केलें आहे.



# अर्थनिर्णायक टिपा.

## १ तानाजी.

(१) **संगरीं**–लढाईंत. **षड्रिकार**–कामक्रोधादि. (२) **चार इसावर**–ऐंशीवर्षावर. (३) **मूळ**–आमंत्रण. **हेजिब**–जासूद. **सकून**–शकून. **सुभ**–शुभ. **म्होरें**–सामोरें. (४) **क्षेम**–कुशळ समाचार. **धालें**–संतुष्ट झालें. (५) **गनीम**–शत्रु; **बिनीवर**–आघाडीवर. (६) **पुनीत**–पवित्र. **समिंदर**–समुद्र. (७) **वायसासुद्धां**–थोडासुद्धां. (८) **मुंडासा**–पागोटें. **भाळीं**–कपाळावर. **सूर्या**–सूर्याजी. तानाजीचा भाऊ. **सद्भाग्यचंद्र**–सद्भाग्यरूपी चंद्र. चढता काळ.

## २ बाजीप्रभु.

(१) **शेजार**–शिवाजीचें राज्य हें एक विजापुराला मोठें शेजार होऊं लागलें होतें. **रामरायाचं मुंडकं**–विजापुरच्या पूर्वीच्या बादशाहानीं विजयनगरच्या रामराय नांवाच्या प्रधानाचें मुंडकें आणून हिंदूंना दहशत बसविण्यासाठीं विजापुरच्या वेशीला टांगून ठेवलें होतें. रामराय हा जरी प्रधान होता तरी तोच खरा कारस्थानी होता. **फाजलखान**–अफझुलखानाचा मुलगा. अफझुलखानाचा वध झाला तेव्हां त्या लढाईंत हा होता; पण तो पळून गेला होता. (२) **शिद्दी जोहार**–एक वृद्ध व अनुभवी सेनापति. **डेरे**–तंबू. (३) **तोड**–उपाय. **काळाचा काळ्याकुट्ट०**–काळ्याकुट्ट काळाचाही कळिकाळ. काळाचा ही काळ. **नेताजी पालकर**–शिवाजीच्या घोडदळाचा मुख्य. **झाले आठ महिने०**–कोणी चार महिने झाल्यावर शिवाजी निघून गेला असें ही म्हणतात. (४) **गाफिल**–बेसावध. **जो हार सिद्दिचा०**–जो ( शिवाजी ) सिद्दीचा हार झाला तो कधींकाळींतरी जोहाराला





जोहार ( सलाम ) करील काय ? **जंवा कृष्णजन्म बघा०**–येथें श्रीकृष्णाचें गोकुळांतून गमन व शिवाजीचें पन्हाळगडावरून गमन यांची तुलना केली आहे. व शेवटीं शिव व कृष्ण हे एकच आहेत असें दाखविलें आहे. **गारद**–ठार. **पार्थालाच**–अर्जुनालाच (५) **खार**–छटा. **चांदण्यांनीं नाच बंद केला०**–चांदण्यांनीं कां नाच बंद केला तें सांगितलें आहे. शिवाजी ( शंकराचा अवतार असें म्हणतात ) घोड्यावर बसून चालला तेव्हां त्याच्या मस्तकावर चंद्र होता. त्या चंद्राला जणु काय गिळण्याला आतां शिवामागें फाजलखान राहु लागला होता. ही बातमी चद्राच्या स्त्रिया चांदण्या यांना आवडली नाहीं व सूर्याला ( चंद्राच्या भावाला ) ही सर्व बातमी देण्यासाठीं, ढगांचा पडदा ओढून घेऊन सर्व चांदण्या निघून गेल्या ! पहांटेच्या वेळीं चांदण्या कमीकमी दिसूं लागतात या गोष्टीला उद्देशून कल्पना. (६) **तांबडं फुटलं पूर्वेला**–पहांट झाली तेव्हां. **केरकचरा**–क्षुद्र. **राजी**–तयार. **कार्जी**–कामीं. (७) **कल्याणी**–कल्याण करणारी. **धांवत्या सापांना०**–धांवत्या सापावर जशा घारी झडपा घालतात तसे बाण धांवत्या घोड्यांवर झडपा घालीत होते. **विजयश्री आली वरण्याला०**–विजयदेवी वरण्याला आली अशी बातमी बाजीप्रभूला देण्यासाठीं जगदंबेनें मृत्यूला त्याच्याकडे पाठविलें आणि उत्तम थाट कर असें ही सांगितलें. नंतर मृत्यूनें ती खिंड सजविण्यास प्रारंभ केला त्याचें वर्णन. (८) **कुडी**–देह. **ज्यासाठीं देह खर्चिला०**–ज्या शिवाजीसाठीं देह खर्चिला तोच अजून सुरक्षित झाल्याची वर्दी तोफांच्या आवाजरूपानें न आल्यामुळें बाजीप्रभु तळमळत होता.

## ३ संभाजी.

(१) **दिल्लिपति**–अवरंगजेब. **बकध्यान धरून०**–अवरंगजेब पक्का

कारस्थानी होता. **शियापंथी अदिलशाही०**–अवरंगजेबानें दक्षिणेंत येऊन विजापुरची अदिलशाही, गोवळकोंडयाची कुतुबशाही व मराठेशाही या सर्वांचा अंत करण्याचें ठरविलें. (२) **फिरंगाला**–पोर्टुगीजांना. **ज्याला कला छान०**–जणु वीरवृत्ति कलांचा आश्रय घेऊन राहिली होती. **हंबीर**–हंबीरराव मोहिते; वाईच्या झटापटींत ठार झाला. (४) **किती प्याले सुरा०**–राजारामाला पडलेलें स्वप्न. **असुद्**–रक्त. (५) **पृथुराज**–पृथ्वीराज–चव्हाण यानें शाहाबुद्दिन घोरीला पुष्कळ वेळां जीवदान दिलें होतें. (७) **घुंगुरटी**–चिलटें. **शिबीराजा**–यांनें आपलें मांस कापून दिलें होतें. **दधीचि**–या मुनींनी वज्र तयार करण्यासाठीं स्वतःचीं हाडें दिलीं होतीं. (८) **कासरा दीस**–खेडयांतील बोली. तास दोन तास दिवस. इतका दिवस उगवला तरी कवडासासुद्धां दिसत नव्हता, इतकी दाट झाडी होती.

## ४ सती लक्ष्मीबाई.

(१) **चांद आला झांशीला०**–लक्ष्मी वैकुंठ सोडून झांशीला येऊन राहिल्यावर साहजिक तिचीं भावंडें (समुद्रमंथनांतून लक्ष्मी वगैरे चौदा रत्नें निघालीं होतीं) झांशीस येऊन राहिलीं अशी कल्पना. चंद्र झांशीला येऊन राहिल्यावर स्वर्गलोकीं कल्लोळ झाला. धन्वंतरी झांशीला येऊन राहिला तेव्हां स्वर्गात रोगराई सुरूं झाली, इत्यादि. **झांशीगांव म्हणजे०**-येथें झांशीगांवाला सरोवराची उपमा दिली आहे. मोठमोठे वाडे हींच कमळें, स्त्रियांचें काळे मोहक सुंदर डोळे हेच भृंग. पण डोळे भृंगापेक्षां उत्तम होते! तसेच तेथील शुभ्रवृत्ती राजहंसापेक्षां उजवे. **जाई मोगरी मालती०**–त्या झांशी गांवरूपी सरोवराभोंवतीं जाई मोगरी वगैरे शुभ्र फुलें फुललीं होतीं. दिवसा आकाशांत चांदण्यांना थारा नाहीं म्हणून त्या जाई मोगरी वगैरे





फुलांच्या रूपानें येथें येऊन राहिल्या होत्या अशी कल्पना. **मोरोपंत तांबे**–लक्ष्मीबाईचे वडील. **ब्रह्मावर्ती**–ब्रह्मावर्तगांवीं ; पेशवे राजसंन्यास करून उत्तरहिंदुस्थानांत येथें येऊन राहिले होते. तांबे त्यांचे आश्रित म्हणून तेही तेथेंच होते. **दामोदराला**–या मुलाचें पूर्वीचें नांव; याला दत्तक घेतलें. **एलिस साहेब**–झांशीचे कंपनीचे अधिकारी. (४) **राणीच्या नांवाचा०**–पुन्हां राणीला राज्यप्राप्ति झाली. हें राज्य पुढें ९ महिने टिकलें. (५) **पायीं पायजमा०**–राणीचा दरबारी पोशाख. **जंग**–लढाई. **थंडीचा कडका जसा०**–थंडीच्या कडक्यानें जसा हिरवागार शाळू सुकून जातो तशी या बातमीनें राणीची अवस्था झाली. (६) **बाईमाणूस मी०**–राणीनें सर ह्यू रोजला पाठविलेलें उत्तर. **घनगर्ज**–राणीकडची एक विक्राळ तोफ. **मोर्चा**–तोफा ज्यावर ठेवतात तें चुनेगच्चीचें बांधकाम. **तात्या टोपे**–पेशव्यांचा सेनापति. (७) **दारुच्या कोठारांत०**–राणीला जगणें हें नामुष्कीचें वाटूं लागलें म्हणून स्त्रीस्वभावाप्रमाणें थोडा वेळ कर्तव्याची जाणीव विसरून दारूच्या कोठारांत शिरून ती स्वतःस जाळून घेणार होती. **रामचंद्रराव**–एक विश्वासू सरदार. (८) **राजरत्नी करड्या०**–लक्ष्मीचा भाऊ उच्चैःश्रवा. राणीनें जो घोडा घेतला होता तो उच्चैःश्रव्याप्रमाणेंच चपल होता म्हणून कल्पना. **चिच्छक्तिकार्यशक्तिचा०**–राणी चिच्छक्ति, घोडा कार्यशक्ति. (९) **बावीस वर्षांची०**–राणी रणक्षेत्रावर पडली तेव्हां फक्त बावीस वर्षांची होती. **पाण्याचा पाट०**–पाण्याच्या पाटाला राणीचा घोडा थबकला!

## ५ प्रतापगड!

(१) **चंद्रराव मोरे**–याच्या ताब्यांत जावळी प्रान्त होता. त्यानें शिवाजीच्या विरुद्ध कारस्थानें केलीं म्हणून शिवाजीनें याला ठार

करविलें. **बादशाहा शब्द०**–बादशाहा या शब्दाचे दोन तुकडे झाले : बाद आणि शाहा. पैकीं बाद हा भाग शाहा जवळ राहिला व शाहा हा भाग शाहाजी जवळ आला. बादशाहा बाद झाला व शाहाजीच जणु शाहा झाला असा भावार्थ. **हूड**–अवखळ, बेफाम. **सदरेला**–कचेरीला. **वजीर**–प्रधान. **गिरफदार करणें**–पकडणें. ( २ ) **बिनीवरचा**–आघाडीचा. (३) **नीलनभाच्या हृदयावरती०**–निळ्या आकाशांत चंद्र आणि चांदण्या, तसेच सह्याद्रीवर शिवाजी व त्याचे मित्र. म्हणून तुलना. **शरदतूच्या निळ्या०**–शरदतूच्या निळ्या आकाशांत कधींही वीजेचा कडकडाट होणार नाहीं; पण येथें तो झाला ! शिवाजीवर अकस्मात् संकट येऊन कोसळलें. (४) **कृष्णाजी भास्कर**–अफझुलखानाचा वकील. **रात्र हि बुडली०**–अतिशय शांतता झाली. **भूसुर**–ब्राह्मण. **मोहाचा कडा०**–मोह नाहींसा झाला आणि विवेक उत्पन्न झाला. **स्वातंत्र्यबुद्धि०**–मोहपटल दूर झालेली बुद्धि हीच कोणी कोकिळा. **पंताजी गोपिनाथ**–शिवाजीचा वकील हा शिवाजीचा निरोप घेऊन कृष्णाजी भास्कराबरोबर खानाकडे गेला. (५) **सराईत**–हुशार. **इतराजी**–गैरमर्जी. **अलहमदुल्लिला**–काय कृपा आहे अल्लाची ! **रोब**–दरारा. **सिरफ**–फक्त, नुसतें. **कृष्णाजीपंत बोलला०**–कृष्णाजी भास्कर शिवाजीला वश झालाच होता हें वाचकांना माहीत असेलच. **पसरणीचा घाट**–वाईहून पांचगणीकडे जातांना हा घाट लागतो. **मृगपंचानन**–सिंह. **सह्यकंदरीं**–सह्याद्रीच्या गुहेंत. ( ६ ) **कुबेर अलकापुरी०**–खानाची भेट घेण्याला तयार केलेला मंडप इतका मौल्यवान होता कीं जणुकाय धनपति कुबेर आपली अलकापुरीच घेऊन तेथें आला होता, समुद्र सर्व रत्नें घेऊन हजर होता आणि विष्णु वैकुंठ सोडून तेथें आला होता. **कधीं एकिला कुणी०**–विष्णु आणि शंकर एकत्र आपल्या वैभवासकट राहिले आहेत असें





कधीं कोणी ऐकलें तरी आहे काय ? कारण एक गबर आणी दुसरा भिकारी ! पण येथें ही अशक्य गोष्टसुद्धां घडून आली होती. (७) **जगदंबा पुढें उभी०**–जगदंबेनें दर्शन दिलें त्यावेळचें वर्णन. **मोरो, शाम, रघुनाथ०**–शिवाजीचे साहाय्यक. **प्रेमाचा दोर भला०**–'**बंधनानि खलु सन्ति**' इत्यादि श्लोक पुष्कळांनीं वाचलाच असेल. (८) **टोप शिरीं पांढरा०**–शिवाजीच्या मस्तकावर टोप होता; त्यांतून एक हिऱ्याचा तुरा लोंबत होता. शंकराच्या डोक्यावरून पडणाऱ्या गंगेप्रमाणें तो शोभत होता. ही तुरारूपी गंगा खांद्यांतून गुप्त झाली आणि उजव्या हातांत तलवाररूपानं पुन्हां प्रगट झाली अशी कल्पना. **सील**–चिलखत. **सुरवार**–विजार. **बिचवा**–एक प्रकारचें हत्यार. **सर्जा**–सिंह. **जिवा म्हाल्या**–शिवाजीचा नोकर. **अवघ्राण करणें**–हुंगणें. निरोप व आशीर्वाद देण्याचा एक प्रकार म्हणजे मस्तक हुंगणें. **कृष्णेला**–कृष्णी नांवाच्या घोडीला. **दुपारची भर वेळ०**–सूर्यानें किरणांचें छत्र शिवाजीवर धरलें होतें. कोणी म्हणतात महाराज भेटीला गेले तेव्हां संध्याकाळची वेळ होती. (९) **झाडंझुडपं किति०**–शिवाजीची घोडी पुढें पुढें जात असतां झाडें झुडपें जणु काय भीतीनें मागें मागें पळत होती. **लवा**–पक्षी. **बंडा सय्यद**–खानाचा नोकर. **अज्ञानदास**–शिवाजीच्या वेळचा शाहीर. यानें अफझलखानवध या विषयावर पोवाडा लिहिला व तो शिवाजीला गाऊन दाखविला; तेव्हां शिवाजी महाराज प्रसन्न झाले आणि त्यांनीं त्याला एक शेरभर सोन्याचा तोडा आणि एक घोडा बक्षिस दिला त्याचा संदर्भ.

टीपः–महाराजांनीं वाघनखें खुपसून प्राण घेतला असें कांहीं म्हणतात. कित्येक तलवारीचा वार केला असें लिहितात तर दुसरे महाराजांनीं जमधाड म्हणून एक हत्यार आहे त्याचा उपयोग केला असें म्हणतात !

## ६ शिवप्रतिज्ञा.

(१) **कुर्निसात**-नमस्कार. (३) **रोहिड्याच्या डोंगरानं०**-' शिलोच्चयोऽपि क्षितिपालमुच्चैः प्रीत्या तमेवार्थमभाषतेव '-रघुवंश सर्ग २. (४) **सापाचा विळखा०**-साप आणि चंदन यांचा वर्ण सारखा असतो. हिरवा टोळ आणि हिरवें पान. चंदनाला साप आणि हिरव्या पानाला टोळ सारखे लागले असतात.

( या पोवाड्यांत आलेल्या स्थलादिकांच्या नांवांच्या परिचयासाठीं प्रथम या पुस्तकांत दिलेला या कथानकाचा सारांश वाचावा. )

## ७ मुरारबाजी.

(१) **कबंध**-धड. **पुरंदरीं**-पुरंदरच्या लढाईत. **दारुण**-घनघोर. (२) **पेंढार**-बाजारबुणगे पेंढारी वगैरे. **मिर्झाराजा**-जयसिंगाला हा किताब असे. **फाजलखान**-अफझुलखानाचा मुलगा. **जावळीच्या मोऱ्याचे०**-जावळीचे चंद्रराव मोरे यांना शिवाजीनें ठार करविलें होतें त्यांचे मुलगे, बाजी व अंबाजी. **शिवाप्पा नाईक०**-बेदनूरचा शिवाप्पा नाईक, बसबपट्टणचा जहागिरदार, माणकोजी धनगर वगैरे शत्रूच्या मदतीला गेले. **सासवडगांवीं**-सासवडवरूनच पुरंदराला जावें लागतें. (३) **स्वराज्यतरु**-स्वराज्यरूपी झाड. **साम**-समेट, तह. **एकलिंगजी**-रजपूतांचें दैवत. (५) **निराशा झडपी०**-खान निराश झाला. **हिय्या**-धडाडी. **पसरला सेनासागर०**-शत्रूंची सेना हा समुद्र, पुरंदर हें कमळ, आणि मुरारबाजी हा मुरारि ( भगवान् विष्णु ) अशी कल्पना. **गनिम**-शत्रु. **शर्थ**-शिकस्त. (६) **ढांसळला बुरुज०**-किल्ल्याचा बुरुज ढांसकला; पण मुरारबाजीच्या हृदयाचा बुरुज मात्र टक्कर देण्यास तयार झाला. **वज्रगड**-पुरंदरच्या अगदींजवळच हा किल्ला आहे. या किल्ल्यावरून जर तोफा डागल्या तर गोळा सहज पुरंदरच्या





कोटावर जाऊन आदळतो. म्हणून खानानें हा किल्ला सर करून त्यावरून तोफा डागण्याचें ठरविलें. **बाबाजी०**-बाबाजी बोवाजी व यशवंतराव बोवाजी हे दोघे भाऊ त्या किल्ल्याचे रक्षक होते. ते ठार झाले. (७) **करपाश**-हात हेच पाश. **मीन**-मासा. **प्रेमकल्लोल०**-प्रेमाच्या लाटा. प्रेम अश्रुरूपानें डोळ्यांतून बाहेर कोसळूं लागलें. **पंचानन**-सिंह. **तनु**-शरीर. **पर्व**-पर्वकाळ, पर्वणी. **फिरंग**-तलवार. **कां प्रळयसिंधु०**-मुरार किल्ल्यावरून खालीं येत होता तो जणु काय प्रळय काळचा पाण्याचा लोटच यवनांचा नाश करण्यास चालला आहे असें भासत होतें. **कौल**-शरणचिठी. ( ९ ) **औरत०**-स्त्री. जेथें पुरुषांइतक्याच त्वेषानें स्त्रिया ही लढाई करतात तेथें जय मिळणें अशक्य असें खानाला वाटलें. **त्वत्समान**-तुझ्यासारख्या.

## ८ खंडोबल्लाळ.

(१) **रणधीर**-रणशूर; **फितुरीच्या धरणीकंपानं०**-फितुरीनें बुरुजसुद्धां भिऊन गेले आणि दऱ्याखोऱ्यांत जाऊन लपून बसले. **फितुरीची जहरी नागीण०**-फितुरीची विषारी नागीण अभिमानाला चावली म्हणून अभिमान निघून गेला ! **डंखे**-चावे, **सूर्याजी पिसाळ**-रायगडचा किल्लेदार; हाच फितूर झाला ! **सिंहाचा छावा०**-बाल शाहू व येसूबाई. **मशक**-डांस. **झुल्फिकरखान**-अवरंगजेबाचा सुभेदार व या मोहिमेवरचा सेनापति. **संताजी धनाजी०**-संताजी घोरपडे, धनाजी जाधव, प्रल्हाद निराजी, खंडो बल्लाळ चिटणीस. **जिंजी**-कर्नाटकांतील एक अत्यंत मजबूत किल्ला. (२) **ह्रास**-नाश; **दुःखसागरीं**-दुःखाच्या समुद्रांत **गनिम**-शत्रु. **बहिरोजी**-खंडो बल्लाळाचा सुमारें सोळा सतरा वर्षाचा मुलगा. (३) **दैवाचा होता०**-दैव प्रतिकूल होतें. **जंजीर**-साखळदंड. साखळदंडांनीं यापूर्वीं

खंडोजीसारख्या दुसऱ्या कोणा ही वीराला मिठी मारली नव्हती म्हणून त्यांना यावेळीं फार आनंद झाला आणि ते साखळदंड 'खळ खळ खळ' असें गाणेंच गाऊं लागले! **हातबेडी पायबेडी०**–हातबेडी व पायबेडी या जणूं काय सख्या बहिणी बहिणी नागिणी. त्यांनीं हातापायाला विळखे घातले आणि नागानें (जंजीरानें) गळ्याला विळखा घातला होता! **मोहोर**–एक प्रकारचें सोन्याचें नाणें. **जणु आवसेच्या०**–भुयारांत काळोख असल्यामुळें भुयार हीच कोणी अमावास्येची रात्र! आणि त्यांत बहिरोजी हाच कोणी चंद्र! **वेल्हाळा**–लाडक्या. (५) **दिवसाची पाळो०**–रात्रीनें काळोखरूपी पांघरूण पृथ्वीवर घातलें! **तिरमिरी**–घेरी. **न्याहाळून**–निरखून. **शिरकाण**–संभाजीनें शिर्के–घराण्यांतील सर्व पुरुष ठार केले होते म्हणून राणोजी व व गणूजी शिर्के शत्रूला सामील झाले होते. **दाभोळ व कुचरी**–येथील वतनें. (६) **रातोरात**–त्याच रात्रीं. (७) (७) **हिरकणी**–एक प्रकारचें विष. (८) **शोकानळ**–शोकरूपी अग्नि. **संतुमाई**–खंडोजीची बहीण. संभाजीच्या बायकोचें रक्षण करण्यासाठीं ही बळी पडली. **वडील**–बाळाजी आवजी. –**फर्जी**–कृतकृत्य.

## ९ सिंधुग्रहण.

(१) **आठव्या शतकाला०**–इ. स. ७१२ मध्यें महमद कासीमनें सिंध देशावर स्वारी केली तो प्रसंग. **गिरिवर**–श्रेष्ठ पर्वत. **देबाल**–दाहरची राजधानी. **जणु सुसरी काळपुरुषाच्या०**–गलबतें याच कोणी सुसरी; व वरचा तोफा हींच त्यांचीं तोंडें. जणु काय काळपुरुषाच्या सुसरीच तोंडें उघडून देशाचें स्वातंत्र्य गिळण्यास आल्या कीं काय अशी कल्पना. (३) **तर हिंसेचं पाप लागेल०**–बुद्धधर्माचा पगडा त्यावेळीं लोकांवर किती होता याचें उत्कृष्ट उदाहरण!





**सातशें रूपवान स्त्रिया०**–भारताचार्य श्री. चिंतामणराव वैद्य यांचें मध्ययुगीन भारत अवश्य वाचावें. रोमांच उभे राहतील! **मोका बसय्या०**–सिंधुनदीच्या पात्रांत एक बेट होतें त्याचा अधिकारी. जातीचा ब्राह्मण पण स्वार्थासाठीं महमद कासीमला फितुर झाला! (५) **नफ्थ्याचा बाण**–जळता बाण.

## १० धाडशी शिवाजी.

(१) **चिरे धडांधड०**–मोंगलराज्याचे चिरे धडधड पडूं लागले. **फिरंग**–तलवार. **विषण्ण**–खिन्न. (२) **नरसाळा फिरंगोजी**–चाकणचा गडकरी. **अस्मान**–आकाश. (३) **महालामधि**–लालमहालांत. **पोत बांधवले०**–शास्ताखानाच्या सैन्याला चकविण्यासाठीं शिवाजीनें कात्रजच्या घाटांतील झाडाझुडपांना फडक्याचे पोत बांधविले होते. शिवाजीनें खानाचा समाचार घेऊन सिंहगडीं जावें व तेव्हांच कात्रजच्या घाटांतील पोत ही पेटले जावे असा संकेत ठरला होता. (४) **गोटाबाहेर**–छावणीबाहेर.

## ११ ठकास महाठक!

(१) **चार शाह्या**–अदिलशाही, कुतुबशाही, बेदरशाही आणि सर्वांत प्रबळ मोंगलशाही. या पैकीं मोंगलशाहीला थोडा वेळ वश करणें आवश्यक होतें. (३) **मामो आणि सून**–शास्ताखानाची बायको आणि सून. शास्ताखानाच्या पुत्राला शिवाजीनें पुण्यास ठार केलें होतें त्याचा सूड घेण्याचा त्यांचा विचार होता. **आपदा**–संकट. (४) **हिरोजी फर्जंद**–शिवाजीचा एक विश्वासू नोकर. (५) **कृष्णाजी विसाजी०**–यांच्याजवळ शिवाजीनें बालसंभाजीला ठेवलें होतें. **मोरोपंत**–मोरोपंत पिंगळे. प्रधान. '**नेति नेति**'–ब्रह्माचें वर्णन

करीत असतां श्रुतींनीं हि 'नेति नेति' असे उद्गार काढले होते. शिवाजीचें यश ही तसेंच अवर्णनीय आहे असा भावार्थ.

## १२ वसईचा वेढा.

(१) **चिमाजी**–चिमाजी आप्पा. यांना चिमणाजी असें ही म्हणत असत. **फिरंगी**–पोर्तुगीज, फ्रेन्च वगैरे. **गंगाजी नाईक पाठारे०**–गंगाजी नाईक व अंताजी कावळे देसाई सातार्‍याला मराठ्यांची मदत मागण्यासाठीं शाहूराजाकडे गेले. (३) **श्रीरामचन्द्र जगिं शूर०**–'रामादपि कः शूरः स्मरशरनिहतो न यश्चलति' श्रीशंकराचार्य. (४) **धमधमा**–तोफा ठेवण्यासाठीं रेतीच्या व चुन्याच्या केलेल्या भिंती. **गरनाळ**–एक प्रकारची तोफ. **जराळ**–सेनापति.

## १३ माझा हिंदुस्थान!

(१) **जलभार**–पुष्कळ पाणी. **गंगा यमुना०**–गंगा, यमुना, गोमती, सिंधु, सरस्वती, गोदावरी, कावेरी, तापी, नर्मदा, कृष्णा वगैरे नद्या. **सह्याद्रि०**–सह्याद्रि, विन्ध्यपर्वत, हिमालय, निलगिरी, सातपुडा वगैरे पर्वत. **काशी गया०**–काशी, गया, प्रयाग, केदार, द्वारका, अवन्तीपूर उर्फ उज्जयिनी, जगन्नाथपुरी, नाशीक, त्र्यंबकेश्वर, वैराज-क्षेत्र उर्फ वाई, करवीर उर्फ कोल्हापूर, महाबळेश्वर, डाकूर, गोकर्ण, रामेश्वर वगैरे तीर्थक्षेत्रें. **देवांना हाच देश०**–देवांनीं अवतार याच देशांत घेतला. (२) हिंदुस्थान धर्मभूमि व कर्मभूमि आहे. दुर्जनांचें दण्डन व सुजनांचें पालन ही येथेंच होतें. **रंगो बापूजी**–सातार्‍याचें राज्य खालसा झालें तेव्हांचा एक महामुत्सद्दी पुरुष. (३) **ज्ञानदीप**–ज्ञानरूपी दिवा. **तेजाळ**–तेजस्वी. **मम्मट**–काव्यप्रकाश या ग्रंथाचा कर्ता. (४) **कर्दमीं**–चिखलांत. **पोहरा**–राहाटगाडग्यावरचे पोहरे.





'नीचैर्गच्छत्युपरि च दशा चक्रनेमिक्रमेण'–कालिदास. **दहातोंड्या**–रावण. **चार्लस**–पहिला चार्लस. याचा शिरच्छेद झाला. **दैन्य**–दीनावस्था. **भाविकाळ**–हिंदुस्थानचा भविष्य काळ.

## १४ सुधारणा कीं कुधारणा?

(१) **दिमाख**–ऐट, डौल. (२) **रेझोल्युशन**–ठराव. **डेप्युटेशन**–शिष्टमंडळ. **नृलोक**–मनुष्यलोक. (३) **टॉकी**–चलच्चित्रपट. (४) **प्यून**–नोकर. **बटन**–विजेचें बटन. **लिफ्ट**–विजेचा पाळणा. **ट्रीटमेंट व्हेरी फाईन**–शिस्त तरी मोठी फाकडी आहे बुवा! (५) **जुवानाचा**–तरण्या माणसासारखा. **पांढरें चूर्ण**–फेस पावडर. (६) **कंट्रीमेन**–लोक हो! **पीस**–शांतता. **डिस आर्मामेंट**–शस्त्र-संन्यास. **ऑनेस्ट्ली**–प्रामाणिकपणें. **फॉर द प्रेझेंट**–तूर्त. **बॅलन्स ऑफ पॉवर**–समानबलत्व. (१०) **नकाश्रु**–खोटे अश्रु. नक्र–सुसर. **हत्तीवाणी**–हत्तीप्रमाणें. **कल्चर्ड**–सुधारलेला.

## १५ लोकमान्यांचें देहावसान!

**बहुविधा**–बहु प्रकार. **सांकडें**–संकटें. **भूमातंकीं**–भूमातेच्या मांडीवर. **नाना**–नाना फडणीस. **पार्श्वभागिं**–जवळच. **चंडांशु**–सूर्य. **शस्त्रशक्ति०**–शस्त्रशक्तीच्या सिंहापुढें तो हत्ती काय करील? **जयान्वित**–विजयी. **शकलें**–तुकडे. **विदारित**–छिन्नभिन्न. **नौका**–नाव. **दहिवरजलकणसिंचन**–कडक दव. अतिशय धुकें पडलें म्हणजे पिकें करपून जातात. **विगतचेतन**–चैतन्यरहित. **दिनकर**–सूर्य. **निरस्त**–नाहींसे. **तिमिराला**–अन्धाराला.

## १६ श्री समर्थचरित्र.

(१) **जन्म**–शके १५३०. **गिरिकुहरांतुन**–पर्वतांच्या गुंफेंतून.

टांकळी–समर्थांनीं या गांवीं बारावर्षें पुरश्चरण केलें. (३) युगल–जोडी. अवतारसमाप्ति–शके १६०३.

### १७ गुजराथचा जलप्रलय.

(१) १९२७ , ता. पंचवीस, जुलै, सोमवार या दिवशीं विश्वामित्री नदीला अतिशय पूर आला तेव्हां बडोदे गांवाची व आसपासच्या गांवांची स्थिति जी झाली तिचें वर्णन. (२) तारेला–टेलिफोनच्या तारा व तारांचे खांब यांना.



## कांहीं मननीय अभिप्राय !

१

...आधींच ज्या ऐतिहासिक प्रसंगावर व व्यक्तींवर हे पोवाडे रचिले आहेत, त्यांचा महाराष्ट्रीयांच्या मनावर कायमपणें प्रस्थापित झालेला प्रभाव, रा. खाडिलकरांच्या पोवाड्यांतील जोरदार, स्पष्ट व वर्णित प्रसंग हुबेहुब डोळ्यापुढें उभे करणाऱ्या भाषेनें व विशेषतः ते ज्या अर्थानुगामी पद्धतीनें पोवाडे म्हणतात त्या पद्धतीनें, द्विगुणित स्फूर्तिदायक होतो यांत शंका नाहीं.

ता. ५–१०–१९२७ **प्रो० विश्वनाथ बलवंत नाईक;**
फर्ग्युसन कॉलेज, पुणें.

२

### Glories of Days of Old.

Hindu Bard keeps audience spell-bound
with inspiring ballads !

Unbounded enthusiasm and great liveliness marked the recitation of ballads by Mr. P. D. Khadilkar. This gentleman, who is a Master of Arts of the Bombay University, is a poet of vivid imagination and great descriptive talents. He has composed many ballads recounting the heroic deeds of our great national heroes and heroines.

The audience, which had a large sprinkling

of ladies, was held spell-bound for a period late in the night. His thrilling way in reciting the ballads, to the accompaniment of harmonium and other primitive instruments, recalled to the audience the good old days of complete devotion. for a time, the audience was very much swayed by emotions of pathos, joy and a fierce resentment, at times, at the vile deeds of the oppressors of those days.

—The Indian Daily Mail, 25-8-28.

३

रा. रा. खाडिलकर यांचा पोवाडा ऐकण्याचा सुप्रसंग आज आला इतके दिवस त्यांची कीर्ति ऐकत होतों, ती खरी असल्याचा आज अनुभव आला आणि त्यामुळें अत्यन्त आनन्द झाला.

ता. २२-११-१९२७ **अच्युत बळवंत कोल्हटकर**

४

Mr. P. D. Khadilkar, M. A. is taking the Marathi knowing public by storm by his sweet and melodious ballads. He is giving his performances both in the city as well as in Craddok Town and Sitabaldi and hundreds of men, women and children assemble to hear the instructive ballads.

—Hitavad, Nagpur.
1-11-1928.





५

रा. खाडीलकर यांनीं केलेले पोवाडे त्यांनीं स्वतः पेटी व डफ यांच्या साहाय्यानें म्हटलेले ऐकण्याचा आज अपूर्व योग आला. पोवाडे वीररसप्रधान असून म्हणण्यांतील त्यांचा आवेश रसांत जास्त भर घालतो. कोणत्याही गांवीं व समाजांत त्यांनीं हे पोवाडे म्हणून दाखविल्यास लोकांचें रंजन होऊन त्यांना बोध होणार आहे.

१३-१२-२७ **शंकर श्रीकृष्ण देव. धुळें.**

६

रा. पांडुरंग दत्तात्रय खाडिलकर यांनीं स्वतः केलेले पोवाडे त्यांच्याच मुखांतून मी ऐकिलें. पोवाडे उत्तम रचले आहेत. त्यांच्यामध्यें सर्व रस आहेत. वीरश्री ते ऐकल्याबरोबर मनुष्याच्या मनांत चढते ह्या गाण्याचा परिणाम श्रोत्यांच्या मनावर ताबडतोब होतो. यांच्यामधील मांडणी, विचारसरणी व रस अतिशय व्यवस्थित व परिणामकारक आहेत.

ता. २७-६-२८ **श्रीकृष्ण व्यंकटेश पुणतांबेकर,**
एम्. ए. बार-एट-लॉ.
प्रोफेसर, हिंदुयुनिव्हर्सिटी, काशी.

७

अहमदाबादेंत श्री. खाडिलकर आल्यापासून त्यांच्या पोवाड्यांचें गायन ऐकण्याचा, खाजगी बैठकींत त्याचप्रमाणें सार्वजनिक कार्यक्रमांत, मला सुयोग आला. टीकाकाराच्या सूक्ष्म परीक्षणशील दृष्टीनें मी किती तरी वेळा त्यांच्या पोवाड्यांच्या गायनाकडे पाहिलें. **त्यांच्या गायनाला मी संगीतशास्त्र, साहित्यशास्त्र व नाट्यशास्त्र या**

**तिर्हीच्याही कसोट्या कसोशीनें लावून पाहिल्या, आणि शेवटीं माझी खात्री झाली कीं पोवाड्यांच्या वाङ्मयाचे जनक या नात्यानें श्री खाडिलकर यांना मराठी साहित्यांत अत्युच्च स्थान द्यावें लागेल.** रसपरिपोष, ओजस्विता व रमणीय अलंकारांची सजावट यांनीं ओतप्रोत असलेलें त्यांचें पोवाडा-काव्य रसिक हृदयाला आनंदानें डोलवितें; खडा आवाज, स्पष्ट शब्दोच्चार व सुरेलपणा या योगानें त्यांचें गायन कोणाही गायनशास्त्र्याला 'वाहवा' म्हणायाला लाववितें आणि गेय विषयांशीं तादात्म्य, रसानुरूप चेहऱ्याचा बदल हें त्यांचें अभिनयपटुत्व या त्यांच्या गुणांनीं मार्मिक प्रेक्षक धन्योद्गार काढतो. वरील तिन्ही प्रकारांपकीं एक एक दोन दोन प्रकार कुठें कुठें पहायाला मिळतात पण त्यांचा रम्य त्रिवेणीसंगम श्री. खाडिलकरांचेच ठिकाणीं आढळतो व त्यामुळें "मद्भाग्योपचया-दसावुपचितः सर्वो गुणानां गणः" (श्रीहर्ष) असे उद्गार रसिकांच्या तोंडून सहजच निघतात.

भावी भारतस्वातंत्र्याच्या आनंदकालीं "आम्हांस स्वातंत्र्योन्मुख करणारे हे पहा स्फूर्त कवि" असें म्हणून भूतकालीन वाङ्मयांत डोकावत असतां पुढील पिढी श्री. खाडिलकरांकडे सप्रेम अंगुलिनिर्देश करील असा भरवसा वाटतो.

**श्री. रामचंद्र बलवंत आठवले** एम्. ए.
माजी प्रोफेसर, गुजराथ कॉलेज, **अहमदाबाद.**

८

I have heard and read Shahir Khadilkar's ballads with great pleasure and interest. I can not help mentioning that his ballads, I have





heard, are full of historical facts and without the least exaggeration. Shahir Khadilkar being a scholar and a trained scientific songster, his composition, when sung by him, creates deep impression and great enthusiasm in the audience.

W. S. Mukadam,
Ex. M. L. C. (Panchmahals).

९

श्रीयुत खाडिलकर यांचे पोवाडे मी ऐकिले. महाराष्ट्रांत सांप्रत जें लोकजागृतीचें काम चालू आहे त्यास या पद्धतीचा फारच उपयोग होईल. कारण पोवाड्यांची रचना फारच स्फूर्तिदायक व उद्बोधक अशी आहे. काव्यदृष्ट्या किंबहुना साहित्यशास्त्रदृष्ट्याही सर्व पोवाड्यां-तून उत्प्रेक्षा, व रूपक वगैरे अलंकारांची रेलचेल आहे. एकंदरीनें सर्व बाजूंनीं उत्कृष्ट अशा या प्रयत्नांस महाराष्ट्रानें अवश्य उत्तेजन दिलें पाहिजे.

ता. १५-६-२८ **रघुनाथशास्त्री कोकजे, तर्कतीर्थ.**

१०

शाहीर श्री. पांडुरंग दत्तात्रेय खाडिलकर यांचे पोवाडे मी वाचले व ऐकले. साधी, सुबोध भाषा; परिचित गोष्टींचे पण समर्पक दृष्टान्त; वर्णित व्यक्तींची व प्रसंगांची कौशल्यानें केलेली निवड, वगैरे गुणामुळें श्री. खाडिलकरांच्या पोवाड्यांनीं मराठी वाङ्मयांत उत्कृष्ट भर पाडली आहे यांत शंका नाहीं.

श्री. खाडिलकरांचें स्वरचित पोवाड्यांचें गायन व ऐतिहासिक आख्यानांचें कीर्तन, हीं हि अत्यंत परिणामकारक होतात हें मी

## अभिप्राय

स्वानुभवानें सांगतों. संगीताची शास्त्रशुद्धता, मेहेनतीची जोड देऊन वाढविलेली मर्दानी आवाजाची नैसर्गिक गोडी, वर्णितविषय व प्रसंग यांच्याशीं तादात्म्य पावण्याची शक्ती व प्रसंगानुसार चाली व आवाज बदलण्याचें अभिनयकौशल्य, भाषेचा स्पष्ट उच्चार व स्फुट अर्थ हे श्री. खाडिलकरांच्या पोवाडे-गायनाचे व कीर्तनाचे विशेष गुण आहेत असें मला वाटतें.

२३-८-३१

**श्रीपाद लक्ष्मण आजरेकर,**
प्रोफेसर, गुजरात कॉलेज, **अहमदाबाद.**



## शुद्धिपत्र.

| पान | चौक | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|---|
| ६ | १ | १९ | माघाच्या वद्य० | " माघाच्या वद्य० |
| ,, | ,, | २१ | जर पूर्वपुण्याई० | " जर पूर्वपुण्याई० |
| १० | ४ | २१ | आमचं मन० | " आमचं मन० |
| १६ | ७ | ४ | समदं | समद् |
| १८ | १० | ११ | दयालव खास | दयालव खास ! " |
| २० | १ | ७ | ऊठ कारट्या० | " ऊठ कारट्या० |
| २३ | ३ | ५ | जिरे टोप | जिरेटोप |
| २५ | ४ | ५ | बालला | बोलला. |
| ३१ | ५ | ३ | झालों मी पार | झालों मी पार " |
| ३७ | १ | ५ | शद्धबुद्ध | शुद्धबुद्ध |
| ३७ | १ | १४ | जासुरी | आसुरी |
| ५६ | ४ | १४ | ढाणकला | ढाणकाला |
| ७५ | ५ | १ | त्वचा | त्याचा |
| ८६ | १ | ४ | सान्याच्या | सोन्याच्या |
| ८६ | १ | १५ | दरबारत्नं | दरबारात्नं |
| ९० | ४ | ८ | नांव त्यांच | नांव त्याचं |
| १०० | १ | १७ | शाहित्याची | शाहिस्त्याची. |
| १०२ | २ | ८ | दोघं | दोघ ! |
| १०३ | ३ | १७ | जे वीर पुरुष० | " जे वीर पुरुष० |
| १०४ | ४ | ४ | बेहमान | बेइमान |
| १०६ | ५ | १७ | छावणामंदि | छावणीमंदि |
| १०८ | ६ | २० | सागेल | सांगेल. |
| १२५ | ६ | ५ | खालता | खालती. |
| १२९ | ८ | १ | माता तुजवाचुनी | माता तुजवाचुनी " |
| १३८ | ५ | १ | घार | घोर |
| १४८ | २ | ८ | जारूं | जाऊं |
| १५३ | मथळा | | आग्र्याहून | आग्ऱ्याहून |

# पोवाड्यांचे कार्यक्रम ठरविण्याबाबत कांहीं नम्र सूचना.

---o---

१ गणेशचतुर्थीची सुट्टी, दिवाळीची सुट्टी आणि मे महिन्याची सुट्टी, या तीन सुट्यांतच मुख्यतः शाहीरांना कोठेंहि कार्यक्रमांसाठीं जाण्यास सवड असते.

२ मे महिना व दिवाळीची सुट्टी या दिवसांत लांबवरचे कार्यक्रम घेणें शक्य असतें. पण पांच सहा साथीदारांसह दूरवरचा प्रवास त्या त्या प्रांतांत भरपूर आमंत्रणें असल्याशिवाय परवडत नाहीं.

३ कार्यक्रम ठरवूं इच्छिणाऱ्यांनीं निदान एक महिना अगोदर शाहिरांना कळवून ठेवावें.

४ कार्यक्रम करविण्याची उत्कट इच्छा असणाऱ्या पण मुद्दाम तेवढ्यासाठीं शाहिरांना आणविण्याची शक्यता नसलेल्या गृहस्थांनीं व संस्थांनीं त्यांना आपली इच्छा जरूर कळवून ठेवावी, म्हणजे त्या प्रांतांत जाण्याचा स्वतंत्र योग येईल तेव्हां त्या त्या गृहस्थांना व संस्थांना याबद्दल सूचना देण्यास ठीक पडेल.

५ पत्रव्यवहार करून आणखी जास्त माहिती व खुलासा करून घ्यावा.

पत्ताः—पांडुरंग दत्तात्रय खाडिलकर M. A. B. T.
महाराष्ट्र-शाहीर, महाराष्ट्र सोसायटी
अहमदाबाद.